॥ महाराष्ट्र-साहित्यसेवक-ग्रंथमाला ॥

पुष्प १० वें.

# प्रपितामहाच्या पदावर !



रचणार

## विद्याधर वामन भिडे, बी. ए.

( " कोरलईचा किल्लेदार, " " मुरारि, " " केंजळगडाचा कबजा, " " पण तिसरा कोण ? " " गणवंत-गडाचा गडकरी, " " अंबाजीराव मोहिते, " इत्यादि कादंबऱ्यांचे कर्ते ).







प्रथमावृत्ति ] किंमत २॥८ रु. [ सन १९३२.

# लेखकाची प्रस्तावना.



शिवाजीच्या उदयकाळावर आम्ही "मुरारि," "केंजळगडाचा कबजा," "पण तिसरा कोण ?" "[illegible] गडकरी," ह्या चार कादंबऱ्या रचिल्या त्या छापून प्रसिद्ध झाल्याला पुष्कळ वर्षे झालीं. ह्या चार कादंबऱ्यांच्या मालेतील "प्रपितामहाच्या पदावर" ही पाचवी कादंबरी आज आम्ही वाचकांना सादर करीत आहों.

शिवाजीनें दातेगड कसा जिंकून घेतला ह्या गोष्टीचें कथन आम्ही ह्या कादंबरींत केले आहे.

शिवाजीची तनुवाङ्मनःपवित्रता, शिवाजीची मुत्सुद्दीगिरी, लोकसंग्रह करण्याची हातोटी, देशकार्यामध्यें जातिभेद आणि स्पृश्यास्पृश्य ह्या भेदाची उपेक्षणीयता, इच्छेविरुद्ध परक्याकडून परधर्मांत प्रविष्ट करण्यात आलेल्या हिंदूंना पतितपरावर्तनाच्या विधीने परत हिंदुधर्मांत सामील करून घेण्याची उत्सुकता, हिंदूंचे परकीयांनीं लुबाडलेले प्रांत परत जिंकून घेऊन हिंदूंच्या स्वामित्वाखालीं स्थापिण्याची बलवत्तम इच्छा, इत्यादि शिवाजीचीं जीं उच्चतम ध्येयें तीं कादंबऱ्यांच्या रूपानें आपणा हिंदूंच्या नजरेस आणून द्यावयाच्या इच्छेनें आम्ही ह्या सर्व कादंबऱ्या लिहिल्या आहेत. आमचें हें उद्दिष्ट सफल होत असल्याचें लोकांच्या प्रशंसापर टीकावरून स्पष्ट दिसत आहे. अशाच सरणीनें आणखीही कादंबऱ्या लिहिण्याची आमची उमेद आहे. ही उमेद फलद्रूप करणें हे धनकालादिकांच्या अनुकूलतेवर जितकें अवलंबून आहे, तितकेंच, किंबहुना अधिकप्रमाणांत, लोकाश्रयावर अवलंबून आहे.

आमच्या पूर्वीच्या कादंबऱ्यांस जसा लोकाश्रय मिळाला तसा "प्रपितामहाच्या पदावर" ह्याही कादंबरीस मिळेल अशी आम्हास उमेद आहे.

७३५ पुणे, सदाशिव पेठ
ता. १ मार्च १९३२ } **विद्याधर वामन भिडे.**

---

॥ श्रीगोपालकृष्णाय नमः

# प्रकाशकाचे चार शब्द.



मंगलमय प्रभूच्या कृपेनें आमच्या 'माले' चे हें दहावें दणदणीत पुष्प वाचकांचे हातीं देतांना आम्हांस आनंद वाटत आहे. वास्तविक या खेपेस हेंच पुस्तक वाचकांचे हातीं देण्याचा आमचा विचार होता. पण मध्यंतरीं कांहीं अडचण आल्यामुळें गेल्या पुष्पाचे शेवटीं "यमुना-पावित्र्यप्रभाव" हें जोडपुष्प ह्या खेपेस प्रसिद्ध होईल म्हणून आम्ही लिहिलें होतें. परंतु सुदैवानें ती अडचण दूर होऊन आम्हांस आमच्या उद्देशानुसार ह्या खेपेस हें पुष्प आमच्या प्रियवाचकांचे हातीं देण्यास लाभलें, याबद्दल आम्हास आनंद वाटत आहे. आमच्या मालेच्या 'मुरारि' ह्या कादंबरीच्या प्रारंभीं आम्ही ही आमची इच्छा बोलून दाखविली होती, व 'मुरारि' व 'प्रपितामहाचे पदावर' ह्या दोन्ही कादंबऱ्या छापण्याचें पुण्य येथील वयोवृद्ध, विद्वान्, व मार्मिक लेखक श्री. वि. वा. भिडे बी. ए. यांनीं आम्हास लाभूं देण्याचें त्याच कादंबरीस त्यांनीं लिहिलेल्या 'प्रास्ताविक निवेदना'त कबूलही केलें होतें. त्याप्रमाणें आज-रोजीं आम्हास त्यांनीं ही सुसंधि मोठ्या उदारपणें प्राप्त करून दिली ह्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत.

खुद्द 'प्रपितामहाच्या पदावर' ह्या रहस्यमय, उद्बोधक, चटकदार व स्फूर्तिप्रद कादंबरीबद्दल खुद्द पुस्तककर्त्यांनींच त्यांतील विषयांचें इद्गत प्रगट केलें असल्यामुळें आम्हांस त्या कामीं वेगळें कांहीं सांगण्याचें कारणच नाहीं. आम्हीं त्यात एवढेंच म्हणतो कीं, सदर विषयांचें महत्त्व प्रस्तुतच्या काळींही किती आहे हें सूज्ञ वाचक जाणतीलच. असो. आमच्या प्रिय आश्रयदात्यांना आम्हांस शेवटीं एवढीच विनंति करावयाची आहे कीं, प्रस्तुतसारख्या कठिण काळांत, केवळ ध्येयावर नजर देऊन, अत्यंत कष्टानें चालविलेल्या, आमच्या ह्या 'माले'च्या कार्याबद्दल त्यांनीं उत्तरोत्तर अधिकाधिक सक्रिय सहानुभूति व प्रेम बाळगून 'माले' स

मिळतील तितके अधिक वर्गणीदार मिळवून द्यावे व आमच्या उच्च ध्येयांत आम्हांस साह्य करावें. यापुढें " भारतवर्षाचा धार्मिक इतिहास " या ग्रंथाचा ' उत्तरार्ध ' मालेचें पुढील पुष्प म्हणून वाचकास सादर करण्याचा आमचा विचार आहे. तरी वाचकांनीं वाढत्या कृपेची पाखरण ह्या त्याच्या मालेवर सदैव घालीत राहावें अशी जनताजनार्दनाचे चरणीं अखेर विनंति करून हे " चार शब्द " पुरे करतों.

७३३ सदाशिव पेठ, पुणें.
ता. १–३–३२

सर्वांचा नम्र–
गं. रा. साने.

---

# महत्त्वाचें शुद्धिपत्र.

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२८ | १७ | सातही | नऊही |
| १३३ | ५ | पांच | सात |
| १३६ | ३ | पांच | सात |
| २१८ | १७ | शंभर | हजार |
| २८७ | १७ | प्रतिपदेला | तृतीयेला |

याशिवाय, प्रयत्न करूनही कांहीं मुद्रणदोष राहून गेले असल्यास, वाचकांनीं त्याबद्दल क्षमा करावी.

गं. रा. साने.

# प्रपितामहाच्या पदावर.

## प्रकरण १ लें.

## सर्जेराव निंबाळकर.

साताराजिल्ह्याच्या पश्चिमबाजूकडे सह्याद्रीच्या ओळींत दातेगड उर्फ सुंदरगड ह्या नांवाचा जो मजबूत डोंगरी किल्ला आहे त्याच्या पायऱ्यापासून सुमारें दोन तीन हाकांच्या अंतरावर पश्चिमेकडे कासेगांव ह्या नांवाचें एक लहानसें खेडें होतें. ह्या कासेगांवाला बहुतेक चिकटूनच एक उत्तरेकडे आणि एक दक्षिणेकडे अशा दोन टेकड्या होत्या. ह्या टेकड्यांना टेकड्या असा शब्द न लावतां जमिनीचे उंचवटे हा शब्द लावला असतां तो अधिक योग्य होईल. दक्षिणेकडचा जो उंचवटा त्याचें वर्णन ह्या कादंबरींत पुढें प्रसंगानें आम्ही करणारच आहों. सध्या त्याच्याविषयीं येथें आम्ही कांहीं सांगत नाहीं. सध्या आम्ही कासेगांवाच्या उत्तरबाजूला असलेल्या उंचवट्याकडे वळतों.

कासेगांवच्या उत्तरेस असलेला हा उंचवटा सभोंवतालच्या सपाटीपेक्षां फारसा उंच नव्हता, परंतु तो क्षेत्रफळानें विस्तीर्ण होता. ह्या उंचवट्याच्या माऱ्यावर बारा खण जागेच्याचें एक तिघई विस्तीर्ण घर होतें आणि त्यांत नांदत्या कुटुंबाला जरूर अशा सर्व सोयी होत्या. ह्या घराच्या चारी बाजूंस सोपे, गोठे, तबेले वगैरे बांधलेले असून त्या सर्व इमारतींच्या सभोंवार भिंतीचें वेष्टन होतें. ज्या ठिकाणची भिंत ढासळलेली होती तेथें निवडुंगानें ती जागा भरून काढलेली होती.

हें घर आणि त्याच्या सभोंवतालचा सर्व प्रदेश ह्यांचा मालक सर्जेराव निंबाळकर ऊर्फ नाईक ह्या नांवाचा एक मराठा गृहस्थ होता.

सर्जेराव निंबाळकर हे जातिवंत मराठे होते. त्यांचे पणजे हे विजापुरास व्याजबट्ट्याचा, सावकारीचा आणि गहाणापहाणाचा धंदा करून गबर श्रीमंत झाले होते. त्यांच्या मुलानें ह्मणजे सर्जेरावांच्या आजानें तो धंदा तेथें चालू ठेऊन संपत्तींत भर घातली आणि दातेगडाच्या

पाश्चात्याशीं खूपच मोठी स्थावर जिंदगी विकत घेतली. सर्जेरावाच्या बापानें ह्या जागीं एक विस्तीर्ण घर बांधलें, पण तो विजापुरासच राहून वडिलोपार्जित धंदा चालवीत असे. वर्षांचे कांहीं दिवस तो कासेगांवीं घालवीत असे.

सर्जेराव विजापुरास आपल्या वडिलाजवळ असत. त्यांच्या अंगीं मोठ्या शहरचे सर्व दुर्गुण भरलेले होते. सर्जेरावाचीं दुष्कृत्यें, आणि उचापती ह्याच्यावर पांघरुणें घालताघालतां आणि त्यांचे परिणाम विझवितांविझवितां त्यांच्या वडिलांना नाकीं नऊ येऊन गेले होते; आणि आपल्या कुळांत असला वाईट मुलगा जन्मल्याबद्दल त्यांना हृद्रोग लागून त्यांतच त्यांचा अंत झाला. वडील मरण पावल्यावर सर्जेरावांना कोणी आवरता राहिला नाहीं. त्यांची गद्धेपंचविशी मोकाट सुटली. त्यांनीं विजापुरास ज्या ज्या गोष्टी केल्या होत्या त्यांचे परिणाम चुकविण्यासाठीं त्यांना कासेगांवास पळून यावें लागलें.

ते कासेगांवास येऊन राहिल्यावर एक दोन वर्षांनीं पद्मिनीचा जन्म झाला. ज्या दिवसानें सर्जेरावांना पिता केलें, त्याच दिवसानें त्यांना विधुर केलें. परंतु नूतनअर्भकाचें संवर्धन आणि संगोपन ह्यांत कांहीं कमतरता झाली नाहीं. सर्जेरावांची मईबाई ह्या नांवाची मावशी होती. ती बालविधवा असून तिला सासरचें किंवा माहेरचें कोणी माणूस नसल्याकारणानें ती निराश्रित होत्साती सर्जेरावांच्या घरीं येऊन राहिली होती. पद्मिनीचें संवर्धन आणि संगोपन अर्थात मईबाईच्या अंगावर पडलें आणि तिनें तें उत्तम प्रकारें केलें.

सर्जेराव कासेगांवीं रहावयाला आल्याकारणानें त्यांचें विजापुर सुटलें, परंतु विजापुरास गद्धेपंचविशींत त्यांना जडलेलीं व्यसनें मात्र सुटलीं नाहींत. स्थलान्तराच्या योगानें सर्जेरावांच्या आयुष्यक्रमणांत अगदींच कांहीं फरक पडला नाहीं असें नव्हे. विजापुरास असतांना सर्जेरावांना जडलेलीं सर्व व्यसनें त्यांनीं कासेगांवास आपल्याबरोबर आणिलीं होतीं. आपल्या व्यसनांचें संतर्पण सर्जेराव विजापुरास निर्लज्जपणानें आणि धाडसानें करीत असत. परंतु कासेगांवास येऊन राहिल्यावर हें संतर्पण ते सावधगिरीनें आणि धूर्तपणानें करूं लागलें इतकाच काय तो

फरक सर्जेरावांच्या ठायीं ह्या स्थलान्तरानें झालेला होता. ह्या कारणामुळे सर्जेरावांना चारचौघांत मानमान्यता असे. त्याचीं बदफैलीपणाचीं कृत्यें गुप्तपणें केलीं जात असल्याकारणानें आणि ते आपल्या मदतनीस नोकरांस सढळहाताने बक्षिशी देत असल्याकारणानें त्याचा बदफैलीपणा कोणालाही कळत नसे.

सर्जेरावांच्या नांवाचा बोभाटा विजापुरास फार झालेला होता, परंतु तो बोभाटा कासेगांवाला आलेला नव्हता. सर्जेराव कासेगांवाला आले ते अत्यंत श्रीमंत आणि अत्यत माळमृद ह्या लौकिकाच्या परिमलांत राहिलेले होते.

परंतु चारचौघात लौकिक संभाळून व्यसनसंतर्पण करणाऱ्या माणसाला पैसा सढळहाताने खर्चावा लागतो, ह्या नियमाला अनुसरून सर्जेराव पैसे खर्चीत असत. तेणेंकरून त्यांच्या संपत्तीला एकसारखी ओहोट लागत राहून त्यांचीं शेतें, बागा, मळे, आणि राहातें घरसुद्धां सावकाराकडे गहाण पडलेलें होतें. सर्जेरावाच्या दरमहाच्या खर्चाला लागणारे पैसे सावकार त्याना कर्जाऊ म्हणून देत असे. हें कर्जही दरमहिन्याला वाढत चाललें होतें. सर्जेरावाची ही स्थिति एकट्या सावकारालाच काय ती ठाऊक होती; दुसऱ्या कोणलाही ठाऊक नव्हती. त्यामुळें सर्जेराव हे अत्यंत श्रीमंत गृहस्थ हा जो त्याचा लौकिक तो जनतेत अबाधित राहिला होता.

आमची कादंबरी सुरू होत आहे तो काळ शके १५७० चा होता. त्यावेळीं सर्जेराव कासेगांवचे सतरा वर्षांचे स्थायिक झालेले होते. त्यांचें वय ह्यावेळीं बावन्न वर्षांचे होते.त्यांनीं त्याकाळच्या रिवाजाप्रमाणें लहानपणीं सर्वप्रकारचीं तालमीचीं आणि मैदानीं कामें केलेलीं होतीं तेणेंकरून त्याचें हाडपेर मजबूत झालेलें होतें आणि प्रकृतीही निकोप झालेली होती. त्यामुळें त्यांच्या व्यसनासक्ततेचा परिणाम त्यांच्या शरीरावर झाला नव्हता. फक्त ते दिसण्यात त्या वयाच्या माणसांहून दोनतीन वर्षांनीं उतार दिसत असत, इतकेंच काय तें. ते वर्णानें निमगोरे, काटीनें उंच, आणि अंगलटीनें धिप्पाड होते. त्यांचे डोळे विशाल आणि काळेभोर होते आणि त्यांच्या नजरेंत उग्रपणाची आणि कामुकतेची छटा मारीत असे.

त्यांची कन्या पद्मिनी हें त्यांचें एकुलतें एक अपत्य होतें. पद्मिनी हीं अत्यंत सुंदर आणि मोहक होती. तिची अंगकांति गुलाबाच्या फुला-प्रमाणें होती. ती काठीनें मध्यम उंचीची, अंगलटीनें गुबगुबीत, आणि हालचालींत तरतरीत होती. ती दिसण्यांत नाजूक दिसे तरी तिचें हाडपेर मजबूत असून ती प्रकृतीनें अगदीं निकोप होती.

पद्मिनीचा तोंडावळा लांबोळ्या घाटाचा होता. तिचे केश बारीक, लांब, काळेभोर आणि तुकतुकित होते. तिचें कपाळ उंच होतें. तिच्या भिवया धनुष्याकार असून मध्यें जाडी आणि अग्राकडे निमुळत्या होत गेलेल्या होत्या. तिचे डोळे विशाळ आणि काळेभोर असून त्यांच्या नजरेंत करारीपणाची छटा मारीत असे. तिची नासिका सरळ आणि निर्दोष होती. तिचे गाल गुबगुबीत असून ओंठ लाल आणि किंचित् जाडसर होते. त्यांच्या आंत लपलेले दांत हारीनें असून पांढरे स्वच्छ होते. तिची हनुवटी टोकाकडे निमुळती होत गेलेली आणि किंचित् पुढें वळलेली होती. तिचीं सर्व गात्रें गुबगुबीत आणि प्रमाणशुद्ध होतीं. पद्मिनी ही यावेळीं पंधरा वर्षांच्या वयाची झालेली होती, तरी ती अद्यापि अविवाहित होती. ती अविवाहित अशी कां राहिली होती याचें कारण आमच्या गोष्टीच्या ओघानें वाचकांना कळेलच.

पद्मिनीच्या स्वभावाचें वर्णन करणें थोडेसें कठिण आहे. आपण श्रीमंत आहों, आणि जातिवंत मराठे आहों हें ती जाणून होती. परंतु ती गरीब किंवा हलक्या दर्जाच्या माणसांशीं प्रेमळपणानें वागे. ती वडीलमाणसांशीं मर्यादशीलपणानें वागे, परंतु ती आपले विचार वडील माणसांच्या विचारांहून भिन्न असले तर ती ते स्पष्टपणें बोलून दाखवा-वयाला कचरत नसे. ती वडील माणसांची आज्ञा उल्लंघीत नसे. पण ती आज्ञा मूर्खपणाची आहे असें तिचें मत असलें तर ती तसें बोलून दाखवावयाला भीत नसे. पद्मिनी ही कायावाचामनानें पवित्र होती. ती चाणाक्ष होती. पण तिच्या बापाचा अपवित्रपणा तिच्या निदर्शनाला आला होता किंवा नव्हता हें आम्हाला खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं.

मजेंगवाची मावशी सईबाई ही वयानें चाळीशीच्या घरांत होती.

ती गृहकृत्यांत चटपटीत असून तिची टापटीपही चांगली होती. ती प्रेमळस्वभावाची आणि धार्मिक कलाची स्त्री होती.

सर्जेराव, पद्मिनी आणि सईबाई अशीं तीनच माणसें ह्या कुटुंबांत होतीं. त्याशिवाय घरांत सातआठ नोकर माणसें होतीं. घोड्यांची चाकरी करणें, गायीम्हशींचीं दुधें काढणें, आणि दुसरीं सटरफटर कामें करणें हीं ह्या नोकरांचाकरांचीं कामें असत.

काळेगांवीं सर्जेराव हे एक अत्यंत कुलीन, आणि अत्यंत श्रीमंत सुखवस्तु गृहस्थ म्हणून गणले जात असत. त्यांचे दिनक्रमण दिसण्यांत अगदीं एकसुरी दिसत असे. गांवांतील कोणत्याही कुटुंबाशीं त्यांचा विशेषसा घरोबा नव्हता, किंवा वांकडेंही नव्हतें.

सर्जेरावासंबंधाची ही थोडीशी माहिती वाचकांना देऊन आतां आम्ही एका विशिष्ट दिवसाची हकीगत वाचकांना सादर करतों.

---

## प्रकरण २ रें.

# सर्जेराव आणि पद्मिनी.



शके १५७० सालच्या कार्तिक शुद्ध नवमीच्या दिवशीं आठवड्याचा वार शुक्रवार हा होता. ह्या दिवसाची सर्जेरावांच्या घरांतील एका प्रसंगाची हकीगत आम्ही सांगतों.

दुपारच्या भोजनानंतर नित्याच्या परिपाटाप्रमाणें सर्जेरावांनीं कांहीं वेळ आपल्या खोलींत वामकुक्षि केली. नंतर मागीलदाराच्या पडवींत जाऊन त्यांनीं चुळा भरून डोळे, तोंड, वगैरे धुतले. मग नेसलेल्या धोतराच्या सोग्यानें तोंड पुशीत पुशीत ते पडवींतून माजघरांत आले. हें माजघर दहा खण जागेचें असून त्याच्या एका टोकाला त्यांची मावशी सईबाई एका जुनेरावर निजलेली होती, आणि दुसऱ्या टोकाला त्यांची मुलगी पद्मिनी ही चरक्यावर सूत काढीत बसली होती. पद्मिनी सूत काढीत बसली होती असें म्हणण्यापेक्षां ती सूत काढीत नव्हती असें म्हणणेंच बरोबर होईल. कारण, चरका तिच्यापुढें होता, डाव्या हातांत

कापसाची पेळव असून तो हात तिच्या डाव्या गुडघ्यावर टेकलेला होता, आणि उजव्या हाताच्या बोटांनी चरक्याचा दांडा धरलेला होता. परंतु तो दांडा वाटोळा फिरतही नव्हता आणि पेळव दूर जात नव्हती आणि जवळही येत नव्हती.

ह्यावेळी पद्मिनी वर वर्णिलेल्या संस्थानात बसलेली असून तिची दृष्टि माजघराच्या पटईकडे लागलेली होती. अर्थात् तिच्या मनात ह्या वेळीं कांही तरी महत्त्वाचे विचार चाललेले असावे हें सहज कोणालाही जाणतां आलें असतें.

सर्जेराव धोतऱ्याच्या सोग्यानें तोंड पुशीतपुशीत माजघरात आले. त्यांनीं पद्मिनीकडे नजर करून म्हटलें, " पद्मिनी, तूं कोणच्या गहन विचारांत इतकी गढून गेली आहेस ! "

पद्मिनी,-जी खरोखरीच विचारांत गढून गेली होती,-ती बापाचा हा प्रश्न ऐकून दचकली, आणि तिने सर्जेरावांकडे तोंड वळवून उत्तर दिलें, " बाबा, आज सूत काढावयाचें होते तितकें काढून झालें, आणि मी चरका बाजूला सारणारच होतें. "

तेव्हा सर्जेराव म्हणाले, " पण तूं कोणच्या विचारात निमग्न झाली होतीस तें नाहीं सांगितलेस ? "

पद्मिनी म्हणाली, " माझा विचार तो कसला आणि त्याचे महत्व तरी काय ? "

असें बापाला उत्तर देतदेत पद्मिनीनें बसल्या जागेवरून उठून चरका माजघराच्या कोपऱ्यांत ठेवून दिला, आणि पेळवांची सुरळीही जागच्या जागीं ठेवून दिली.

आपल्या प्रश्नाला पद्मिनी नीटसें उत्तर देत नाहीं असें पाहून सर्जेराव तिला म्हणाले, " तुझ्या डोक्यांत कसले विचार चाललें आहेत ह्याचा तूं जरी मला थांग लागूं देत नाहींस, तरी ते ओळखून काढण्याइतका धूर्त मी खास आहें. चल माझ्या खोलींत, तेथें आपण स्वस्थपणें बसून बोलूं. "

असें बोलून सर्जेराव माजघरांतून आपल्या खोलींत गेले. त्यांच्या

पाठोपाठ पद्मिनीही गेली. सर्जेराव आपल्या माचावर बसले. पद्मिनी माच्याच्या समोर ठेविलेल्या, एका संदुकीवर पाय लोंबत सोडून बसली.

सर्जेराव आणि पद्मिनी अशा प्रकारे सन्निविष्ट झाल्यावर तिच्या मुखावर भेदक नजर स्थिरावून ते म्हणाले, "पद्मिनी, मी तुला माजघरांत आता पाहिलें तेव्हां तूं चरका पुढे घेऊन स्वस्थ बसलेली होतीस. तुझी नजर पटईकडे वळलेली होती आणि तुझ्या मुद्रेवरून तूं कांहीं तरी गंभीर विचारात गढलेली असावीस असें स्पष्ट दिसत होतें. तूं जरी मला तें कळूं दिलें नाहींस, तरी तें तर्किण्याइतका मी धूर्त आहें. समजलीस ? "

त्यावर पद्मिनी गंभीर मुद्रेने म्हणाली. " बाबा, माझे विचार ते कसले आणि त्याचें महत्त्व तरी काय ? "

सर्जेराव म्हणाले, " पद्मिनी, अशी उडवाउडवीची उत्तरें देऊन भागावयाचें नाहीं. तुझ्या मनात कांही महत्त्वाचे विचार चाललेले होते खास. तूं जरी ते विचार मला कळूं दिले नाहींस तरी ते मला जाणता येतात. आणि वास्तविक पाहिले असता ते विचार तुझ्या वयाच्या मुलींच्या मनात येणें साहाजिकच आहे. तू आपल्या लग्नाविषयीं विचार करीत होतीस ना ? "

बापाचा हा प्रश्न ऐकून पद्मिनी थोडीशी दचकली आणि तिच्या गुबगुबीत गालांवर लाजेची छटा मारूं लागली. कारण, ती माजघरात बापाच्या दृष्टीस पडली तेव्हां तिच्या मनात खरोखरींच तिच्या स्वतांच्या लग्नसंबंधाचे विचार चाललेले होते. असो.

सर्जेरावांची भेदक नजर पद्मिनीच्या मुखावर खिळलेली होती. आपली पालटलेली मुद्रा बापाच्या लक्ष्यात आली असलीच पाहिजे हें तिला कळून चुकलें. तेव्हा ती स्थिरस्वराने म्हणाली, " बाबा, तुमचा तर्क फारसा चुकलेला नाहीं. माझ्या डोक्यात तसलेच कांहीं तरी विचार चाललेले होते हें खरे आहे. "

सर्जेराव म्हणाले, " पद्मिनी, तुझ्या लग्नासंबंधाने तुझ्या मनांत विचार घोळत असतात तसे माझ्या मनांतही घोळत असतात. आज तीन महिने

तुझ्या लग्नाबद्दल मी विचार करीत आहे. ते विचार तुला कळविण्याचें कांहीं कारण नव्हतें म्हणून मी तुला ते सांगितलें नव्हते. परंतु आतां संभाषणाच्या ओघानें तो विषय उपस्थित झाला आहे म्हणून मी तुला सांगतो कीं तुझें लग्न मी ठरवून टाकलें आहे. मी तुला एक नवरा पाहून ठेविला आहे. स्थळ कांहीं वावगे नाही. ''

हे बापाचें भाषण ऐकून पद्मिनी साकांक्ष मुद्रेनें बापाच्या मुखावर दृष्टि लावून राहिली. पण तिनें कांहीं प्रश्न विचारला नाहीं. तेव्हां सर्जेराव म्हणाले, '' पद्मिनी, तुला जो नवरा मी ठरवून ठेविला आहे तो तुझ्या माहितीचाच आहे. आणि त्याच्याशीं तुझें लग्न येत्या मार्गशीर्ष महिन्यांत होईल. ''

पद्मिनी ह्याहीं वेळीं साकांक्ष मुद्रेनें पित्याच्या मुखावर दृष्टि लावून स्तब्ध बसून राहिली. तेव्हां सर्जेराव म्हणाले, '' तुला मी ठरवून ठेविलेला नवरा कोण म्हणशील तर तो कारेगावातील अत्यंत श्रीमंत माणूस ग्यानबा वाळुंज हा होय. ''

ग्यानबा वाळुंज हें नाव कानीं पडताच पद्मिनी विजेचा धक्का बसल्याप्रमाणे ताडदिशीं सदुकीवरून उठून जमिनीवर उभी राहिली. तिचीं गात्रे निश्चल होतीं आणि तिची आश्चर्यव्यंजक दृष्टि बापाच्या मुखावर स्थिर लागलेली होती.

सर्जेराव तिची निर्भर्त्सना करण्याच्या स्वरानें म्हणाले, '' पद्मिनी, ग्यानबा वाळुंज हे नाव ऐकून तुला इतकें आश्चर्य का वाटलं ? तो खूब श्रीमंत आणि आपल्या तोडीचा माणूस आहे. त्याच्याशीं मी तुझें लग्न ठरविले आहे. तूं आज्ञाधारक मुलगी आहेस. मी केलेली योजना तुला मान्य होईल अशी माझी खात्री आहे. निदान त्या योजनेविरुद्ध तरी तूं वागणार नाहींस अशी माझी खात्री आहे. ''

त्यावर पद्मिनी करारीपणाच्या स्वरानें म्हणाली, '' मी आज्ञाधारक मुलगी आहे, असें तुम्हीं म्हणतां तें खरें आहे. आणि मी तुमच्या योजनेविरुद्ध वागणार नाहीं अशी जी तुमची खात्री आहे तीही अस्थानीं नाहीं. परंतु तुमची योजना मात्र मला मान्य होणें शक्य नाहीं तेथें माझा इलाज नाहीं. ग्यानबा वाळुंज हे श्रीमंत आहेत

ही गोष्ट खरी. पण त्यांच्या पैशाव्यतिरिक्त त्याच्यात चांगलें असें काय आहे ? त्यांची पन्नाशी उलटून गेली आहे. मी त्यांची नात शोभेन. रूप नीतिमत्ता, शिक्षण, सभ्यपणा वगैरेपैकीं कोणच्या गुणाकडे पाहून तुम्ही त्यांना आपले जांवई करून घेणार ? तुमची इच्छा ती मला आज्ञा.पोरगी वैरावयाला तुम्ही सिद्ध झाला आहां. होऊं द्या तुमच्या इच्छेप्रमाणे. मी तुमच्या आड येत नाहीं. पित्याची आज्ञा पाळणे हा कन्येचा धर्म आहे हें मनांत आणून मी तुमच्या योजनेला रुकार देतें. परंतु तुमची योजना मला मान्य नाहीं."

तेव्हां सर्जेराव म्हणाले, " तुझ्या मान्यतेला किंमत देणारा मी मनुष्य नाहीं. माझ्या इच्छेप्रमाणे वागावयाला तूं तयार असलीस म्हणजे झाले. "

सर्जेराव ह्या सरणीने बोलत असता त्याना आपल्या कठोरपणाची लाज वाटली,आणि ते अनुनयाच्या स्वराने ह्मणाले, " पण पद्मिनी, ग्यानबा वाळुंज हा मनुष्य तुला का मान्य नाहीं हें तर मला सांगशील, मला स्वताला तो मनुष्य कांहीं वावगा वाटत नाहीं. "

तेव्हा पद्मिनी म्हणाली, " बाबा, ग्यानबा वाळुंज हे कशाप्रकारचे मनुष्य आहेत हे तुह्माला ठाऊक नाहीं काय ? त्यांनी फटी बोधलीचा खून केला ही गोष्ट सर्व कासेगावला ठाऊक आहे. " त्यावर सर्जेराव म्हणाले, " फटी बोधलीचा त्यानीं खून केला ही गोष्ट खरी आहे. पण फटी बोधलीनें ग्यानबा वाळुंजला कसें डिवचले होते हें तुला ठाऊक नाहीं. परंतु ग्यानबानें जरी फटीचा खून केला तरी तो तुझा कांहीं खून करणार नाहीं अशी माझी खात्री आहे. "

तेव्हां पद्मिनी म्हणाली, " दुर्गा ताह्मणे ही नवऱ्याजवळ सुखानें नांदत असतां तिला घरांतून उठविण्याला तेच ग्यानबा कारण झाले ना ! आणि भवानीच्या देवळांत गेल्यासाली जो गोंधळ उडविला तो त्याच ग्यानबांनीं ना ! "

हें मुलीचे भाषण ऐकून सर्जेराव रागावले. ते मुलीला दरडावण्याच्या स्वरानें म्हणाले, " पोरी , तूं चित्रगुप्ताप्रमाणें ग्यानबाच्या दुष्कृत्यांची वहीबिही करून ठेवली आहेस कीं काय ! ग्यानबानें कांहीं वाईट गोष्टी

केल्या असतील, पण तेवढ्यांवरून तो त्याज्य होतो असें नव्हे. तुझें माप प्रत्येक पुरुषास लावल्यास कोणीही तुला पसंत होणार नाहीं. पुरुष म्हटला कीं तो थोडाफार डागाळलेला असणारच ! खरा पवित्र माणूस ह्या दुनियेंत तुला कोणीच आढळणार नाहीं. कांही गोष्टी पुरुषाना माफ केल्या पाहिजेत. ग्यानबा वाळुंजला तूं माझ्या दृष्टीनें पहा म्हणजे तो तुला वावगा वाटणार नाहीं. "

हें संभाषण वाढविण्याची पद्मिनीची इच्छा नव्हती, म्हणून ते आटोपतें घेण्याच्या उद्देशानें ती म्हणाली, "बाबा, ग्यानबा वाळुंज हे नीतिमान् आहेत किंवा अनीतिमान् आहेत, ते खुनी आहेत कीं खुनी नाहीत ह्या गोष्टींसंबंधाने वाद करून काय उपयोग ? त्यांना तुम्ही आपले जांवई करून घेण्याचा निश्चय केला आहेत. मला त्यांच्या गळ्यांत किंवा त्यांना माझ्या गळ्यांत बांधण्याचा तुमचा निश्चय असल्यास मी आपली मान पुढें करतें. तुमची इच्छा ती मला आज्ञा. "

हें मुलीचें वैतागाचें भाषण ऐकून सर्जेरावाच्या मनाला द्रव आला नाहीं. उलट, त्यांना रागच आला. परंतु पुन्हां मुलीचा अनुनय करून पाहावा असा बेत करून ते सौम्यस्वरानें म्हणाले, "पद्मिनी, मी जी योजना केली आहे ती आपल्या कुटुंबाच्या कल्याणासाठींच केली आहे. ह्या योजनेप्रमाणें गोष्टी घडून आल्या तर तूं श्रीमंताच्या घरीं पडशील. तुझा जन्म सुखांत आणि विलासांत जाईल आणि तुझी सुस्थिति पाहून मला समाधान वाटेल आणि माझें म्हातारपण सुखांत जाईल. माझ्या योजनेनें ह्या इतक्या गोष्टी साध्य होतील. ह्या योजनेला तुझी नापसंती कां असावी हें मला समजत नाहीं. "

त्यावर पद्मिनी म्हणाली, " बाबा, तुमच्या योजनेप्रमाणें मी वागायला तयार आहे असें तुम्हाला मी सांगितलेंच आहे. मग आतां ह्या तुमच्या योजनेचा खल कशाला ? "

तेव्हां सर्जेराव किंचित् आवेशानें म्हणाले, " पोरी, खल करण्याचें खरोखरी कांहीं कारण नाहीं. कारण, तुझ्या मताप्रमाणें चालावयाला मी कांहीं बांधील नाहीं. परंतु मी माझ्या या योजनेचा खल तुझ्यापुढें करीत आहे तो अशासाठीं कीं माझी ही योजना तुला पसंत पडली तर

तूं आनंदानें ग्यानबाची बायको व्हावयाला तयार होशील. एवीतेवी तूं त्याची बायको होणार हें ठरलेलें आहे. मग तूं आनंदानें आणि खुषीनें त्याची बायको झालीस तर तें उत्तम नव्हे काय ? "

ही बाबांची विचारसरणी पद्मिनीला कबूल झाली नाहीं. परंतु जास्ती वादविवाद टळावा ह्या बुद्धीनें ती कांहीं न बोलतां स्वस्थ राहिली. आपल्या ह्या विचारसरणीचा आपल्या मुलीच्या मनावर कांहींच परिणाम होत नाहीं हें पाहून सर्जेरावाना राग आला. परंतु मुलीचें मत आपल्या सारखें करून घेण्याचा प्रयत्न सोडावयाला ते तयार नव्हते. मुलीचे मन वळविण्यासाठीं त्यांनीं दुसऱ्या एका साधनाचा उपयोग करण्याचें ठरविलें. हे दुसरें साधन त्यांनीं योजलें तें कोणचे होतें तें पुढील प्रकरणीं आम्हीं वाचकांना कळवूं.

---

## प्रकरण ३ रें.

# लग्नाला पद्मिनीची कबूली.



इतका वेळ जें वक्तृत्व आपण वेचलें त्याचा आपल्या मुलीच्या मनावर यत्किंचित्‌ही परिणाम झाला नाहीं हे पाहून सर्जेरावांची निराशा झाली; त्यांना रागही आला. परंतु प्रयत्न सोडावयाचा नाहीं या इराद्यानें त्यांनीं दुसऱ्या एका साधनाचा उपयोग करावयाचें आपल्या मनांत ठरविलें. तें सौम्यस्वरानें म्हणाले, पद्मिनी, "माझ्या योजनेला तुझी इतकी तीव्र नापसंती असता मी ती योजना तुझ्यावर न लादावी असेच ठरविलें असतें. जें मुलीला पसंत नाहीं तें मुलीवर लादणारा बाप लोकांच्या दृष्टीनें आणि त्या मुलीच्याही दृष्टीने क्रूर ठरेल ह्यात कांहीं शंका नाहीं. माझी योजना मलादेखील खरें पाहिलें असता पूर्णपणें मान्य आहे असें नाहीं. पण पद्मिनी, माझा ह्या बाबतींत नाइलाज आहे. ग्यानबाला मी आपला जावई करून घेतल्याशिवाय मला गत्यंतर नाहीं. ज्या गोष्टी मी इतके दिवस तुझ्यापासून चोरून ठेविल्या होत्या. त्या मी आतां तुला सांगतों. त्या तूं ऐकल्यास म्हणजे तूं माझ्या योजनेला रुकार देशील. मी

किती संकटांत आहे, मी कोणच्या पेचांत आहे, आणि ग्यानबाला मी आपला जांवई करून घेतल्याशिवाय मला तरणोपाय कसा नाही, हें तुला स्पष्ट करून सांगितलें म्हणजे तूं आनंदाने माझ्या योजनेला रुकार देशील. ह्या गोष्टी तुला सांगावयाची मला लाज वाटते. ह्या गोष्टी तुला सांगितल्याशिवाय माझें काम भागतें तर उत्तम होतें. परंतु तसें होण्याचा योग नाहीं पद्मिनी, तुझ्या बापाची लाजिरवाणी स्थिति तुझ्याच बापाच्या मुखाने ऐकावयाला सिद्ध हो. ''

तेव्हां पद्मिनी म्हणाली, " बाबा, तुम्ही मला जे सांगितल्यानें तुमच्या मनाला ताप होईल तें ऐकण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. जे तुम्ही इतके दिवस मजपासून गुप्त ठेविलें होतें ते पुढेंही तसेंच राहूं द्या. तें ऐकण्याची माझी इच्छा नाही. तुमच्या योजनेला माझा पूर्ण रुकार आहे असें घेऊन तुम्ही चाला. जी योजना तुम्हाला सुखावह आहे ती मलाही सुखावह आहेच आहे, असलीच पाहिजे. ''

तेव्हां सर्जेराव म्हणाले, "पद्मिनी, तुझी ही पितृभक्ति पाहून मला फार फार आनंद होत आहे. परंतु पद्मिनी, संभाषणाच्याच ओघाने ज्याअर्थी हा विषय उपस्थित झाला आहे, त्याअर्थी तो शेवटास लावणें भाग आहे. तो अर्धवट सोडता कामां नये. सांगतोंच माझी खरी स्थिति काय आहे ती. आज ह्या कासेगांवांत मी अत्यंत श्रीमंत आणि अत्यंत प्रतिष्ठित माणूस गणला जातो आहे. परंतु कार्तिक महिना संपला आणि मार्गशीर्ष महिना उजाडला, म्हणजे ह्याच कासेगावांत मला करवंटी घेऊन भिक्षा मागत हिंडावें लागेल. ह्यापेक्षां अधिक स्पष्टपणें मला बोलण्याची जरूरी नाहीं. ''

हें सर्जेरावांचें भाषण ऐकून पद्मिनीला अत्यंत तीव्र दुःख झालें. तिला आश्चर्यही वाटलें. ती तोंड वासून आणि डोळे पित्याच्या मुखावर निविष्ट करून स्तब्ध राहिली. तिला प्रश्न विचारण्याचीही उमका राहिली नव्हती.

सर्जेराव तिची ही स्थिति पाहून म्हणाले, " पद्मिनी, तुला दुःख आणि आणि आश्चर्य वाटणें साहजिक आहे. परंतु माझी जी खरी स्थिति आहे ती मी तुला सांगितली. माझ्या सर्व जमिनी, माझीं सर्व शेतें, हें माझें राहातें घर आणि त्याच्या सभोंवतालचें सर्व पटांगण, ह्या

घरांतील सर्व जिनसा, ह्या घरांतील सर्व जनावरें, थोडक्यांत सांगावयाचें तर माझ्या मालकीचें म्हणून जें जे तुला वाटत आहे तें तें सर्व आज ग्यानबा वाळुंज ह्यानें विकत घेतलेलें किंवा त्याच्याकडे गहाण पडलेलें आहे. ह्या घराचा दरमाहाचा जो खर्च मी करीत आहें तो खर्च ग्यानबाचें जें मी देणें आहे त्यांत भर पडत आहे. लोकाना ही माझी खरी स्थिति ठाऊक नाहीं आणि तुलाही ती इतके दिवस मीं कळविली नव्हती. ग्यानबाचें असें म्हणणें आहे कीं, मी त्याला जर आपला जांवई करून घेतला, तर तो सर्व कर्जरोखे, सर्व गहाणखतें सर्व खरेदीखतें फाडून टाकील. तसें झालें म्हणजे मी ह्या वडिलोपार्जित घरांत मालकीहक्कानें राहूं शकेन. माझ्या सर्व स्थावर जंगम जिंदगीचा मी खरोखरी मालक म्हणून उपभोग घेत राहीन. मी अत्यंत श्रीमंत आणि प्रतिष्ठित असा जो माझा लौकिक आहे तो कायम राहील, माझी बेअब्रू टळेल आणि मी म्हातारपणीं सुखांत आपले शेवटचे दिवस घालूं शकेन. मी सुखात राहीन तशी तूंही सुखांत राहशील. नाहींतर माझ्या हातात एक करवंटी आणि तुझ्या हातांत एक करवंटी. असें आपणां दोघांना ह्याच गांवांत भीक मागत हिंडावें लागेल. ''

तेव्हां पद्मिनीनें विचारलें, '' बाबा, मी ग्यानबाची बायको झाल्यानें जर तुमचें उत्तर आयुष्य सुखी होत असले तर मी त्याची बायको व्हावयाला कबूल आहें. ''

सर्जेराव आनंदानें उद्गारले, '' बापाच्या सुखासाठीं तूं एवढा आत्मयज्ञ करावयाला सिद्ध झालीस हें पाहून मला आनंद होत आहे. ग्यानबानें मला कार्तिकअखेरपर्यंत मुदत दिली आहे. मार्गशीर्ष महिन्याची प्रतिपदा मला ह्या सर्व जिंदगीचा मालक तरी बघेल किंवा हातांत करवंटी घेऊन भीक मागणारा भिकारी तरी बघेल. ''

तेव्हां पद्मिनी म्हणाली, '' बाबा, आपलें निंबाळकरांचें कुटुंब पांच लाखांचें मालक होते असें लोक म्हणत असत. एवढी मोटी जिंदगी तुम्हीं कशी खर्च केली हें विचारण्याचा मला हक्क नाहीं आणि मी तें विचारीतही नाहीं. पण तुमची हरकत नसल्यास मला तुम्ही हें सांगा कीं ग्यानबा वाळुंज ह्यांचें देणें एकंदर किती आहे ! ''

त्यावर सर्जेराव म्हणाले, " पद्मिनी, जंगम जिंदगी माझ्या अव्यवस्थितपणाच्या राहाणीमुळे माझी मी खर्चून टाकली. स्थावर जिंदगी ग्यानबाने विकत तरी घेतली आहे किंवा त्याच्याकडे गहाण तरी आहे. मी जर त्याला पन्नास हजार रुपये दिले तर मी पुन्हा पाहिल्याप्रमाणे माझ्या सर्व जिंदगीचा खराखुरा मालक होईन, आणि माझा लौकिक शाबूत राहील. पण आज मजजवळ पन्नास हजार कवड्याही नाहींत."

हे पित्याचें भाषण ऐकून पद्मिनीला अतोनात दुःख झालें. ती कांहीं वेळ स्तब्ध बसली. आपल्या भाषणाचा पद्मिनीच्या मनावर इष्ट परिणाम होत आहे असें सर्जेरावांना वाटल्यावरून त्यांना मनांत अतिशय आनंद होत होता. परंतु हा आनंद त्यांच्या मुद्रेवरून प्रकट होत नव्हता. त्यांची मुद्रा दुःखी आणि गंभीर अशी दिसण्यांत दिसत होती.

कांहीं वेळ सर्जेराव आणि पद्मिनी हीं दोघेजण स्तब्ध बसून राहिलीं. मग पद्मिनीनें विचारलें, " बाबा, ग्यानबा वाळुंज ह्यानीं तुम्हाला कार्तिक अखेरपर्यंतची मुदत दिली आहे काय ? "

सर्जेराव म्हणाले, " होय. कार्तिक महिन्याची अमावास्या उलटून गेली. आणि मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेचा दिवस उजाडला आणि त्या दिवसाच्या सूर्यास्ताच्या आत जर मी ग्यानबा वाळुंज याना पन्नास हजार रुपये रोख दिले तर मी त्यांच्या कचाटींतून मुक्त होईन. मी त्यांच्या कचाटींतून मुक्त झालों म्हणजे माझीं शेतें, बागा, मळे, हें माझें राहतें घर वगैरे सर्व स्थावरजिंदगीचा मी खराखुरा मालक होईन. माझ्या गहाण असलेल्या सर्व जंगम जिनसा माझ्या मालकीच्या होतील. त्याला मी खरेदी म्हणून दिलेल्या जिनसा देखील पुनः पहिल्यासारख्या माझ्या मालकीच्या होतील. आज ह्या घरांत जीं भांडींकुंडीं, सामानसुमान, डागदागिने तुला दिसत आहेत ते सर्व त्या ग्यानबाकडे गहाण पडलेले आहेत. माझ्या श्रीमंतीचा देखावा पूर्वीप्रमाणेंच लोकांना दिसत आहे. परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं आज ह्या घटकेला माझ्या मालकीची एक तनसडीही मजजवळ नाहीं. मी ग्यानबाला पन्नास हजार रुपये रोख दिले तर मी त्याच्या तावडींतून सुटेन. पण ही गोष्ट मुसळाला अंकुर फुटण्याइतकी

असंभवनीय आहे. तू जर त्याची बायको झालीस तर ही सर्व अनर्थपरंपरा टळेल. ''

पद्मिनी म्हणाली, '' असें जर असेल तर ग्यानबाशीं माझें लग्न तुम्हीं जुळवा. मी तुमच्या इच्छेच्या आड येणार नाहीं. आणि हेंच मी तुम्हाला पहिल्यापासून सांगत आहें. ''

सर्जेराव म्हणाले, '' हे तूं मला पहिल्यापासून सांगत होतीस हें खरें आहे. आणि माझ्या इच्छेला तू अनुकूल नसतीस तरी मीं तुझें लग्न ग्यानबाशीं लावून दिलेच असतें हेंही तितकेंच खरें आहे. परंतु तुझ्या इच्छेविरुद्ध तुझें ग्यानबाशीं लग्न करून देण्यापेक्षा तुझ्या इच्छेनें तें लग्न झालें तर बरें असें मला वाटत होतें म्हणून मीं तुझी पसंती मिळविण्याचा प्रयत्न केला आणि तो माझा प्रयत्न यशस्वी झालेला पाहून मला आनंद होत आहे. माझी विपन्न स्थिति तुला कळविली असता तुझी पसंती मिळेल अशी माझी खात्रीच होती. ''

तेव्हां पद्मिनी म्हणाली, '' बाबा, तुमची योजना मीं ऐकिली. त्या योजनेप्रमाणे मी वागावयाला सिद्ध आहे. तुम्ही पूर्वीप्रमाणे ह्या घरांत आणि श्रीमंतीच्या वैभवात राहाल. तुमचे म्हातारपण सुखांत जाईल. तुम्ही सुखात असलेले पाहून मला आनंद होईल. मी आत्मयज्ञ केल्यानें जर ह्या गोष्टी साध्य होत आहेत तर मी तो आत्मयज्ञ करावयाला सिद्ध आहें. आपण दोन्हीं माणसें एकदम सुखी होणें शक्य नाहीं. ग्यानबा हा अत्यंत वाईट माणूस आहे. त्याची मी बायको झाल्यानें मी सुखी होणार नाहीं पण तुम्ही सुखी व्हाल. माझ्या सुखाकडे तुम्ही पहाल तर तुमचें सुख अंतरेल. तुमच्या सुखासाठीं मी ग्यानबाची बायको व्हावयाला कबूल आहे. ''

हे पद्मिनीचें उत्तर ऐकून सर्जेरावांना अतिशय संताप आला. ते हाडाचे आप्पलपोटे होते. त्याना स्वताचे विलास, स्वताची बडेजाव, स्वताचें सुख अधिक प्रिय होतें. मुलीच्या सुखाची त्यांना परवा नव्हती. आपण केलेली योजना आपल्या कन्येच्या पसंतीला उतरावी हें सर्जेरावांना पाहिजे होतें. आपला आपलपोटेपणा मुलीच्या लक्ष्यांत येऊं नये हा सर्जेरावांचा प्रयत्न होता तो सरशेल फसला. परंतु आतां ज्यास्ती

थाटामाट करण्याचा कांहीं उपयोग नाहीं असें त्यांना कळून चुकलें. परंतु मुलीचें मत कांहींही असो, आणि संसारांत तिची कांहींही स्थिति असो. आपली वडेजावी कायम राहाणार हा विचार करून त्यांनीं आपल्या मनाचें समाधान करून घेतलें. मग ते मुलीला म्हणाले, " पद्मिनी आपण ह्या गोष्टी बोललो तितक्या पुरे झाल्या. मीं योजलेलें तुझें लग्न मार्गशीर्ष शुक्लप्रतिपदेच्या मुहूर्तावर मी उरकून टाकणार आहे. तूं आतां जा. "

—०—

## प्रकरण ४ थें.

# इलाहीबक्ष आणि त्याचा भाऊ.

दातेगडाच्या गडकरी दावूदभाई याच्या दरबारांत जे मानकरी होते. त्यांत इलाहीबक्ष याचा मान आणि दर्जा मोठा होता. हा इलाहीबक्ष गडाच्या शिबंदीचा सेनापती असून तो शूर, पराक्रमी आणि युद्धाच्या काळचे सर्व डावपेंच पूर्णपणें जाणणारा असल्याबद्दल त्याची प्रसिद्धि झालेली होती.

कांहीं वर्षांमागें दावूदभाई आणि इलाहीबक्ष हे दोघेही विजापुरच्या दरबांत होते तेव्हां दातेगडावर गडकरी कोणाला करावें ह्या संबंधाचा प्रश्न निघाला असतां इलाहीबक्ष याला तो मान मिळेल असा सर्व लोकाचा तर्क होता. खुद्द इलाहीबक्ष ह्यालाही हा मान पाहिजे होता. तो आपणासच मिळेल असा त्याचा तर्क होता. परंतु दावूदभाईचा वशीला अधिक जोराचा असल्यामुळें म्हणा, किंवा इलाहीबक्ष यानें खटपट न केल्यामुळें म्हणा, कारण काय असेल तें असो; पण दातेगडाच्या गडकऱ्याच्या पदावर दावूदभाईची नेमणूक झाली. दावूदभाईही शूर आणि पराक्रमी होता, आणि कर्नाटकच्या मोहिमींत तो नुकताच विजय संपादून आलेला होता; तथापि त्याच्यापेक्षां इलाहीबक्ष हा अधिक शूर आणि अधिक पराक्रमी होता, म्हणून ही गडकऱ्याची जागा इलाहीबक्ष यालाच मिळेल असें सर्वांना वाटत होतें. म्हणून ही

नेमणूक जाहीर झाली तेव्हां सर्वांना आश्चर्य वाटलें, तसेंच इलाहीबक्ष यालाही आश्चर्य वाटलें. परंतु नुसत्या आश्चर्यावरच त्याची मजल थांबली नाहीं. त्याची फार निराशा झाली. बादशहानें त्याला समक्ष बोलावून आणवून सांगितलें होतें कीं, ह्या नंतर आमच्या राज्यांत गडकऱ्याची नेमणूक करावयाची वेळ येईल तेव्हां तुझीच त्या जागीं नेमणूक करूं. ह्या आश्वासनानें इलाहीबक्ष संतुष्ट झाला होता. परंतु दावूदभाईनें गडाचा ताबा घेतल्यावर पंधराच दिवसांनीं बादशहानें इलाहीबक्ष ह्याला दातेगडाच्या शिबंदीवर सेनापति नेमलें. दावूदभाईपेक्षां आपण कर्तबगारीनें वरचढ असता गडकरीपणाचा मान त्याला दिला गेला, आणि त्याच्याच हाताखालीं सेनापतीच्या पदावर आपली नेमणूक झाली म्हणून इलाहीबक्ष याची निराशा झाली. परंतु ह्या निराशेचा परिणाम फार दिवस त्याच्या मनावर टिकला नाहीं. त्याचें वय अवघें चाळीस वर्षांचें होतें. आपणाला यापुढें अनेक संध्या येतील, आणि आपण लवकरच मोठ्या योग्यतेला चढूं अशी त्याला उमेद होती. सेनापति ह्या नात्यानेंही आपणाला लौकिक संपादितां येईल अशी त्याला आशा वाटत होती आणि त्यानें उत्साही मनानें दातेगडास येऊन सेनापतीच्या कर्तव्यांच्या बोजा आपल्या शिरावर घेतला.

दावूदभाई आणि इलाहीबक्ष हे दोघेही पूर्वींचे दोस्त समान दर्जाचे इसम होते तरी दावूदभाई गडकऱ्याच्या पदावर अधिष्टित झाल्याकारणानें आणि इलाहीबक्ष त्यांच्या हाताखालचा नोकर झाल्याकारणानें तो इलाहीबक्ष याच्याशीं दूरपणाच्या नात्यानें वागूं लागला. ह्या सेनापतीनेंही त्याच्याशीं सलगी कमी केली आणि त्याच्याशीं केवळ सभ्य आचाराचें वर्तन चालूं ठेविलें.

इलाहीबक्ष हा वयानें चाळीस वर्षांच्या वयाचा होता. त्याचा चेहेरा भरदार होता. तो वर्णानें गोरा असून अंगानें मध्यम जाडीचा आणि मध्यम काठीचा होता. त्याच्या गात्राच्या सर्व हालचाली तल्लखपणाच्या असून सफाईदार असत.

इलाहीबक्ष हा बुद्धिमान् होता. त्याला अरबी, फारशी, उर्दू, आणि मराठी ह्या चार भाषा चांगल्या अवगत असून ह्या भाषांत तो संभाषण-

ही करूं शकत असे. त्याच्या सेनापतित्वाच्या कर्तव्यांतून जो वेळ त्याला रिकामा सापडे त्या वेळांत तो आरबी आणि फारशी ह्या भाषांतील अभिजात वाङ्मय वाचीत असे.

त्याचे लग्न झालेले होते, पण त्याला संतान नव्हते. त्याची बायको लतीफा हिच्यावर त्याचें अतोनात प्रेम असे, आणि ती हुशार आणि बुद्धिमान् असल्याकारणाने तिला राजकारणांतील डावपेच चांगले समजत असत. ह्यामुळें इलाहीबक्ष हा तिच्याशीं सर्व बाबतींत मोकळ्या मनाने बोलत असे. बायकांना काय समजते, असें म्हणून तो तिचा तिरस्कार करीत नसे. इलाहीबक्ष आपले सर्व बेत, सर्व विचार आपल्या पत्नीला मोकळ्या मनानें बोलून दाखवीत असे. प्रसंगविशेषीं तो तिला सल्लामसलत-सुद्धा विचारीत असे.

इलाहीबक्ष हा इस्लामी धर्माचा कट्टा अभिमानी असे.पण त्याची मतें उदार होतीं आणि तो हिंदूधर्माचा द्वेष करणारा नव्हता.

ह्या इलाहीबक्षाचा भाऊ खुदाबक्ष होता. तो दातेगडावर मुख्य गोलंदाज होता. हे दोघे भाऊ ह्या गडावर एकाच घरांत रहात असत आणि त्यांचें एकमेकावर प्रेम असे. खुदाबक्ष याचेही लग्न झालेले होतें. पण त्याच्या पोटींही संतान नव्हतें. ह्या दोघा भावांच्या बायकाही एकमेकींशीं प्रेमभावानें वागत असत. त्या आपला रिकामपणाचा वेळ कशीदा काढणें वगैरे गोष्टींत घालवीत असत. कशीदा, भरितकाम वगैरे कला शिकण्यासाठी त्यांनीं एक मराठे जातीची मुलगी नोकरीस ठेविली होती. ती मुलगी ह्या कामांत पटाईत होती. ती सुंदर होती, पण दुर्दैवानें ती मुकी आणि बहिरी होती; तथापि कशीदा वगैरे कामांत सूचना देणें, चुका दाखवून देणें हीं कामें ती खुणांच्या साहाय्यानें उत्तमप्रकारें करूं शकत असे.

इलाहीबक्ष आणि खुदाबक्ष ह्या दोघां भावांसंबंधाची वाचकांना थोडीशी ओळख करून देऊन आता आम्ही आपल्या कादंबरीचे कथा-सूत्र पुन्हा हातीं घेतो.

ह्या कादंबरीची आतांपर्यंत जीं तीन प्रकरणे होऊन गेलीं आहेत.

त्यांत सांगितलेल्या हकीगती ज्या दिवशीं आणि ज्या समयीं घडल्या, त्याच दिवशीं आणि त्याच समयीं ह्या दोघा भावांचें जे संभाषण चाललें होतें, तें वाचकाना ऐकविण्यासाठीं आम्हीं वाचकांना दातेगडावरील ह्या दोन भावांच्या घराकडे घेऊन जातों.

ह्या दिवशीं दुपारचीं जेवणें झाल्यानंतर हे दोघे भाऊ आपआपल्या उद्योगाला जावयाच्या अगोदर ते कांहीं वेळ दिवाणखान्यांत पानसुपारी खात बसलेले होते. ह्या वेळीं त्यांचें कांहीं किरकोळ संभाषण चाललें होतें. इलाहीबक्ष ह्याची मुद्रा थोडीशी गंभीर असून ह्या संभाषणांत त्याला फारशी गोडी वाटस नसावी असें त्याच्या तोकड्या भाषणसरणीवरून दिसून येण्याजोगें होतें. ही त्याची वृत्ति त्याच्या धाकट्या भावाच्या लक्षांत यावयाला चुकली नाहीं. आपल्या वडीलभावाच्या मनांत कांहींतरी वेगळे विचार चाललेले आहेत हें खुदाबक्ष यानें तर्किलें, ते कसले विचार होते हें अर्थात् त्याला तर्कितां आलें नाहीं पण त्यानें आपल्या वडीलभावाला तत्संबंधानें कांहीं प्रश्न विचारला नाहीं.

अशाप्रकारें कांहीं वेळ संभाषण झाल्यावर एकदम इलाहीबक्ष आपल्या भावाला म्हणाला, " बच्चाजी, अलीकडे माझ्या मनांत असा विचार येऊं लागला आहे कीं ह्या गडावरील सेनापतीची नोकरी सोडून विजापुरास जाऊन राहावें. ह्या डोंगरीमुलखांत वर्षाचे बारा महिने राहून मला अगदीं एकीकडे पडल्यासारखें वाटत आहे. राजधानींतील कांहीं उलाढाली येथें कळत नाहींत. राजधानींतील आपले दोस्त येथें भेटत नाहींत. ह्या गडावर माझें एकसुरी आयुष्य मला कंटाळवाणें वाटूं लागलें आहे. येथें मला आपल्या अंगचे गुण दाखवावयाची मुळींच संधी मिळत नाहीं. मी विजापुरास असलों म्हणजे मला हुजूरच्या नजरेस वारंवार पडतां येईल. हुजूरला सल्ला मसलत देण्याची संधी वारंवार येईल आणि हुजूरापासून मला एखाद्या मोहिमीवर जाण्याची आज्ञाही मिळवितां येईल. मला माझ्या अंगचे गुण दाखविण्याच्या संधी पुष्कळ प्राप्त होतील. मी ह्या दातेगडावर आहे तो हुजूरच्या नजरेबाहेर आहे. आणि नजरेसमोर जो मनुष्य नसतो त्याचा लवकरच विसर पडतो. "

हें आपल्या वडीलभावाचें बोलणें ऐकून खुदाबक्ष म्हणाला,

" भाईजी, तुम्ही जें म्हणतां तें खरें आहे. येथें तुम्हाला सर्व गोष्टी अनुकूल आहेत, सर्व लोक तुम्हाला मान देतात, खुद्द गडकरीसाहेबही तुमच्याशीं आदराने वागतात हें सर्व खरें आहे. परंतु ह्या गडावरील आयुष्य अगदीं एकसुरी आहे. तुमच्या अंगचे गुण दाखवावयाला तुम्हांला येथें संधी मिळत नाहीं. ह्या दातेगडाच्या मुलखांत पूर्ण शांतता आहे. हिंदूलोक जरी नाराज असले तरी ते बंड करीत नाहींत. तसेंच ह्या गडावर चाल करूनही कोणी हिंदू शत्रु आजपर्यंत आलेला नाहीं. त्यामुळें आपल्या ह्या गडाच्या शिबंदीला कांहींच काम पडत नाहीं. आणि तुम्ही त्याचे सेनापति त्या तुम्हालाही कांहीं कर्तव्य नाहीं. दिवस उगवल्यापासून तो दिवस मावळेपर्यंत आणि दिवस मावळल्यापासून तो पुन्हा दुसरा दिवस उगवेपर्यंत तुम्हाला आणि तुमच्या शिबंदीला कांहींच काम नाहीं. "

त्यावर इलाहीबक्ष म्हणाला, " बच्चा, ह्याच एकसुरीपणाचा मला भारी कंटाळा येऊन गेला आहे. हा आपला दातेगड इतक्या दुर्गम टेकडीवर बांधलेला आहे, आणि त्याची तटबंदी इतकी मजबूत आहे कीं ह्या गडावर कोणी शत्रु हल्ला करावयाला येईल हें अगदींच शक्य नाहीं. त्यामुळें माझी फौज ह्या गडांत वर्षानुवर्षे झोपा घेत पडून राहिली आहे. "

त्यावर खुदाबक्ष म्हणाला, " होय भाईजी. ह्या गडाच्या शिबंदीला कांहीं काम नाहीं. स्वस्थ बसून राहणें हेंच त्यांचें काम होऊन गेलें आहे. स्वस्थ बसण्यासाठींच त्यांना पगार दिला जात आहे. ह्या गडावरील आयुष्य अगदीं एकसुरी आहे. "

इलाहीबक्ष म्हणाला, " हा गड पूर्वी हिंदूंच्या ताब्यांत होता. तो विजापुरच्या बादशहानें जिंकून घेतला. पण कसा घेतला ! त्याच्यावर हल्ला करून नव्हे. कारण हल्ला करणें अशक्यच होतें. त्याने दहाहजार फौजेनें ह्या गडाला वेढा दिला. हा वेढा पांच वर्षे त्यानें सतत देऊन ठेविला होता. गडातील लोकांची अन्नसामग्री पांच वर्षे त्यांना पुरली. ती संपली तेव्हां तो गडकरी शरण आला. मग त्याला आणि त्याच्या शिपायांना गड

सोडून हंवं तिकडे जाण्याला आपल्या मुसलमानफौजेने वाट करून दिली. ते निघून जाताच आपल्या फौजेनें ह्या गडाचा ताबा घेतला. तेव्हांपासून हा गड आपल्या मुसलमानांच्या राज्यांत राहिला आहे. ह्या गोष्टीला शंभर वर्षे होऊन गेलीं. माझ्या सांगण्याचा मतलब हाच कीं ह्या गडावर कोणी हल्ला करील ही गोष्ट अगदीं अशक्य आहे. आज शंभर वर्षे ह्या गडावर कोणी हल्ला केलेला नाहीं. आणि पुढे कोणी हल्ला करील हेंही शक्य नाहीं. ह्यामुळें ह्या गडाच्या गडकऱ्याचे काम स्वस्थ बसून चैन करीत राहावें हे आहे. सेनापतीची आणि शिबंदीची तीच गोष्ट. येथे कोणाला कांही उद्योगच नाहीं. सर्वांचें आयुष्य येथें अगदीं एकसुरी असतें. आपल्या गडाचें आणि गडाखालच्या टापूचें रक्षण करावें एवढेंच काम प्रत्येक गडकऱ्याने करीत राहावें, दुसऱ्या गडकऱ्याच्या हद्दींत ढवळाढवळ करावयाला जाऊं नये अशी बादशहांची सक्त ताकीद आहे. नाहींतर मी ह्या सह्याद्रीवरचे जे गड आज हिंदूंच्या ताब्यात आहेत त्यांचेवर स्वाऱ्या करून ते एव्हांना जिंकून घेऊन आपल्या बादशहाच्या राज्याला जोडून टाकले असते. पण आपला गड सोडून जावयाचें नाहीं अशी आपल्या बादशहांची सर्वांना सक्त ताकीद आहे. त्यामुळे माझा नाइलाज आहे."

---

## प्रकरण ५ वें.

# दोन भावांचें खाजगी संभाषण.



इलाहीबक्ष वर सांगितल्याप्रमाणें असंतुष्टतेचे विचार काढीत होता त्यावेळीं त्याच्या भावाच्या मनांत कांही वेगळ्या जातीचेच विचार चाललेले होते. मग इलाहिबक्षाचें बोलणें संपल्यावर त्याचा भाऊ एकदम त्याला म्हणाला, " शिवाजी ह्या नांवाचा कोणी एक हिंदू पोरगा आपल्या मुसलमानी राज्याला उपद्रव करीत सुटला आहे. त्यानें आपल्याभोंवतीं चारपांचशें मराठे गोळा केले आहेत. ह्या फौजेनिशीं तो शिवाजी पोरगा एकाद्या गडावर हल्ला करतो, तेथील मुसलमान गडकऱ्याला

ठार मारतो आणि तेथे कोणा तरी हिंदूला तो गडकरी म्हणून नेमतो. अशा रीतीनें त्यानें आजपर्यंत पुष्कळ गड जिंकून घेतले आहेत असें म्हणतात. ''

तेव्हां इलाहीबक्ष म्हणाला, " होय मीही असेंच ऐकिलें आहे. पण माझ्या मतानें त्या शिवाजीनें जे गड जिंकून घेतले ते बेवकूब मुसलमान गडकऱ्याच्या ताब्यांत होते. ते गड जिंकून घेण्यात शिवाजीनें कांहीं मोठा पराक्रम केला असें मला वाटत नाहीं. त्यानें त्या गडांवर उत्तम-प्रकारें दरवडा घातला इतकेंच मी म्हणेन. त्यानें कांहीं मोठा पराक्रम केला असें नव्हे. चारपांचशें बाजारबुणगे त्यानें आपल्याभोंवतीं गोळा केले आहेत, आणि बेवकूब बेअकली गडकऱ्यांच्या गडांवर तो शिवाजी दरवडे घालून ते मिळवितो. त्याच्या फौजेत शिस्त असणें शक्यच नाहीं आणि शिवाय जे गड शिवाजीनें जिंकून घेतले आहेत, ते सगळे अशक्त होते, आणि आपल्या मुसलमानी राज्यातून कमी झाले म्हणून आपणाला हळहळण्याचेंही कांहीं कारण नाहीं. ''

खुदाबक्षनें विचारलें, " असें कां म्हणतां भाईजी ? ''

इलाहीबक्ष म्हणाला, " शिवाजीनें जे गड मुसलमानांच्या ताब्यांतून दरवडा घालून मिळविले त्यापैकीं जे गड त्यानें नवथर मिळविले म्हणून माझ्या ऐकिवांत आहेत, ते चारपांच आहेत. भोंपाळगडाचा गडकरी खान हा आपणाला स्वतंत्र म्हणवीत असे. तो आपल्या बादशहाला दरसाल कांहींच खंडणी देत नव्हता. मग तो गड खानाच्या ताब्यांत असला काय आणि शिवाजीच्या ताब्यांत असला काय ! एकच. भोपाळगड शिवाजीनें जिंकून घेतला त्यांत आपल्या राज्याला कांहीं कमी-पणा आला असें मला वाटत नाहीं. ''

खुदाबक्ष म्हणाला, " तुमचें म्हणणें बरोबर आहे. ''

इलाहीबक्ष म्हणाला, " शिवाजीनें कैंजळगड जिंकून घेतला असें म्हणतात. पण त्या गडाचा नबाबदेखील भोपाळगडाच्या खानाप्रमाणेंच आपणाला स्वतंत्र म्हणवून घेत असे, तोही आपल्या बादशहाला कांहीं खंडणी देत नसे. तो कैंजळगड शिवाजीच्या ताब्यांत गेला तर आपल्या बादशहाचें त्यांत काय नुकसान ! ''

खुदाबक्ष म्हणाला, " हेंही खरें आहे. "

इलाहीबक्ष म्हणाला, " शिवाजीनें जंगली जयगड आणि बहिरवगड असे दोन गड जिंकून घेतले असे मी ऐकलें आहे. पण ह्या गडांचे गडकरी आपल्या रयतेला अतोनात गांजून पैसे वसूल करीत असत. बादशहाकडे आपली खंडणी अधिक जावी अशी त्या दोघा गडकऱ्यांत सदोदित चढाओढ चालत असे. ह्या कारणानें प्रजेवर त्याच्याकडून फार जुलूम होत असे. असे गडकरी मुसलमानी राज्यांत असणें ही एका अर्थानें नामुष्कीची गोष्ट होती. त्या दोघांगडकऱ्यांच्या जुलमी रियासतीमुळें आपल्या बादशाहाची बेआबरु मात्र होत असे.बादशहाची बेआबरु करणारे हे दोन गड बादशहाच्या राज्यांतून बाहेर पडले हें एका अर्थानें चांगलेंच झालें असें मला वाटतें. तुला कसे वाटतें ? "

खुदाबक्ष म्हणाला, " मलाही असेच वाटतें. "

इलाहीबक्ष म्हणाला, " तीच गोष्ट गणवंतगडाची. तो गड उस्मानखानाच्या अमलाखाली होता. उस्मानखान जरी साधा आणि सरळ माणूस होता, तरी तो हिंदूंचा फार द्वेष करी आणि तो आपल्या हद्दींत हिंदूंना येऊंच देत नसे. हे त्याचें कृत्य मूर्खपणाचें होतें. हिंदूंची संख्या आपल्या चौपटपाचपट असून त्याना आपल्या हद्दीत यावयाला मज्जाव करणें हा मूर्खपणा होय. हिंदू जर खवळले आणि हिंदूंनी जर शिवाजीच्या मदतीनें त्या गडावरून उस्मानाला उधळून लावले, तर त्यांत त्यांचा कांही गुन्हा नाहीं. हिंदूलोकांशी आपण प्रेमानें वागून त्यांचीं मनें आकर्षण करून घेतलीं पाहिजेत. "

इतकें बोलून इलाहीबक्ष कांहीं वेळ थांबला. मग हलक्या आवाजानें तो पुढें म्हणाला, " बच्चा, खरें पाहिलें असतां आपले ह्या दातेगडाचे गडकरी दावूदभाई ह्यांचेंही वर्तन मला बिलकूल पसंत नाहीं. ते हिंदू लोकांना आपल्या मुलखांत राहूं देतात हें खरें आहे, पण हिंदूंवर ते झजिया कर बसावितात हें माझ्या मतानें गैरशिस्त आहे. ज्यानेंत्यानें आपआपल्या समजुतीप्रमाणें आपआपल्या देवांना भजत राहण्याची परवानगी असली पाहिजे. धर्मावर कर बसाविणें हा मोठा जुलूम आहे. दुर्दैवानें मला जर हिंदूंच्या राज्यांत राहाण्याचा प्रसंग आला, आणि त्या

हिंदू राजानें जर मुसलमान लोकांवर ते मुसलमान म्हणूनच कर लादले, तर मला त्याची चीड येईल आणि बंड करावयाला मी सर्वांच्या अगोदर उठेन. धर्मावर कर बसविणें ही अत्यंत चीड आणणारी गोष्ट आहे. आपल्या गडकऱ्याने हिंदूंवर झजिया कर बसविला आहे,तो मला बिल्कूल पसंत नाहीं. पण मी येथे ताबेदार आहे. मी स्वतंत्र गडकरी असतो, तर असें कधीं केले नसते. मला दावूद्‌भाईचा नोकर ह्या नात्यानें वागावें लागत आहे. त्यानें बसाविलेल्या झजिया कराविरुद्ध मला बोलतां येत नाहीं. तसे मी बोललों तर त्याचा अपमान केला असें होऊन शिवाय मी कच्चा दिलाचा मुसलमान आहे अशी माझी बेआबरू होईल. यासाठीं मी कांहीं बोलत नाहीं पण मला ही दावूद्‌भाईची रिसायत आवडत नाहीं इतकें खरें. म्हणून मला अलीकडे असें वाटूं लागलें आहे कीं, या गडावरची नोकरी सोडून देऊन विजापुरास जाऊन राहावें. पण मी एकदम तसें करणार नाहीं. मी आणखी कांहीं दिवस वाट पाहाणार आहे. ''

खुदाबक्षनें विचारलें, " वाट कशाची पाहाणार ? ''

इलाहीबक्षनें उत्तर दिलें, " आज सकाळीं विजापुराहून गुलाबखान आले ते तुला ठाऊकच आहेत. ''

खुदाबक्ष म्हणाला, " ते आज सकाळीं आले आणि आज तिसरा प्रहरीं किंवा संध्याकाळीं परत जाणार आहेत असें मी ऐकिलें आहे. ''

इलाहीबक्ष म्हणाला, " ज्याअर्थी गुलाबखान पूर्वी सूचना न देतां आले आहेत त्याअर्थी त्यांनीं बादशहांकडून कांहीं तरी आपल्या गडकरीसाहेबांनां तांतडीचा निरोप आणलेला असला पाहिजे, आणि तो कांहीं तरी अत्यंत महत्त्वाच्या कामासंबंधाचा असला पाहिजे असा माझा तर्क आहे. आणि ज्याअर्थी खानसाहेब आजच्या आजच परत विजापुराला जावयाला निघावयाचे आहेत, त्याअर्थी आपल्या गडकरीसाहेबांच्या जबाबाची बादशहाला लवकर जरूरी असेल असा माझा तर्क आहे. बादशहाला आपल्या गडकरीसाहेबांकडून पाहिजे त्या अर्थाचा जबाब न मिळाला तर बादशहा तोच सवाल दुसऱ्या कोणाला तरी

विचारणार असतील. ज्या कामासाठीं गुलाबखान येथें आले आहेत ते काम अत्यंत महत्त्वाचें आणि अत्यंत घाईचे असले पाहिजे. तुला असें नाहीं कां वाटत ? ''

खुदाबक्ष म्हणाला, '' होय, मलाही असेंच वाटतें. पण गुलाबखानाच्या आगमनानें तुमच्या निश्चयावर कसा परिणाम घडू शकेल हें चांगलेंसें माझ्या लक्ष्यांत येत नाहीं. तुम्ही ह्या गडावरची सेनापतीची नोकरी सोडून जाण्याला गुलाबखानाच्या येण्यानें कांहीं उत्तेजन मिळेल किंवा कांहीं अडथळा होईल असें तुम्हांला वाटतें काय ? गुलाबखानाच्या येण्यानें तुमच्या कृतसंकल्पात कसा फरक होऊं शकेल ? ''

त्यावर इलाहीबक्ष म्हणाला, ''कदाचित् मला माझा निश्चय बदलावा लागेल. बादशहांनीं कांहीं काम आपल्या गडकरी साहेबाकडे सोंपविण्याचा विचार केलेला असला, तर कदाचित् माझा त्या कामाशीं संबंध पोंचेल. दावूदसाहेब जर हा गड सोडून एकाद्या कामगिरीवर जावयाचे असले, तर मी ह्या गडाचा तात्पुरता गडकरी होईन. आणि मग ही गडकऱ्याची जागा मला पथकरावी लागेल, नाहीं म्हणून चालावयाचें नाहीं. असें झालें म्हणजे मला विजापुरास जावयाचा बेत रहित करावा लागेल, निदान कांहीं मुदतपावेतोंपर्यंत तरी रहित करावा लागेल. आपले गडकरीसाहेब त्या कामगिरीवर किती दिवस राहातील ह्याचा कांहीं नेम नाहीं. कदाचित् ते त्या कामगिरीवरून परतही येणार नाहींत. तसें झालें म्हणजे मीच ह्या दातेगडावर कायमचा गडकरी म्हणून नेमला जाईन. आणि आपले गडकरी जर वृद्धापकाळाची सबब सांगून बादशहाच्या कामगिरींतून निसटूं लागले, तर ती कामगिरी मजकडे सोंपविली जाण्याचा संभव आहे. तसें झालें म्हणजे अनायासेंच माझा हा दातेगड सुटेल. ''

खुदाबक्ष म्हणाला, '' तुमची विचारसरणी बरोबर आहे. पण गुलाबखानाच्या आगमनाचें कारण आपणांस कळेल तेव्हा पुढचे बेत ठरवितां येतील. ''

इलाहीबक्ष म्हणाला, '' होय. गुलाबखान आणि. दावूदभाई यांचें

खलबत होईल त्यांत कदाचित् मला बोलावतील. कदाचित् गुलाबखान येथून बाहेर पडल्यावर गडकरीसाहेब मला त्यांच्या आगमनाचा हेतु सागतील. आठ दिवसपर्यंत मला जर कांहींच कळलें नाहीं, तर मी येथली नोंकरी सोडीन. पण मला वाटतें कीं, मला गुलाबखानाच्या आगमनाचा हेतु लवकरच कळेल. तो कळल्यावर पुढें काय करावयाचें ह्याचा विचार करावयाचा. न कळलें तर ही नोंकरी सोडावयाची हाही माझा विचार ठरलेलाच आहे."

खुदाबक्ष म्हणाला, "गुलाबखानाच्या येण्याचा हेतू कदाचित् शिवाजीचा बंदोबस्त करण्याच्या कामागिरीसंबंधानेही असेल. तुम्हाला असें नाहीं का वाटत?"

इलाहीबक्ष म्हणाला, "तुझा तर्क कांहीं वावगा नाहीं. शिवाजीचा बंदोबस्त करण्याची कामगिरी मजकडे सोपविण्यात आली, तर मी आठ दिवसांत शिवाजीला पकडून आणूं शकेन. ह्या गडाच्याबाहेर मी माझे तीनहजार शिपायी घेऊन जाऊन माझी मोहीम मी सुरू करीन. शिवाजीनें जिंकून घेतलेले सर्व गड मी परत जिंकून घेईन, आणि बादशहाच्या राज्याला जोडून देईन. ते गड अगदीं अशक्त आहेत. एक एक गड जिंकावयाला दोन-दोन दिवस बस्स होतील. माझ्या कवाइती शिपायांचे पुढें शिवाजीच्या बाजारबुणग्या फटिंगांचा, आणि लुटारूंचा किती वेळ निभाव लागेल? मी त्या शिवाजीच्या लुटारूटोळीची केंव्हाच दाणादाण उडवून देईन. शेळ्यांच्या कळपात लांडगा शिरला म्हणजे शेळ्यांची जी दशा होते, तीच माझ्या सैन्यापुढें शिवाजीच्या सैन्याची होईल."

खुदाबक्ष म्हणाला, "तुम्ही म्हणतां तें खरें आहे."

इलाहीबक्ष म्हणाला, "बचा, आपण धीर धरला पाहिजे. लवकरच काय तें बाहेर पडेल. बरें तूं आतां जा. मी कांहीं वाचीत बसतों."

खुदाबक्ष तेथून उठून आपल्या खोलींत गेला. इलाहीबक्षही आपल्या कामाला लागला.

## प्रकरण ६ वें.

# दातेगडावरील सदर कचेरी.



इलाहीबक्ष ह्याच्या राहात्या घरांमध्यें त्याचें त्याच्या धाकट्या भावाशीं संभाषण चालले होते त्याच वेळीं दातेगडाच्या दुसऱ्या एका भागीं जो वृत्तान्त घडत होता तो वाचकाना कळविणें जरूर आहे. यासाठीं आम्ही त्यांना दातेगडाच्या सदरकचेरीकडे घेऊन जाणार आहों.

ही सदरकचेरी सुमारें एकहजार माणसांना ऐसपैस बसतां येईल इतकी विस्तीर्ण असून तिची पटई दोनअडीच पुरुष उंच होती. ह्या सदरकचेरीच्या चारींभिंतींत विशाल खिडक्या पुरुषभर उंचीवर होत्या. त्यांचे तळ उतरते असल्याकारणाने त्या कचेरींत भरपूर उजेड असून वाऱ्याच्या गतीलाही प्रतिबंध नव्हता.

ह्या एवढ्या विस्तीर्ण सदरकचेरीत ह्या विशिष्टसमयीं दोनच मुसलमान गृहस्थ बसलेले होते. सर्व जमीनीवर पांढरी स्वच्छ बिछायत घातलेली असून एका भिंतीशीं घातलेल्या एका बहुमोल गालिच्यावर दोन लोडांना टेकून हे दोन गृहस्थ बसलेले होते.त्या दोघांच्याजवळ दोन नेचे असून त्यांच्या नळ्या ते मधूनमधून तोंडांत घालून धुराचे लोट हवेंत सोडीत होते.

ह्या दोन गृहस्थांपैकीं एकाचें वय साठीच्या घरात असून त्याचा चेहेरा भव्य आणि अंगलट मजबूत अशी दिसत होती. त्याच्या दाढीचे आणि डोकीचे केश बहुतेक रुपेरीवर्णाचे झाले होते. त्याचा पेहेराव त्यावेळीं अगदीं साधा होता, डोकीवर पांढरी रेशमी कटोरी टोपी असून अंगांत पांढरा स्वच्छ शेरवान आणि पायात पांढरी स्वच्छ विजार होती. दातेगडाचा गडकरी शेखदावूदभाई तो हाच.

त्याच्याजवळ दुसऱ्या लोडाशीं टेकून बसलेला गृहस्थ सुमारें पंचेचाळीस वर्षांच्या वयाचा होता. तो वर्णानें गोरा होता, चेहेऱ्यानें सुंदर होता, आणि अंगलटीनें गुबगुबीत होता. त्याचे डोळे विशाल आणि काळेभोर असून त्यांचें तेज प्रेक्षकाची दृष्टि आकृष्ट करीत असे. त्याचा

पोशाख दरबारी थाटाचा असून त्याची बोलण्याची ढबही दरबारी थाटाची होती. त्याची दाढी अगदी तोकडी असून ती गायदुमाप्रमाणे होती. ह्या गृहस्थाचें नाव गुलाबखान असे होते. विजापुरच्या बादशहाचा कांहीं निरोप दातेगडाच्या गडकऱ्याला सांगण्यासाठी आणि त्याच्याशीं कांहीं खलबत करण्यासाठीं हा गुलाबखान दातेगडावर आला होता.

दातेगडाच्या सदरकचेरींत बसलेल्या ह्या दोन मुसलमान गृहस्थाचा येणेंप्रमाणें वाचकाना थोडासा परिचय करून देऊन त्यांच्या संभाषणाचा कांहीं भाग आमच्या वाचकाना आम्ही ऐकवितो.

विजापुरास दावूदभाईचे जे मित्र होते त्यांच्यासंबंधाने प्रथम कांहीं चौकशी त्याने केली. मग तो गुलाबखानाला संभाषणाचा मार्ग मोकळा करून देण्याच्या उद्देशानें म्हणाला, " खानसाहेब, मी ह्या दातेगडाचा गडकरी झालों, त्या दिवसापासून मला माझे विजापुरचे मित्र फारसे भेटत नाहींत. म्हणून तुम्हासारखे माझे कोणी जुने मित्र भेटले म्हणजे मला आनंद होतो. आज तुमच्या भेटीचा योग मला आला आहे, म्हणून मला फार आनंद होत आहे. "

त्यावर गुलाबखान म्हणाला, " भाईसाहेब, मला पाहून तुम्हाला जसा आनंद होत आहे, तसा तुम्हाला पाहून मलाही आनंद होत आहे. परंतु भाईसाहेब, ह्या माझ्या आनंदांत थोडासा कमीपणा आहे. "

दाऊदनें विचारलें, " तो कसा काय खानसाहेब ? "

खानसाहेब म्हणाला, " बादशहांनीं जो निरोप तुमच्या कानावर घालावयाचा मला हुकूम केला आहे, तो तुम्हाला कळविणे माझ्या जिवावर येत आहे. परंतु हुजूरचा हुकूम अमान्य करणे हा गुन्हा आहे. हुजूरनी मला जो निरोप तुम्हाला सांगावयासाठीं इकडे पाठविले आहे तो तुम्हाला सांगणें प्राप्त आहे. मी जें कांहीं तुम्हाला सांगेन ते माझें सांगणे नसून तें हुजूरचें सांगणें आहे हे तुम्ही मनात घ्या आणि मजवर राग करूं नका. "

दावूद म्हणाला, " खानसाहेब, तुम्ही केवळ निरोप आणणारे. मी तुम्हाला दोष देणार नाहीं. पण तो निरोप तरी काय आहे तें मला सांगा. "

तेव्हा गुलाबखान म्हणाला, " हुजूरचें तुम्हाला काय सांगणें आहे तें सांगतों ऐका. पहिली गोष्ट ही कीं, तुमच्या रयतेमध्यें आज बरींच वर्षे बेदिली आहे, आणि ही बेदिली दिवसेंदिवस वाढत चालली आहे. ह्या बेदिलीचे परिणाम तुम्हाला एकट्यालाच जाचक होतील असें नव्हे. तर सबंध आपल्या मुसलमानी राज्याला जाचक होतील अशी हुजूर साहेबांना भीति वाटत आहे. ही एक गोष्ट तुम्हाला कळविण्याचा हुजूरनीं मला हुकूम केला आहे. "

हें गुलाबखानाचें बोलणे ऐकून गडकरीसाहेबांना राग आला, परंतु तो मनातल्या मनांत चेपून टाकून शांतस्वरानें ते आपल्या पाहुण्याला म्हणाले, " खानसाहेब, माझ्या रयतेमध्यें बेदिली आहे, आणि ती वाढत चालली आहे आणि तिचे भयंकर परिणाम होतील हें जें हुजूरचें म्हणणें, तें साफ चुकीचें आहे. माझ्या रयतेपैकीं जे हिंदू काफीर आहेत, त्यानीं मजविरुद्ध हा विनाकारण बोभाटा केला आहे. हा बेदिलीसंबंधाचा बोभाटा हिंदूकाफीरांनीं दुष्टपणानें केलेला आहे. ह्या बोभाट्याला कांहीं आधार नाहीं. अशा बोभाट्याचें मला कांहीं वाटत नाहीं. असला बोभाटा आणखी दसपट जरी हिंदूकाफीरांनीं केला, तरी त्याचेपासून माझें किंवा हुजूरचे यत्किंचितसुद्धां नुकसान होणार नाहीं. बरें, खानसाहेब, हुजूरचा आणखी काय निरोप आहे ? हुजूरचें सगळें म्हणणें मला प्रथम ऐकूं द्या. मग त्यावर माझें काय म्हणणें आहे तें मागाहून मी तुम्हाला कळवीन. "

गुलाबखान म्हणाला, "भाईसाहेब, हुजूरचें आणखी असें म्हणणें आहे कीं, ह्या बेदिलीमुळें तुमची रय्यत तुमचा मुलूख सोडून दुसऱ्या मुलुखांत राहावयास जात आहे. ह्या कारणामुळें तुमच्या मुलुखाचें उत्पन्न दिवसेंदिवस कमीकमी होत चाललें आहे. "

हें गुलाबखानाचें बोलणें ऐकून गडकरीसाहेबांना फार राग आला आणि ते क्षुब्धस्वरानें म्हणाले, " खानसाहेब, हुजूरचें हेंही म्हणणें निखालस चुकीचें आहे. माझ्या मुलखाचें जें उत्पन्न व्हावयाचें त्यांत मी झजिया कर बसवून भरच घातली आहे. आणि शिवाय हा झजिया कर गुदस्त सालापासून मी दुप्पट केला आहे. ह्यामुळें माझ्या मुलखाचें

उत्पन्न कमीकमी होत न जातां दिवसेंदिवस वाढतच जात आहे असें हुजूरना आढळून येईल. माझ्याविरुद्ध कोणातरी हिंदूकाफिरानें हुजूरच्या कानांत विष ओतलें आहे ह्यांत कांहीं शंका नाही. ''

तेव्हां गुलाबखान म्हणाला, '' भाईसाहेब, झाजिया करापासून होणारें जें उत्पन्न तें खोटें उत्पन्न होय. ते हिशेबात धरता येत नाहीं. तें बाद केलें पाहिजे. तें उत्पन्न चिरस्थायी नसतें हें एक, आणि ते उत्पन्न राज्याच्या बळकटीचें द्योतक नसून, उलट राज्याच्या कमकुवतपणाचें द्योतक आहे. झाजियाचें उत्पन्न ज्या मानानें अधिक त्यामानानें राज्याची बळकटी कमी,असें हुजूरचे म्हणणे आहे.''

हें ऐकून शेखदावूद म्हणाला, '' खानसाहेब, हुजूरचे हे म्हणणें निखालस चुकीचें आहे. हिंदू काफीर हेच आपल्या मुसलमानी राज्याचे दुष्मन होत. त्या हिंदू काफिरांच्याकडून झझिया कराच्या रूपानें आपण जितके पैसे अधिक काढूं, तितकें अधिक निस्त्राण ते होतील. कारण, ह्या जगांत पैसा हें सामर्थ्य आहे. ज्याच्याजवळ फार पैसा, तो फार समर्थ. ज्याच्याजवळ कमी पैसा, तो कमी समर्थ. ज्याच्याजवळ मुळींच पैसा नाहीं त्याला मुळींच सामर्थ्य नाहीं. ह्या दुनियेत पैसा ही कांहीं और चीज आहे. हिंदू काफिरांच्याकडून झझिया कराच्या रूपानें पैसा काढून काढून त्यांना अगदीं निस्त्राण करून टाकलें पाहिजे. हिंदूकाफिर ज्या प्रमाणांत निस्त्राण होतील, त्या प्रमाणात मुसलमानी राज्याची बळकटी अधिक. मी हिंदूकाफिरांवर बसविलेल्या झझिया कराच्यासंबंधानें हुजूरचें म्हणणें मला अगदीं गैरशिस्त वाटतें. पुढेमागे हुजूरना त्यांची चुकी कळून येईल. ''

त्यावर गुलाबखान म्हणाला, '' भाईसाहेब, झझिया करासंबंधानें हुजूरची विचारसरणी तुमच्या विचारसरणीहून वेगळी आहे. हिंदू-लोकांवर प्रसंगविशेषीं झझिया कर बसाविणें जरी रास्त असलें, तरी एकंदरीनें तो वाईटच. कारण, हिंदुलोकांच्या देशांत हिंदूंना हिंदूधर्म पाळावयाची परवानगी न देणें, हा भयंकर जुलूम होय. आपणासारख्या परदेशी, परधर्मी लोकांनीं हिंदूंच्या देशांत येऊन हिंदूंच्याच धर्मावर कर बसविणें हें रास्त नव्हे, असें हुजूरचें म्हणणें आहे. ''

त्यावर दावूदभाई रागानें म्हणाला, "खानसाहेब, मला आपल्या इस्लामी धर्माचा अभिमान आहे आणि प्रत्येक मुसलमानाला इस्लामी धर्माचा अभिमान असला पाहिजे. इस्लामी धर्माचा अभिमान बाद-शहांना आहे त्यापेक्षां मला अधिक अभिमान आहे, हा माझा गुन्हा आहे काय? आपल्या इस्लामी धर्माचा प्रसार होण्यासाठीं आणि काफीरांच्या काफीरी धर्माचा उच्छेद होण्यासाठी हिंदूकाफीरांवर कर लादणे हा गुन्हा आहे काय? ह्या हिंदू काफीरांचा धर्म मोठा विचित्र आहे. ते लाकडाच्या देवांची, दगडांच्या देवांची, धातूच्या देवांची, मातीच्या देवाची, कागदाच्या देवाची पूजा करतात. हे हिंदूकाफीर झाडांना, पर्वतांना, नद्यांना, ओढ्यांना, नाल्यांना भजतात. हे हिंदू-काफीर गायींची, बैलांची, रेड्याची, घोड्यांची, गाढवांची, डुकरांची पूजा करतात. हे हिंदू काफीर जगांतील प्रत्येक वस्तूची पूजा करतात हा का धर्म म्हणावयाचा? आणि असल्या धर्माचे लोक जितके कमी होतील तितके कमी करण्याचा प्रयत्न करणें हा काय गुन्हा आहे? असल्या लोकांनीं इस्लामी धर्माचा स्वीकार केल्यानें त्यांचें कल्याणच होईल. हे हिंदू काफीर बडे बदमाष असतात. ते मोठे लबाड असतात. ते मोठे विश्वासघातकी असतात. म्हणून झिझिया कराच्या रूपानें त्यांचा हा पैसा हरण करून त्यांना निस्त्राण करून सोडल्यानेंच मुसलमानी राज्याला बळकटी येईल असें माझें प्रामाणिक मत आहे. हुजूरच्यापेक्षां माझें मत खऱ्या मुसलमानाला शोभेसें आहे कीं नाहीं हें तुम्हीच सांगा खानसाहेब."

त्यावर गुलाबखान म्हणाला, "भाईसाहेब, माझें मत काय आहे किंवा तुमचें मत काय आहे हा प्रश्न नाहीं. हुजूरचें मत काय आहे हें आपणाला पाहिलें पाहिजे. तुम्ही आणि मी असे आपण दोघेही जण विजापुरच्या बादशहाचे नोकर आहों. आपण आपल्या मालकाच्या इच्छेप्रमाणें वागलें पाहिजे. आपली स्वतांचीं मतें कांहींही असलीं तरी आपण बाजूला ठेविलीं पाहिजेत."

त्यावर दावूदभाई म्हणाला, "तें तर खरेंच आहे.पण तुम्ही मला तुमचें स्वतःचें मत म्हणून सांगा. माझ्या करण्यांत कांहीं तकशीर आहे काय?"

तेव्हा गुलाबखान म्हणाला, "भाईसाहेब, माझें स्वतांचें मत काय

तें मी तुम्हाला सांगावयासाठीं येथें आलेला नाहीं. बादशाहाचें मत तुम्हाला सांगावयाला मी आलेला आहे."

तेव्हां दावूदभाईनें विचारलें, "बरें, हुजूरसाहेबांचा मजवर आणखी कांहीं टपका आहे काय ?"

गुलाबखान म्हणाला, "हुजूरचें तुम्हाला असें सांगणें आहे कीं हिंदूलोकांचीं मनें न दुखावतील अशा रीतीनें तुम्ही वागल्यास आपल्या मुसलमानी राज्याला बळकटी येईल. तुमची हल्लींची रियासत अशी आहे कीं हिंदू लोकांना तुम्ही आपले शत्रु बनवून घेत आहां, आणि परिणामीं असें होईल कीं, तुमच्याविरुद्ध जे हिंदू उठतील, ते आपल्या विजापुराच्या मुख्य राज्याला धोका आणल्याशिवाय राहणार नाहींत. कांही दिवसामागें तुम्ही ह्या गडाच्या जवळपासून कांहीं अंतरावर असलेलीं हिंदूंचीं देवालयें पाडवून तेथें कांहीं मुसलमान लोकांची वसाहत करविली आहे, अशा अर्थाच्या तकरारी हुजूरच्या कानापर्यंत गेलेल्या आहेत. अशा तुमच्या कृत्यांनीं मुसलमानी राज्याविरुद्ध फार बेदिली माजते."

त्यावर दावूदभाई म्हणाला, "खानसाहेब, लांबून तकरारी कानावर आल्या म्हणजे त्या फार भयंकर अशा वाटतात. परंतु जवळून पाहिलें म्हणजे त्यांत कांहीं अर्थ नाहीं असें तेव्हांच नजरेस येतें. माझ्या ह्या गडांतील जनावरांसाठीं गवत रचून ठेवावयाला तीच जागा सोयीची आहे. ती गडापासून जवळच असून पुन्हा निवाऱ्याची जागा आहे.त्या-जागीं एकमेकांपासून थोड्याशा अंतरावर हिंदू काफिरांचीं दोन देवळें होतीं. ह्या दोन्हीं देवळांत हिंदू काफीरांचे दोन शेपूटवाले देव होते. एक देव माकडासारखा होता. त्याला ते काफीर मारुति म्हणत असत. एक देव माणसाच्या तोंडाचा आणि सिंहाच्या शरीराचा होता. त्याला ते काफीर नरसोबा असें म्हणत असत. ह्या शेपूटवाल्या देवांचीं देवळें खणून काढवून मी तेथें गवताच्या गंज्या रचविल्या आणि त्यांच्या रक्षणासाठीं चार बाजूस चार चौक्या बांधविल्या. माझे चौकीदार त्या ठिकाणीं आपलीं बायकामुलें घेऊन राहातात. गंज्यांच्या रक्षणासाठीं रखवालदार लोकांना रहावयाला घरेंदारें बांधविलीं हा मी गुन्हा केला असें हुजूरचें

मत आहे काय ? माझ्या गडावरील जनावरासाठीं गवत खरेदी करून तें गंजीच्या रूपानें रचून ठेवविणें हा गुन्हा आहे काय ? "

तेव्हां गुलाबखान म्हणाला, " भाईसाहेब, तुम्ही हिंदूंचीं देवळें पाडवून हिंदूंच्या मनोभावना दुखविल्या असें हुजूरचें म्हणणें आहे. "

तेव्हां दावूदभाई आवेशानें म्हणाला, " खानसाहेब, शेपूटवाल्या देवांना भजणारे लोक माणसें नव्हत. तींही शेपूटवालीं जनावरेंच होत. आणि जनावरांचीं कसलीं मनें आणि कसच्या त्यांच्या भावना ! बरें, खान-साहेब, हुजूरचें आणखी काय म्हणणें ? "

तेव्हां गुलाबखान म्हणाला, " होय, भाईसाहेब, हुजूरचें आणखी पुष्कळ म्हणणें आहे. पण तें बरेंच नाजूकस्वरूपाचें आहे. तें तुम्हाला सांगावयाला मी प्रथम तंबाखू ओढून तयार होतों. बोलण्याच्या आवेशांत मी नेच्याला साफ विसरून गेलो होतो. मी आधीं ह्या नळींतून दहापंधरा झुरके ओढून हुशार होईन, आणि मग तुम्हाला हुजूरचा बाकीचा निरोप सांगेन. तुम्ही लावा नळी तोंडाला. दहा पांच झुरके ओढून तुम्ही हुशार व्हा म्हणजे हुजूरचा निरोप तुम्ही शांत मनानें ऐकूं शकाल. "

दावूदभाई म्हणाला, " ठीक आहे. "

असें म्हणून त्या दोघांही सरदारांनीं नेच्यांच्या नळ्यांतून धूर ओढण्याला सुरवात केली. ह्यावेळीं त्या दोघांचें संभाषण बंद होतें.

---

## प्रकरण ७ वें

# गुलाबखानानें आणलेला निरोप

---

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें दावूदभाई आणि गुलाबखान ह्या दोघांनीं धूम्रसेवनाला सुरवात केली. हे धूम्रपान सुमारे पाव घटका चालल्यावर दातेगडाचा गडकरी तोंडांतून नेच्याची नळी काढून विजा-पुराहून आलेल्या सरदाराला ह्मणाला, " खानसाहेब, आतां तुम्ही आणि

मी हुशार झालों आहों. बोला तर हुजूरचें आणखी काय म्हणणें आहे ? ”

तेव्हां गुलाबखान नेच्याची नळी तबकांत ठेवून म्हणाला, “ भाईसाहेब, ऐका. तुमचा मुलगा हमीद हा हिंदूंच्या सुंदर मुली पळवून आणून भ्रष्ट करतो असा फार बोभाटा आहे, तर तुम्ही हमीदला तंभी भरावी अशी हुजूरची इच्छा आहे. ”

दावूदभाई म्हणाला, “ हे पहा खानसाहेब, असल्या क्षुल्लक गोष्टींकडे आपण काणाडोळाच केला पाहिजे. तरुण माणसें तरुणपणीं तरुणपणाचें सर्वप्रकारचे ढंग करणारच. तो सृष्टीचा नियमच आहे. त्यांत कांहीं फारसें गैर आहे असें मला वाटत नाहीं. तसले ढंग तरुणपणींच तुम्ही केले आहेत, मी केले आहेत, आणि खुद्द हुजूरनींही केलें आहेत. माझ्या मुलानें तसे ढंग केले तर त्याला आपण दोष कां द्यावा ? माझें म्हणणें खरें आहेना, खानसाहेब ?”

तेव्हां गुलाबखान म्हणाला, “ भाईसाहेब, आपण कांहीं पातकें केलीं म्हणून आपल्या मुलांनीं तींच पातकें करावीं, ही विचारसरणी मला मान्य नाहीं. आणि तुम्ही ह्यासंबंधाने हुजूरचे नाव काढतां तें मला बरोबर वाटत नाहीं. आपल्या पादशहांचे नांव आपण आपल्या साध्या बोलण्यांत काढूं नये. आपले बादशहा आपणाला वंद्य आणि पूज्य आहेत. पण भाईसाहेब, तें जाऊं द्या. तुम्ही आपल्या मुलाला ताकीद द्यावी हें बरें. ”

दावूद म्हणाला, “ मी माझ्या हमीदबाळाला ताकीद देईन. पण खानसाहेब, तुम्हाला मी एक गोष्ट सांगून ठेवतों. माझा मुलगा आज गद्धेपंचवींशींत आहे. त्याला उपदेश करणें हें पालथ्या घागरीवर पाणी ओतण्याप्रमाणें निष्फळ आहे. तें असो. हुजूरचें आणखी काय म्हणणें आहे ? ”

गुलाबखान म्हणाला, “ भाईसाहेब, हुजूरचें म्हणणें असें आहे कीं तुम्ही आपल्या रयतेंत पसरत असलेली बेदिली हरप्रयत्नानें नाहींशी करण्याचा प्रयत्न करावा. हल्लीं आपल्या मुसलमानी राज्याविरुद्ध हिंदूंच्या मनांत बेदिली वाढत चालल्याकारणानें हिंदू लोक आपली

मुसलमानांचीं राज्यें उलथून पाडण्याच्या प्रयत्नाला लागलेले आहेत. शिवाजी ह्या नांवाचा एक मराठे जातीचा हिंदू पोरगा मावळे लोक गोळा करून एकामागून एक डोंगरी किल्ले सर करीत चालला आहे. तेथून मुसलमान किल्लेदारांना हांकलून देऊन तेथें तो हिंदू गडकरी नेमीत चालला आहे. आपल्या विजापुरच्या पादशहाच्या ताब्यांतील दहापांच किल्ले त्याने आजपर्यंत अशा रीतीनें हिसकावून घेतले आहेत. असाच क्रम ह्या शिवाजीचा चालू राहिला, तर विजापुरचें राज्य लवकरच संपुष्टांत येईल. म्हणून आपण हिंदू रयतेत बेदिली उत्पन्न होऊं देतां कामा नये. हिंदू रयतेचा आपल्या मुसलमानी रिसायतीला पूर्ण पाठिंबा असला, तर ह्या शिवाजीचें आपल्याविरुद्ध कांहीं चालणार नाहीं. आपली रय्यत बेदील झाली तरच ती शिवाजीला मिळेल आणि तेणें-करून शिवाजीचें सामर्थ्य वाढेल. म्हणून भाईसाहेब, तुम्ही आपल्या रयतेंत बेदिली वाढत आहे ती हरप्रयत्नानें नाहींशी केली पाहिजे, नाहीं तर तुमची रय्यत शिवाजीला सामील होऊन तुम्हांला ह्या दाते-गडावरून गाशा गुंडाळावयाला भाग पाडील."

हें गुलाबखानाचें लांबलचक भाषण चाललेलें असतां दावूदभाई गालांतल्यागालांत हंसत होता. आणि तें भाषण संपलें तेव्हां तर तो खो खो करून मोठमोठ्याने हंसत सुटला. त्याच्या हंसण्याचा आवेश ओसरल्यावर तो म्हणाला, "खानसाहेब, माझ्या वयाला साठी उलटली आहे. मला म्हातारचळ लागला तर सृष्टिक्रमाप्रमाणें तें क्षम्य होईल. पण आपले बादशहा माझ्यापेक्षां पुष्कळच तरुण असून त्यांना म्हातार-चळ लागला आहे हें स्पष्टपणें दिसत आहे. शिवाजी तो काय, आणि त्याची इतकी भीति ती कशाला? मी असें ऐकिलें आहे कीं, शिवाजी हें पोरगें सतराआठराच्या उमरीचें आहे. त्याला अझून मिसरूडही फुटलें नाहीं! त्या पोरग्याची काय किंमत? आणि त्याची इतकी भीति बाळगण्याचें काय कारण? ह्या हिंदूकाफिरांचा शिमगा म्हणून एक सण आहे. ह्या सणामध्यें पोरें पोरें जमा होतात, एका पोराला म्होरक्या करतात, त्याच्या पुढारीपणाखालीं हे पोरगे शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या घरांत किंवा शेतांत घुसतात, लांकडेंगोंवऱ्या दांडगाईनें लुटून आणतात

आणि कोठें तरी त्यांची रास करून तिला आग लावून देतात. ह्या शिमग्याच्या सणांत हिंदूकाफिरांचीं पोरें जशी लुटालूट करतात, तशीच लुटालूट ह्या शिवाजी पोरग्यानें चालविली आहे. तो गडामागून गड घेत सुटला आहे. पण त्याचे हे चाळे बंद करावयाला किती उशीर ? आपलें मुसलमानी सैन्य त्याच्याविरुद्ध चाल करून गेले तर शिवाजीचे हे लुटारूपणाचें धंदे तीन दिवसांत बंद करून टाकतां येतील. त्या शिवाजी पोरग्याची आपल्या बादशहांना इतकी भीति वाटत आहे ह्याचें मला आश्चर्य वाटत आहे. जे गड शिवाजीनें आजपर्यंत घेतलें त्या गडांचे गडकरी बेवकूब होते म्हणून शिवाजीला ते गड घेतां आले. माझ्या ह्या दातेगडावर शिवाजी कसा येतो तो पाहातों ! माझा गड मजबूत आहे आणि लढण्याच्या कामांत मी पटाईत आहे. ”

यावर गुलाबखान म्हणाला, “ तुमचा हा दातेगड फारच मजबूत आहे. या गडावर शिवाजी कधीं हल्ला करणार नाहीं. ”

तेव्हां दावूदभाई फुशारून म्हणाला, “ होय, खानसाहेब, तुम्ही म्हणतां तसा माझा हा गड फार मजबूद आणि भक्कम आहे. हा गड ज्या डोंगरावर बांधलेला आहे त्या डोंगराइतका उंच डोंगर ह्या दहा पंधरा कोशांच्या टापूंत एकही नाहीं. माझ्या गडाची तटबंदी पंधरा हात रुंद असून ती चार पुरुष उंच आहे, आणि ह्या तटबंदीच्या खालीं चारी बाजूंनीं भिंतीसारखे भयंकर कडे तुटलेले आहेत. तटावर वराती टाकून वर चढून येणें शक्य नाहीं. तटाच्या भिंतीचे चिरे इतकें कळाशीनें रचलेले आहेत कीं कोणत्याही दोन चिऱ्यांत सुई खुपसूं म्हटलें तरी तें शक्य नाहीं; मग पहारीची गोष्ट तर दूरच ! ”

तेव्हां गुलाबखान म्हणाला, “ भाईसाहेब, तुम्हीं म्हणतां तें खरें आहे. तुमच्या गडाइतका मजबूत गड आजूबाजूच्या पंधरावीस कोशांच्या टप्यांत एकही नाहीं. हा गड घेणें शत्रूला अगदीं अशक्य आहे. ”

त्यावर दावूदभाई अभिमानानें म्हणाला, “ होय, माझा गड अगदीं अजिंक्य आहे. माझ्या गडाकडे वाकड्या नजरेनें पाहाण्याची त्या शिवाजी पोरग्याची छाती होणार नाहीं. ह्या माझ्या गडाच्या जोरावर मला पंधरावीस मैलांच्या टापूवर अंमल करतां येईल. शिवाजीनें आज-

पर्यंत जे आपल्या बादशहाच्या अमलांतील गड लुबाडले आहेत ते मी ह्या माझ्या दातेगडाच्या जोरावर तीन महिन्यांच्या आंत परत जिंकून घेईन, इतकेंच नव्हे, तर त्या शिवाजी काफीराच्या शरीराचे राईराई येवढे तुकडे करून दहादिशास फुंकून टाकीन. हुजुरनी मला हुकूम केला तर मी शिवाजीनें हिरावून घेतलेले सर्व गड तीन महिन्याच्या आत जिंकून घेईन आणि त्या काफीराच्या पोराला पाहिजे तर जिवंत पकडून हुजूरच्या पायांपाशीं उभा करीन!"

ह्यावर गुलाबखान म्हणाला, "शाबास, दावूदभाई, शाबास! तुमची किती धमक आहे हें आजमावून पाहाण्यासाठींच मला हुजूरनीं मुद्दाम इकडे पाठविलें आहे. ह्या शिवाजीपोरानें आपल्या राज्यात जी बंडाळी मांडली आहे, तिला आळा घालावयाचें काम पतकरणारा कोणी तरी माणूस हुजूरना पाहिजे आहे. त्यांनीं दरबारांतील पुष्कळ सरदारांना विचारून पाहिलें; परंतु शिवाजीचा बंदोबस्त करायला कोणीही पुढें आला नाही. म्हणून हुजूरनीं मला मुद्दाम तुमच्याकडे पाठविलें आहे. तुम्ही हें काम पथकरावयाला तयार आहां, हे पाहून मला भारी आनंद होत आहे. ज्या कारणासाठीं मला हुजुरनीं इकडे पाठाविलें, तें काम मी फत्ते करून आलों म्हणून हुजूर मला शाबासकी देतील. बरें दावूदभाई, हुजूरनीं मला आणखी असेंही सांगून ठेविलें आहे कीं, तुम्ही जर ह्या शिवाजीचा बंदोबस्त करण्याचें काम पथकरीत असाल, तर तुम्हाला लागेल तो पैसा आणि लागेल ती युद्धाची सामग्री आम्ही पुरवूं. हुजूरच्या खजीन्यांत पैशाचा कांहीं तोटा नाहीं. तोटा आहे काय तो धमकदार पुढारी माणसांचा!"

हें गुलाबखानाचें भाषण ऐकून दावूदभाई म्हणाला, "खानसाहेब, मला शिवाजीचा बंदोबस्त करावयाच्या कामीं किती पैसा लागेल आणि काय काय सामग्री लागेल आणि मी कोणकोणच्या हिकमती योजीन, हें मी तुम्हाला मागाहून सांगेन. पण मला आधीं हें तुम्ही सांगा. शिवाजीचा बंदोबस्त करावयाला मी तयार आहे कीं नाहीं हा हुजूरांचा प्रश्न तुम्ही मला पहिल्याप्रथमच कां नाहीं विचारला? अगोदर माझ्या रयतेंतील बेदिलीबद्दल आणि माझ्या हमीदबाळाच्या ढंगाबद्दल बोलणें कां काढ-

लेंत ? त्याच्यासंबंधानें बोलण्यांत आपला विनाकारण बराच वेळ गमावला. शिवाजीचा बंदोबस्त करण्यासंबंधाची हुजूरची इच्छा तुम्ही मला प्रारंभीच कळविली असती, तर आपणाला त्यासंबंधानें पुष्कळ गोष्टी बोलावयाला वेळ सांपडला असता. ''

त्यावर गुलाबखान म्हणाला, '' भाईसाहेब, मी क्रमाक्रमानें तुमच्या हृदयांतील विचार काढीत गेलों. शिवाजीचा बंदोबस्त करावयाला तुम्ही तयार आहां काय असें मी एकदम तुम्हाला विचारलें असतें, तर तुम्ही ' होय ' असें मला उत्तर दिलें असतें. पण तुमच्या ह्या उत्तरावरून मला तुमची खरी धमकदारी दिसली नसती. तुम्ही हुजूरनां खूष करण्यासाठीं हें उत्तर देत आहां किंवा खऱ्या धमकदारीनें हें उत्तर देत आहां, हें समजण्याचा मला कांहीं मार्ग नव्हता. तुमच्या हिंदूरयतेच्या बेदिलीला तुम्हीं कितपत डरतां, हें मी अगोदर आजमावून पाहिलें. हिंदूंच्या बेदिलीला तुम्ही यत्किंचित्‌ही किंमत देत नाहीं, हें पाहून मला अतोनात आनंद झाला. हिंदूंच्या धर्माविषयीं तुमच्या मनांत पक्का द्वेष आहे, हिंदूकाफिरांचा रानटीधर्म नेस्तनाबूद करण्याचे तुम्ही प्रयत्न करीत आहां, तसेंच शिवाजीच्या लुटारूपणाच्या कृत्यांची तुम्हाला कांहीं डर वाटत नाहीं, हें पाहून मला आनंद झाला आणि शिवाजीला चिरडून टाकण्याला तुम्हीच पूर्णपणें समर्थ आणि लायख आहां, अशी माझ्या मनाची पक्की खातरी झाली आणि तुम्ही आपण होऊन आपली धमकदारी बोलून दाखविलीतच. हल्लीं भाईसाहेब,तुम्हाला मी खरें सांगतों कीं, विजापुरच्या दरबारांत धमकदार असा एकही मनुष्य नाहीं. जो तो डरतो.धडाडीनें एकही मनुष्य पुढें येत नाहीं. म्हणून हुजूरनीं मला तुमचेकडे पाठविलें, तुमच्याशिवाय दुसरा कोणी इसम हुजूरला दिसला नाहीं, म्हणून हुजूरनीं तुम्ही हें काम पथकरावयाला कितपत तयार आहां हें आजमावण्यासाठीं मला इकडे पाठविलें. भाईसाहेब, आम्ही लोक मुत्सद्देगिरींत पटाईत; प्रत्यक्ष लढाईच्या मोहिमी चालविणें ही गोष्ट वेगळी. प्रत्येक माणसाच्या अंगांत सर्व गुण कधींच नसतात कोणी उत्कृष्ट मसलती सांगण्यांत वाकबगार असतात, कोणी मिष्कीन मुत्सद्दी असतात, कोणी उत्कृष्ट लढवय्ये

असतात, कोणी उत्कृष्ट सेनापति असतात. तुमच्या अंगांत लढाईची मोहीम चालविण्याची कला आहे. शत्रूला कैचींत कसा पकडावा, शत्रूच्या हालचाली कशा हेराव्या, शत्रूच्या हिकमती कशा हाणून पाडाव्या वगैरे गोष्टी तुम्हाला चांगल्या समजतात. दहाबारा वर्षांमागें तुम्ही कर्नाटकांतील मोहीमींत कशी फत्ते मिळवून आला, ही गोष्ट हुजूरच्या लक्ष्यांत अद्यापि आहे. तेच मला म्हणाले, ह्या शिवाजीचा बंदोबस्त करावयाला समर्थ असा कोणी माणूस असला तर तो दातेगडाचा गडकरी शेख दावूदभाई हाच कायतो एक आहे. म्हणून हुजूरनीं मला तुमच्याकडे मुद्दाम पाठाविलें. तुम्ही कर्णाटकाची मोहीम करून विजयी होऊन आला त्या गोष्टीला दहाबारा वर्षें होऊन गेलीं आहेत. त्यावेळीं तुम्ही ऐनजवानींत होता. आतां उतारवयामुळें तुम्ही कितपत थकला आहां, तुमची धमकदारी कितपत थिजली आहे, तुमचें पूर्वीचें अवसान अझून कितपत शाबूद आहे, हें तुम्हाला भेटून समक्ष पाहून यावें, अशी हुजूरची मला आज्ञा झाल्यावरून मी तुमच्या भेटीस आलों आणि तुम्ही वार्द्धक्यानें मुळींच थकला नाहींत, तुमची धमकदारी शाबूद आहे, तुम्ही शिवाजीचा बंदोबस्त करावयाला तयार आहां, हें पाहून मला आनंद झाला. बरें तें असो. मी हुजूरनां तुमचा उलट निरोप काय सांगूं ?"

तेव्हां दावूदभाई म्हणाला, "खानसाहेब, तुम्ही हुजूरनां असें सांगा कीं मी शिवाजीचा बंदोबस्त करण्याचें काम पतकरतों. मी हें काम करावयाला पूर्णपणें समर्थ आहे असें हुजूरचें मत आहे हें पाहून मला भारी आनंद होत आहे. माझ्यासंबंधाचें हें जें हुजूरचें मत आहे तें अगदीं बरोबर आहे हें मी आपल्या कृतीवरून हुजूरच्या नजेरस आणून देईन. प्रथम दोन महिने मी माझे गुप्त हेर शिवाजीकडे आणि शिवाजीच्या मित्रांकडे पाठवून शिवाजीचें सामर्थ्य अजमावून पाहीन. पैशाच्या, अधिकाराच्या, मानाच्या लोभाला शिवाजीचे कोणकोण मदतनीस सल्लागार वश होण्याजोगे आहेत हें ठरवीन, शिवाजीशीं विश्वासघात करावयाला कोणकोण लोक तयार आहेत हें पाहीन; मग प्रत्यक्ष मोहीम मी चालूं करीन. ह्या मोहिमीला किती पैसा लागेल, आणि कोणकोणची युद्धसामग्री लागेल, ह्याचा आजमास मी बांधीन, आणि मग हुजूरकडे तितक्या पैशाची आणि तितक्या सामग्रीची मागणी करीन. ही सामग्री

मला मिळतांच मी प्रत्यक्ष मोहीम सुरू करीन. शिवाजीनें आजपर्यंत आपल्या मुसलमानी राज्यांतून जे जे गड लुबाडून घेतले आहेस, ते ते सर्व मी परत जिंकून घेईन आणि हुजूरचा हुकूम होईल त्याप्रमाणे शिवाजीला हुजूरच्या पायापुढे जिवंत आणून उभा करीन किंवा शिवाजीचें शिर भाल्याच्या टोकांवर खोंचून आणीन. पण गुजलाबखान, ह्या कामीं मला हुजूरचा लेखी हुकूम पाहिजे. शिवाजीचा बंदोबस्त करण्याची कामगिरी हुजूरनीं मजकडे सोपविली आहे, अशा मजकुराचें मला हुजूरकडून पत्र आलें पाहिजे. ''

तेव्हां गुलाबखान म्हणाला, '' आलबत, आलबत! तसें पत्र तुम्हाला येईलच. मी इकडे आलों तो तुमची शरीराची शक्ति आणि मनाची धमकदारी किती आहे हें पाहण्यासाठीं आलों. मी परत विजापुरास गेलों म्हणजे तुमचा उलट निरोप हुजूरना सांगेन. मग हुजूर सहीशिक्क्या-निशीं तुम्हांला शिरस्त्याप्रमाणें पत्र पाठवितील. मग तुम्हीं शिवाजीचा बंदोबस्त करण्याच्या कामाला लागा. ''

दाऊदभाई म्हणाला, '' बेश ! उत्तम ! ''

तेव्हां गुलाबखान म्हणाला, '' भाईसाहेब, मी ज्या कामासाठीं तुमच्याकडे आलों होतों तें काम झालें. आतां मी आपली रजा घेतों. ''

तेव्हां दावूदभाई म्हणाला, ''वाहवा खानसाहेब! वाहवा खानसाहेब! वाहवा खानसाहेब ! तुम्हीं हुजूरच्या दरबारचे बडे मानकरी, तुम्हीं हुजूरच्या भरंवशांतील असामी आणि शिवाय तुम्हीं माझे लहानपणचे दोस्त. असें असून तुमचा योग्यतऱ्हेनें पाहुणचार न करतां तुम्हांला परत पाठवून द्यावें, हें योग्य आहे काय ? तुम्हीं दोन दिवस रहा. उद्यां तुम्हांला आह्मीं थाटाची जिआफत देऊं, आणि परवां तुम्हाला जाव-याला परवानगी देऊं. ''

त्यावर गुलाबखान म्हणाला, '' माफ करा, भाईसाहेब, माफ करा. मला हुजूरनीं ताबडतोब परत यावें असा हुकूम केला आहे- दुपारीं आह्मीं तुमची जिआफत घेतलीच आहे; आणि शिवाय मी परत विजापुरास गेल्याबरोबर हुजूर मला आणखी एका कामगिरीवर पाठ-विणार आहेत. ती कामगिरी कोणती, हें मला हुजूरनीं सांगि-

तलें नाहीं पण ती कामगिरी अत्यंत निकडीची आणि अत्यंत महत्वाची आहे, असें हुजूरनीं मला सांगितलें आहे; आणि तीन दिवसांच्या आंत परत विजापुरला यावें असा मला हुजूरनीं सक्तीचा हुकूम दिला आहे. हा हुकूम मला मोडतां येत नाहीं, म्हणून माझा नाइलाज आहे. माफ करा, भाईसाहेब, मला परत जावयाची परवानगी द्या. तुह्मी शिवाजीचा बंदोबस्त करून विजयी होऊन परत आला, म्हणजे तुमचा पाहूणचार घ्यावयाला मी मुद्दाम येईन. पण मला आजच आणि आतांच परत जावयाला मोकळीक द्या. ''

तेव्हां दावूदभाई निराशेच्या मुद्रेनें म्हणाला, "तुम्हाला आजच्या आजच विजापुरला जावयाला निघाले पाहिजे असा तुम्हाला हुजूरचा हुकूम आहे म्हणतां तेथें माझा नाइलाज आहे. हुजूरच्या हुकमाप्रमाणें वागणें तुम्हांला आणि मला भाग आहे. मी तुमची आतांच्या आतांच रवानगी करून देतों. ''

असें म्हणून दावूदभाई सदर कचेरींतून उठला. त्यानें आपल्या नोकरांचाकरांना हुकूम दिले. गुलाबखान आणि त्याच्या तैनातींतील दहाबारा माणसें यांची दातेगडावरून रवानगी करून देण्यासंबंधाच्या सर्व गोष्टींची झटपट सिद्धता झाली. हीं सर्व माणसें दातेगडाच्या मुख्य दरवाज्यानें म्हणजे पश्चिमाभिमुख दरवाज्यानें बाहेर पडलीं. दावूदभाई ह्या दरवाज्यापर्यंत त्यांना [illegible] गेला होता हें सांगणें नलगे.

---

## प्रकरण ८ वें.

# दावूदभाई आणि हमीदभाई.



विजापुरचे मानकरी गुलाबखान ह्यांची दातेगडावरून रवानगी करून देऊन दावूदभाई परत आपल्या सदर कचेरींत आला, आणि आल्याबरोबर त्यानें आपला मुलगा हमीदभाई याला आपल्याकडे बोलावून आणण्यासाठीं एका हुजऱ्याला हुकूम केला. हमीदभाई सदर कचेरींत

येतांच त्यानें आपल्या बापाला नम्रपणें विचारलें, " बाबा, मी आलों आहे. मला तुम्ही कशासाठीं बोलाविलें आहे ? "

परंतु ह्या बापलेकांचें संभाषण येथें नमूद करण्यापूर्वी हमीदभाईची वाचकांना थोडीशी ओळख करून देणें जरूर आहे.

हमीदभाई वयानें तेवीस वर्षांचा होता. त्यानें त्या काळच्या रिवाजाप्रमाणें सर्व मर्दानी खेळांचा अभ्यास केलेला असल्याकारणानें त्याचें हाडपेर मजबूत झालेले होतें. तो काठीनें उंच होता आणि अंगानें गुटगुटीत होता. तो वयाच्या मानानें जितका निबर दिसावयाचा तितका निबर तो दिसत नसे. तो दिसण्यांत नाजूक दिसत असे. त्यामुळे प्रेक्षकाला तो होता त्यापेक्षां एकदोन वर्षांनीं लहानच वाटत असे.

हमीदभाई वर्णानें गोरा होता. त्याच्या चेहेऱ्याचे सर्व भाग नीटस होते. त्याचें कपाळ उंच होतें आणि डोळे विशाळ आणि काळेभोर होते. त्याचे गाल किंचित् फुगीर असून नासिका लांब आणि सरळ होती. त्याचे ओठ किंचित् जाडी होते, आणि त्यांच्या आंतील दांत शुभ्रवर्ण आणि हारीनें होते. त्याची हनुवटी पुढें आलेली असून तिला दुहेरी हनुवटी म्हणतां आलें असतें. त्याच्या शरीराचीं गात्रें जाडसर परंतु प्रमाणशुद्ध होतीं. एकंदरींत हमीदभाई सुंदर मुलगा होता असें कोणीही म्हटलें असतें.

ह्यावेळीं हमीदभाईचा पोशाख अगदीं साधा आणि पांढरा शुभ्र होता. त्याच्या डोक्यावर एक कलाबतूच्या वेळबुट्टीची पांढरी शुभ्र रेशमी कटोरी टोपी होती. त्याच्या अंगांत गुडघ्यापर्यंत एक पांढरें रेशमी पैरण होतें आणि पायांत पांढरी रेशमी विजार होती. त्याचीं पाऊलें जरीच्या वेलबुट्टीनें सुशोभित केलेल्या चपल्यांनीं बोटांपुरतीं आच्छादिलेलीं होतीं.

हमीदभाई बापाच्या बोलावण्यावरून सदरकचेरींत येऊन नम्रपणानें बापापुढें उभा राहून मागें सांगितल्याप्रमाणें त्याला म्हणाला, " बाबा, मी आलों आहे. मला तुम्ही कशासाठीं बोलाविलें आहे ? "

मुलाच्या मुखावर वात्सल्यपूर्ण नजर करून दावूदभाई म्हणाला, " ये बेट्या, आपण त्या दिवाणावर बसून गप्पागोष्टी करूं. "

शुभ्रचादरीनें आच्छादिलेल्या एका दिवाणाकडे हे बापलेक गेले. त्या दिवाणावर ते बसल्यावर दावूदभाई म्हणाला, " बेटा, तुला मी एक अतिशय नाजूक आणि महत्त्वाची कामगिरी सांगणार आहे, "

हे शब्द ऐकून हमीदभाई उत्सुकतेच्या नजरेनें बापाच्या मुखाकडे पहात राहिला. तेव्हां दावूदभाई त्याला म्हणाला, " आज माझ्या भेटीला विजापुरचे सरदार गुलाबखान आले होते, त्यांना मी आतांच परत रवाना करून दिलें हें तुला ठाऊक आहेना ? "

हमीद म्हणाला, " होय बाबा, " दावूद म्हणाला, " त्या गुलाबखानांना बादशहांनीं मुद्दाम माझ्याकडे पाठविलें होतें. हुजूरनीं मजकडे एक महत्वाची कामगिरी सोंपविण्याचा विचार केला आहे, पण ती कामगिरी मी पथकरावयाला तयार आहे किंवा नाहीं हें मला विचारण्यासाठींच येथें गुलाबखान आलेले होतें. "

हमीद जिज्ञासेची मुद्रा बापाच्या मुखावर लावून राहिला. त्यानें कांहीं प्रश्न विचारला नाहीं.

दावूद म्हणाला, " हुजूरच्या दरबारांत अनेक सरदार असून त्यांना सोडून हुजूरनीं ती कामगिरी मजकडे द्यावी असा विचार ठरविला तो मला भूषणावह आहे. "

हमीद म्हणाला, " आलबत, आलबत. "

दावूद म्हणाला, " हल्लीं ह्या महाराष्ट्रामध्यें शिवाजी ह्या नांवाच्या एका मराठे काफीराच्या पोऱ्यानें भारी बंडाळी माजविली आहे. त्या बंडाळीचा बंदोबस्त करण्याचें काम मी पथकरावयाला तयार आहे काय, हें मला विचारावयासाठीं हुजूरनीं गुलाबखानांना मुद्दाम मजकडे पाठविलें होतें. "

हमीदनें विचारलें, "तुम्ही त्यांना होय असेंच उत्तर दिलें असेल ? "

दावूद म्हणाला, " आलबत ! मी तें काम पतकरावयाला तयार आहे असा मीं जबाब दिला. "

तेव्हां हमीद म्हणाला, तुम्हीं कर्नाटकची मोहीम फत्ते करून आलां ही गोष्ट हुजूरच्या लक्ष्यांत आहे हें यावरून सिद्ध होतें. "

दावूद म्हणाला, " आलबत ! आलबत ! मजकडे ही जी कामगिरी

हुजूरनीं सोंपविली आहे तिच्यासंबंधाचीं हुजूरच्या शिक्क्यासह्यांनिशीं पत्रें मजकडे चारपांच दिवसांत येतील; पण आज जे गुलाबखान मजकडे आले होते ते केवळ माझी ह्या कामीं कबूली आहे किंवा नाहीं हें मला विचारण्यासाठीं आले होते. माझी कबूली आहे असें मी गुलाबखानाना स्पष्टशब्दांनीं सांगितलें आहे. आतां रीतसर सहीशिक्क्यांनिशीं हुकूम येणें येवढीच काय ती औपचारिक गोष्ट राहिली आहे. ''

हमीदनें विचारलें, '' रीतसर हुकूम येईलच चार पाच दिवसात. शिवाजी बंडखोर काफीराचा बंदोबस्त कसा करावयाचा ह्यासंबंधानें तुम्हीं आपल्या मनांत काहीं योजना करून ठेविली आहे काय ? ''

दावूद म्हणाला, '' होय. आणि योजनेप्रमाणें तुझ्याकडे मी कामाचा कोणचा वाटा देणार आहें तें तुला सांगावयासाठीं मी तुला बोलावून आणविलेलें आहें. ''

हमीद म्हणाला, '' माझ्याकडे जो कामाचा वाटा तुम्हीं द्याल तो मी तुम्हांला समाधान वाटेल अशारीतीनें पार पाडीन, अशी मला उमेद आहे. ''

तेव्हां दावूद अभिमानाच्या स्वरानें मुलाचीं पाठ थोपटून म्हणाला, '' शाबास ! बेटा, शाबास ! मला तुझी खातरी आहे म्हणूनच तुझ्याकडे एक नाजूक आणि महत्वाचें काम सोपविण्याचा मी निश्चय केला आहे. तें काम कोणचें तें तुला मी आतां सांगतों, ऐक. ''

हमीद म्हणाला, '' सांगा बाबा. '' दावूद म्हणाला, '' ऐक. शिवाजीच्या विरुद्ध प्रत्यक्ष मोहिम सुरू करावयाच्या अगोदर आपणाला कांहीं माहिती मिळविणें जरूरीचें आहे. शिवाजी ह्याचें सामर्थ्य माणसांच्या रूपाचें किती आहे, शस्त्रास्त्रांच्या रूपाचें किती आहे, हें आपणाला पाहिलें पाहिजे. शिवाजीचे जे बंडखोर साथीदार आहेत, त्यांच्यापैकीं स्वार्थासाठीं कोणकोण त्याला मिळालेले आहेत, शुद्ध देशभक्तीनें कोणकोण त्याला मिळाले आहेत, गवताच्या जाळाप्रमाणें क्षणांत मालवणारा हुरूप कोणाकोणाचा आहे, आणि बाभळीच्या लांकडाच्या आचेप्रमाणें टिकून राहणारा हुरूप कोणाकोणाचा आहे, हें आपणाला नीट पाहिलें पाहिजे. केवळ लूट मिळवावयाची आणि ती आपल्या साथीदारांसह वाटून

घ्यावयाची, एवढाच त्या शिवाजीकाफिराचा उद्देश आहे कीं आपलें मुसलमानांचें राज्यच उलथून पाडावयाचा उद्देश आहे, हेंही आपण जाणून घेतलें पाहिजे. तसेंच त्या शिवाजीकाफीराच्या साथीदारांत लाचाला वश होणारे किती साथीदार आहेत, मानमरातबाच्या आणि अधिकाराच्या हुद्यांना भुलणारे किती आणि कोणकोण साथीदार आहेत, हेंही आपणाला आजमावून पाहिलें पाहिजे. तसेंच दक्षिणेमधील सामान्यरयतेच्या मनांत मुसलमानी रियासतीसंबंधानें कितपत आदर-बुद्धि आहे, हेंही त्या लोकांत मिसळून ठरविलें पाहिजे. ही सर्व माहिती मिळवावयाला आपणाला एक महिन्याची मुदत बस्स आहे. ही माहिती मिळाल्याबरोबर मी प्रत्यक्ष मोहिम सुरूं करणार. ही माहिती मिळवा-वयाची नाजूक आणि महत्त्वाची कामगिरी तुजवर सोपवावी, असें मी योजिलें आहे. ही कामगिरी तूं समाधानकारकरीतीनें पार पाडशील अशी माझी खातरी आहे. तूं जरी वयानें लहान आहेस, तरी बुद्धीनें प्रौढ आहेस. आणि तूं वयानें लहान आहेस हेंही एका अर्थानें सोयीचेंच आहे. वयोवृद्धमाण-सांपेक्षां लहानमुलांनाच हे काम चांगलें साधतें. मी तुझ्या वयाचा होतो तेव्हां बादशहांची अशा जातीचीं शेकडो कामें मी केलेलीं आहेत. बरें, मी जी कामगिरी तुझ्याकडे सोंपवावी असें योजिलें आहे ती तुला कितपत रुचतें, हें मला नीट विचार करून सांग."

तेव्हां हमीद एकदम उद्गारला, "बाबा, त्यांत विचार करावयाचें कांहीं कारण नाहीं, मी तुम्हाला एकदमच सांगतों कीं, मी हें काम पथकरतों आणि तें उत्तमरीतीनें मी पार पाडीन असें तुम्हाला खात्री-पूर्वक सांगतों. आजपर्यंत मला असल्याप्रकारची संधि कधींच मिळालेली नव्हती."

दाऊद म्हणाला, "बेट्या, म्हणूनच तुला मी ही संधी देत आहे. तूं मोठा झालास, म्हणजे बादशहाच्या दरबारांत तुझा प्रवेश होईल आणि तूं बादशहाचीं कामें ज्या प्रमाणांत करून दाखविशील, त्या प्रमाणांत तुझी मानमान्यता वाढेल. तुला मोहिमींवर जाण्याचे अनेक प्रसंग येतील, बंडें मोडण्याच्या अनेक संधी तुला मिळतील, परमुलखांच्या राजांकडे तुला वकील म्हणून धाडण्यांत येईल. कदाचित् तूं माझ्याचसारखा

एकाद्या गडाचा गडकरी होशील. परंतु हें सर्व वैभव मिळणें तें तुझ्या अंगच्या गुणांवर अवलंबून राहील. तूं हुशार आहेस, तूं बुद्धिमान आहेस तूं शूर आहेस, आणि तूं गोड बोलणारा आहेस.तूं पुढें मोठ्या योग्यतेला चढशील असा मला भरंवसा आहे. आतां तूं तेवीस वर्षांचा झाला आहेस, मी तुझ्याकडे सोंपविलेली कामगिरी तूं उत्तमरीतीनें पार पाडलीस तर मी बादशहापाशीं तुझी शिफारस करीन, म्हणजे खुद्द बादशहाच तुला एकाद्या महत्त्वाच्या कामगिरीवर पाठवितील. बरें पण बेट्या, तूं मी ही सांगितलेली कामगिरी कशी करशील सांग पाहूं ? ”

त्यावर हमीद म्हणाला, “ बाबा, मी असें करीन. मी उद्याच्या उद्याच ह्या गडावरून माझ्या दहाबारा सोबत्यासहवर्तमान बाहेर पडेन. ह्या दातेगडाच्या मुलखाच्या हद्दींतून निघून इतर जे गड आहेत त्यांच्या मुलखांतून क्रमानें एका टोकापासून तो दुसऱ्या टोकापर्यंत अवलोकन करीत करीत जाईन, ·वाटेंत जे कोणी लोक भेटतील, त्यांच्याशीं संभाषणाचे प्रसंग आणीन,संधी सांपडल्यास आणि सोय जमल्यास प्रत्येक गडकऱ्याला भेटेन, मग तो आपल्या हुजुरच्या अंमलांतील असो, किंवा स्वतंत्र गडकरी असो किंवा त्या काफीरशिवाजीच्या अमलांतील असो. प्रत्येका-पाशीं त्या त्या मुलखाच्या रियासतीसंबंधाचें बोलणें काढीन.आपल्या मुसल-मानी अमलाकडे लोकांचा ओढा अधिक आहे किंवा दुसऱ्या कोणाच्या अमलाकडे ओढा अधिक आहे, हें आजमावीन; तसेंच शिवाजीवर आपण मोहीम सुरूं केली तर आपल्याला मदत करावयाला कोणकोण लोक येऊं शकतील, ह्याचाही आजमास बांधीन. सारांश, त्या काफीर-शिवाजीच्या विरुद्ध मोहीम चालवावयाच्या कामीं जी जी माहिती आपणांस असणें जरूर आहे, ती ती माहिती मिळवीन,—मग ती माहिती माणसासंबंधाची असो किंवा ह्या मुलखाच्या नैसर्गिक रचने-संबंधाची असो. आणि ही सर्व माहिती मी मिळवीन ती अगदीं साधेपणानें मिळवीन. ही माहिती मिळविण्यांत माझा कांहीं विशेष उद्देश आहे, असा कोणासही संशय येऊं देणार नाहीं. मी केवळ जिज्ञा-सेनें ही माहिती मिळवीत आहे, असें लोकांना भासवीन. ही कामगिरी मी एका महिन्याच्या आंत करून परत येईन, अशी मला उमेद आहे.”

हें आपल्या मुलाचें धमकदारीचें भाषण ऐकून दावूदनें अभिमानपूर्वक आपल्या मुलाची पाठ थोपटली. मग तो त्याला म्हणाला, " शाबास, हमीदबाळा, शाबास, मुलगा असावा तर असा असावा. तूं जो हा आपल्या प्रवासाचा आराखडा मला सांगितलास, तो तुझ्या हुशारीची आणि चाणाक्षपणाची उत्तम साक्ष पटवीत आहे. तूं पुढें वैभवाला चढशील अशी माझी खात्री आहे. असो. हमीद, आतां तूं जा आणि उद्यां प्रवासाला निघण्याची तयारी कर. तूं बरोबर काय काय पदार्थ घेणार, कोणकोण माणसे घेणार, वगैरेसंबंधाची तयारी करावयाला जा. माझ्या मुलाकतीला कोणी माणूस आलेलें असल्यास त्याची मी मुलाकत आतां घेतों."

हे भाषण ऐकून हमीद त्या सदरकचेरींतून जावयाला उठला. दावूदही उठला. तो त्या कचेरीच्या दाराकडे जाऊन मोठ्यानें म्हणाला, " आबदुल्ला, माझ्या मुलाकतीला कोणी माणूस आलेलें आहे काय ?"

तेव्हां आबदुल्ला सदरकचेरींत येऊन मुजरा करून म्हणाला, " खाविंद, मुलाकतीसाठीं कोणी माणूस आलेलें नाहीं, पण विजापुरचा माल विकणारे कोणी व्यापारी बाहेर उभे आहेत. आपला हुकूम असल्यास त्यांना आंत सोडतों."

तेव्हां दावूद म्हणाला, " आम्हांला आतां कांहीं काम नाहीं. आम्हीं अगदीं रिकामे आहों. आम्हांला कांहीं करमणूक पाहिजे आहे. आबदुल्ला, येऊं दे त्या व्यापाऱ्यांना. पाहूं त्यांनीं काय माल विकावयाला आणला आहे तो, आणि कांहीं विकतही घेऊं."

नंतर आपला मुलगा हमीद,—जो अद्यापि त्या सदर कचेरीच्या बाहेर पडला नव्हता,—त्याच्याकडे वळून दावूद म्हणाला, " हमीद, तूंही तो विजापुरचा माल पहा. तुला कांहीं पदार्थ पाहिजे असल्यास विकत घे."

तेव्हां हमीद म्हणाला, " होय बाबा, मी तो विजापुरचा माल पहावयाला बसतों."

आबदुल्लानें गडकरीसाहेबांच्या हुकुमाप्रमाणें बाहेर उभ्या असलेल्या विजापुरच्या व्यापाऱ्यांना सदर कचेरींत सोडलें. मग तो बाहेर पहारा करीत उभा राहिला.

हे विजापुरचे व्यापारी कोण होते, आणि ते ह्यावेळीं कोठून तेथें आले, हें आमच्या वाचकांना सांगणें जरूर आहे. ह्या व्यापाऱ्यांशीं वाचकांचा परिचय करून देण्यासाठीं आम्हांला तीन चार घटका मागें जाणें जरूर आहे, तें आम्ही पुढच्या प्रकरणीं करूं.

---

## प्रकरण ९ वें.

# दोन गस्तंगीर.

विजापुरच्या बादशहाकडून आलेला वकील गुलाबखान ह्याची दावूद-साहेब गडकरी ह्यांच्याशीं गडाच्या सदरकचेरींत मुलाकत चाललेली असतां दातेगडाच्या मुख्य दरवाज्याकडे येणाऱ्या वाटेवर जो वृत्तान्त घडत होता तो आतां वाचकांना आम्ही सांगतों.

दातेगड हा डोंगरी किल्ला भूपृष्ठाच्या सपाटीवर दोन हजार फूट उंच असून त्याच्या इतका उंच किल्ला आसपास बरेच मैलांच्या प्रदेशांत दुसरा कोणचाच नाहीं. ह्या किल्याचा मुख्य दरवाजा पश्चिमाभिमुख असून तो गांठावयाला अगोदर तीन मैल डोंगर चढून जावें लागतें.

ह्या विशिष्टसमयीं दोन इसम ह्या चढणीवरून किल्यावर जावयाला निघालेले आहेत. भूतदयेनें प्रेरित झालेले हे दोन प्रवासी आपआपल्या घोड्यांवर आरूढ न होतां त्यांचें लगाम हातांत धरून त्याना चालवीत आहेत. ह्या घोड्यावर भल्या लठ्ठलठ्ठ कंठाळी लादलेल्या आहेत आणि त्या इसमांच्या खांद्यावरही भल्या लठ्ठलठ्ठ पडशा टाकलेल्या आहेत. परंतु कंठाळीच्या भारानें ते दोन घोडे किंवा पडशांच्या भारानें ते दोन इसम ह्या वाटेनें येत असतां फारसे दमल्यासारखे दिसत नव्हते, कारण ही वाट अगदीं सोप्या चढणीची होती. ज्या टेकडीवर दातेगड बांधलेला होता, ती जरी खूब उंच होती तरी दातेगडाच्या मुख्य दरवाज्याकडे जाणारी वाट ह्या टेकडीला दीड प्रदक्षणा करून वर गेलेली होती. ह्या [illegible] चढण अगदीं सोपी झाली होती, आणि ह्मणून आमच्या

दोन प्रवाशांना किंवा त्यांच्या जनावराना सपाटीवरून चालण्यापेक्षां फारसे अधिक श्रम होत नव्हते.

गडावर जावयाला निघालेल्या आमच्या दोन इसमापैकीं एक इसम वर्णानें निमगोरा असून वयानें चाळीशीच्या घरांत होता. त्याचा चेहेरा भरदार असून त्याचे डोळे विशाल आणि पाणीदार होते. त्या काळच्या रिवाजाप्रमाणे त्यानें थोडीशी दाढी राखलेली होती. पण आपण ह्या इसमाला पाहात आहों त्यावेळीं ती दाढी हिंदू चालीची आहे किंवा मुसलमानी चालीची आहे हे कळणें शक्य नव्हते. कारण, त्यानें ह्यावेळीं आपल्या हनुवटीवरून आपल्या पटक्याचा एक पट्टा बांधला होता. हा इसम अंगानें सडपातळ असून चढणीवरून चालत असतांना सुद्धा त्याचीं पावले त्याच्या इच्छेप्रमाणे पडत होतीं.

ह्या इसमाचा पोशाख अगदीं साधा असा होता. त्याच्या डोक्यावर पिवळा सुती फेटा, अंगात सुती कुडत्यावर एक पायघोळ शेरवान आणि पायात एक पोकळ विजार असून त्याच्या पायांत जाड तळाच्या वहाणा होत्या.

ह्या इसमाचा सोबती वयानें सुमारे तीसवर्षांचा दिसत होता. तो वर्णानें काळसर होता आणि त्याच्या दोन्ही गालांवर चमत्कारिक डाग होते, त्यांच्यायोगानें तो हिडिस्स दिसत असे. त्यानें थोडीशी दाढी राखिलेली होती.

तो अंगानें जाडसर असून काटीनें मध्यम उंचीचा होता. त्याच्या तोंडाचे वेगळेवेगळे भाग म्हणजे कपाळ, गाल, डोळे, नाक, हनुवटी, ओठ हे जरी बेढब नव्हते, तरी त्याच्या गालावरील चमत्कारिक डागामुळें त्याच्या मुद्रेत बराच हिडिस्सपणा आलेला होता. त्याच्या शरीराचीं गात्रें जरीं प्रमाणशुद्ध होती तरी तीं भारी निबरट दिसत असत.

त्याचा पोशाख त्याच्या वयस्कर जोडीदाराच्या पोशाखाप्रमाणेंच अगदीं साधा होता. त्याच्या डोक्यावर एक मळकट सुती फेटा होता, अंगांत एक पांढरा मळकट शेरवान होता, पायांत काळी तुमान होती, आणि पायांत जाड वहाणा होत्या. आमच्या ह्या दोन प्रवाशांना दाते-

गडावर जाऊन पोचण्याची फारशी घाई नव्हती असें त्यांच्या हालचालीवरून सहज कळण्याजोगें होतें. कारण, हे प्रवासी पांचपन्नास कदम चालून गेले कीं तेथें थांबून मागें वळून सभोंवतालच्या प्रदेशाकडे नजर करून तो प्रदेश अवलोकन करीत होते, आणि मधून त्या प्रदेशाच्या रूपरेषेवर आणि विशेषांवर एकमेकांत टीका करीत होते. नंतर पुढें ते पांचपन्नास कदम वाट चालून जात, पुन्हां तेथें थबकत, मागे वळून आसमंतात् भागाचें निरीक्षण करीत, त्या प्रदेशाच्या विशेषावर टीका करीत, मग पुन्हा किल्ल्याकडे जावयाला चालूं लागत.

अशा रीतीनें वाट चालतांचालतां हे दोन प्रवासी एका ठिकाणीं उभे राहिले; त्यांनी आसमंतावर नजर करून त्याच्या विशेषांचें निरीक्षण केलें. हें झाल्यावर वयस्कर प्रवासी आपल्या जोडीदाराला म्हणाला, " कायरे पलंगखान, आपण ह्या टेकडीच्या पायथ्यापासून चारच पुरुष उंचीवर फार तर आलेले असूं. पण आपण चाललों खूब. "

त्यावर पलंगखान म्हणाला, " होय, शेरखान, आपण ह्या टेकडीवर चढावयाला सुरवात केल्यापासून ह्या दातेगडाला एक सबंध प्रदक्षिणा केली. त्यामुळें आपणाला या ठिकाणापर्यंत येऊन पोंचावयाला इतका वेळ लागला. ही वाट डोंगराला प्रदक्षिणा करून आली आहे म्हणून आपणाला ही चढण जाणवली नाहीं. पायथ्यापासून आपण थेट येथपर्यंत सरळरेषेंत आलों असतों तर शिडीवर चढल्याप्रमाणें आपणाला श्रम झाले असते. ही आपण चालून आलों ती वाट बहुतेक सपाटीवर असल्यासारखी आहे. "

तेव्हां शेरखान म्हणाला, " होय. आपण डोंगराला एक प्रदक्षिणा करून येथपर्यंत आलों आहों म्हणून आपणाला ह्या दातेगडाच्या चारी दिशांकडच्या चार बाजू दिसल्या. गडाचा तट फार भक्कम आहे, नाहीं काय ! "

पलंगखान म्हणाला, "होय, तो खूब भक्कम आहे. ह्या तटाच्या भिंतींचे जे चिरे ते इतके कळाशीनें बसविलेले दिसत आहेत कीं, कोणत्याही दोन चिऱ्यांत पाहारीचें टोक खुपसूं म्हटलें तरी तें शक्य नाहीं. "

तेव्हां शेरखान म्हणाला, " अरे, नुसतें सुईचें टोक खुपसूं म्हटलें तरी

तें शक्य दिसत नाहीं. ह्या दातेगडाच्या चारी बाजूच्या चारी भिंती एक-जात घडीव चिऱ्यांनीं बांधून काढलेल्या आहेत. गड फारच भक्कम दिसतो. तटाच्या भिंती आंतल्या बाजूनीं देखील अशाच भक्कम असतील असें मला वाटतें."

पलंगखान म्हणाला, "होय, मलाही असेंच वाटतें. ह्या दातेगडाच्या आंत जर एकादा बालेकिल्ला असला तर त्याचेवरून आजूबाजूचा पंचवीस-तीस कोशांचा प्रदेश दिसेल."

शेरखान म्हणाला, "आपण आतां उभे आहों येथून देखील आपणाला आजूबाजूचा प्रदेश दिसत आहे. हा माझ्या बोटाच्या दिशेला प्रचितगड दिसत आहे. आणि त्याच्याचपुढें तो भैरवगड दिसत आहे."

पलंगखान पश्चिमेकडे बोट करून म्हणाला, "आणि तो माझ्या बोटाकडे जो गड दिसत आहे तो जंगली जयगड असला पाहिजे. ह्या-वेळीं त्याचा बराचसा भाग ढगांनीं गुरफटलेला आहे."

शेरखान म्हणाला, "तो निःसंशय जंगली जयगडच; आणि आतां पुढें माझ्या बोटाच्या समोर मकरंदगड अंधकअंधक दिसत आहे."

तेव्हां पलंगखान म्हणाला, "आणि माझ्या बोटाच्या दिशेला प्रतापगड असला पाहिजे; येथून तो दिसत नाहीं. पण तो तेथेंच असला पाहिजे!"

शेरखान म्हणाला, "ह्या इकडच्या बाजूचे कांहींच गड आपणाला दिसत नाहींत. हा डोंगर आड आला आहे."

येणेंप्रमाणें आपले दोन प्रवासी आजूबाजूस दिसणाऱ्या देखाव्याचें निरीक्षण करून पुढची वाट चालूं लागले. ते कांहीं वाट चालून जातात तों त्यांना गडावरून खालीं येणाऱ्या घोडेस्वारांचा एक ताफा दिसला. ते स्वार जवळ येतांना पाहून आमचे हे दोन प्रवासी त्यांना वाट देण्यासाठीं आपल्या घोड्यासह वाटेच्या बाजूस उभे राहिले. हे घोडे-स्वार अगदीं जवळ येईतोंपर्यंत शेरखान आणि पलंगखान त्यांच्याकडे कुतूहलपूर्ण दृष्टीनें पहात उभे होते. स्वार जवळ येतांच ह्या दोघां प्रवाशांनीं त्यांना सलाम केले, त्यांचा त्या घोडेस्वारांनीं स्वीकार केला.

त्या घोडेस्वारांचा जो मुख्य असा दिसणारा इसम होता, त्यानें

ह्या दोन प्रवाशांचे निरीक्षण करण्यासाठी आपला घोडा थांबविला. तेव्हा अर्थात त्याच्या सोबत्यांनीही आपले घोडे थांबविले.

हे घोडेस्वार कोण असावेत, हें आमच्या वाचकांच्या तर्कांत आलेंच असेल. गडकरीसाहेबाची मुलाखत घ्यावयासाठी विजापुराहून आलेला गुलाबखान आणि त्याच्या परिवारातील लोक हे गडकरी साहेबाचा निरोप घेऊन परत विजापुराकडे जावयाला निघालेले होते. ते नुकतेच गडातून बाहेर पडलेले असल्याकारणानें त्यांची आणि आमच्या ह्या दोन प्रवाशांची या ठिकाणीं गांठ पडली. असो.

गुलाबखानानें आपला घोडा थांबवून ह्या दोन प्रवाशांचें निरीक्षण केलें. मग तो शेरखानाला म्हणाला, " तुम्हीं गडावर जात आहा काय ? "

शेरखानानें उत्तर दिले, " होय सरकार, आम्ही दोघे विजापुरचा माल विकणारे गस्तंगीर आहों. ह्या गडावर कांहीं माल खपला तर पहाणार आहों. "

तेव्हा गुलाबखान म्हणाला, " जा. तुमचा पुष्कळ माल गडकरीसाहेब आणि त्यांचा मुलगा हमीदभाई हे विकत घेतील. गडकरीसाहेब ह्या वेळीं रिकामे आहेत. " नंतर पलंगखानाकडे नजर करून गुलाबखानाने त्याला विचारलें, " तूं ह्या इसमाचा भाऊ काय ? "

पलंगखानानें उत्तर दिलें, " नाहीं सरकार, मी ह्या शेरखानांचा दोस्त आहे, आम्ही कोणी नातलग नाहीं. आम्ही दोस्त असून सरकतीने हा गस्तंगिरीचा धंदा करीत असतों. "

इतके बोलणे झाल्यावर गुलाबखान, " आछा, " असे म्हणून आपल्या घोड्याला टांच मारून वाटेनें चालूं लागला. त्याचे जोडीदार घोडेस्वारही त्याच्यामागून चालूं लागले.

गुलाबखान आणि त्याची मंडळी तेथून नजरेच्या टप्प्याच्या पलीकडे गेल्यावर आपले गस्तंगीर प्रवासी गडाकडे जावयाला निघाले.

गडाचा दरवाजा दिसूं लागला तेव्हां त्याचें निरीक्षण करून शेरखान आपल्या दोस्ताला म्हणाला, " हा दरवाजा थेट पश्चिमाभिमुख आहे. "

पलंगखान म्हणाला, “ होय, आणि तो चारपांच पुरुष उंचीचा खडक फोडून त्यांत बसविलेला आहे. ”

शेरखान म्हणाला, “ आणि हा दरवाजा उंचीच्या मानानें रुंद नाही. तो दहापंधरा हात रुंद असेल झालें. ”

पलंगखान म्हणाला, “ त्याला खिळे किती लांब लांब आणि अणकुचीदार आहेत पाहिलेत काय ? हे खिळे एकाएका पानाला चाळीसपन्नास असावेत असें मला वाटतें. ”

तेव्हां शेरखान म्हणाला, “ होय. आणि दरवाजाच्या वरची कमान पाहिलीस काय ? ती कमानदेखील खडक फोडूनच केलेली आहे. हा दरवाजा किती भव्य दिसतो रे ? ”

ह्याप्रमाणें बोलतबोलत हे दोन गस्तंगीर थेट दरवाज्यापर्यंत येऊन पोंचले.

---

## प्रकरण १० वें.

# गस्तंगिरांचा सदरकचेरींत प्रवेश.



आमचे दोन गस्तंगीर दातेगडाच्या दरवाज्याशीं येतांच त्यांना दरवानानें हटकलें, “ तुम्ही कोण आहां आणि इकडे कशाकरतां आला आहा ? ”

त्याला शेरखानानें उत्तर दिलें, “ आह्मी दोघेजण विजापुरचा माल विकणारे गस्तंगीर आहों. या गडांतील लोकांनीं आणि गडकरीसाहेबांनीं आमचा कांहीं माल विकत घेतला तर आमचा फायदा होईल म्हणून आम्हीं येथें माल घेऊन आलों आहों. ”

दरवान म्हणाला, “ तुमचा फायदा होईल पण आह्मीं येथें रखवाली करीत बसण्याचे कष्ट करतों त्या आमचा काय फायदा व्हावयाचा आहे ?”

शेरखान म्हणाला, “ आमचा कांहीं फायदा झाला तर तुह्मालाही आम्ही संतोषानें कांहीं तरी देऊंच देऊं. ”

तेव्हां दरवान म्हणाला, " तुम्हीं मला काय द्याल ? "

शेरखानानें उत्तर दिले. " तुम्हाला आम्हीं रुपायामागे एक आणा बक्षीस देऊं. "

दरवान म्हणाला, " तुम्हीं आम्हाला फसविणार नाहीं कशावरून ? "

तेव्हा शेरखान रागाच्या स्वरानें म्हणाला, " आम्हीं पठाण लोक हिंदू काफीराप्रमाणे लुच्चे, लबाड, अप्रामाणिक, दगलबाज नाहीं. आम्हीं सच्चे लोक आहो. आम्हीं एकदा अमुक देऊं म्हटलें म्हणजे तें देतोंच देतों. दगडाची, धोंड्यालाकडाची, धातूची पूजा करणाऱ्या हिंदूकाफिरांप्रमाणें आम्ही लुच्चे लोक नाहीं. आम्ही अल्लाला भजणारे पठाण लोक आहों. बैलाची, घोड्याची, गायीची, म्हशीची, कुत्र्याची, गाढवाची पूजा करणारे हिंदुकाफीर दगलबाज असतात. पण महमदपैगंबराला मानणारे आम्ही लोक तसें नाहीं. आम्ही सच्चे अदमी आहों. "

हिंदूलोकांवर झाडलेला हा ताशेरा ऐकून दरवानाला फार समाधान वाटलें. तो अनुनयाच्या स्वराने म्हणाला, " आछा ! आछा ! तुम्ही जा आंत. पण तुमच्याजवळ अस्सल विजापुरी गुडाखू असला तर थोडासा आम्हांला अगोदर द्या. "

तेव्हां शेरखान म्हणाला, " बहोत आछा. आमच्याजवळ अस्सल विजापुरी गुडाखू आहे. त्या गुडाखूचे तीन झुरके ओढले कीं स्वर्गीय आनंद होतो. तुम्ही त्या गुडाखूची लज्जत पहा तर खरी ! "

असें बोलून शेरखान तेथें देवडीवर बसला. त्यानें आणि पलंगखानानें आपल्या खांद्यावरच्या पडशा काढून आपआपल्या शेजारीं ठेवून दिल्या. मग शेरखानानें आपल्या पडशींतून एक जस्ताचा डबा बाहेर काढला. मग त्यानें त्याचें झांकण उघडिले. हें झांकण उघडतांच त्यांतून गुडाखूचा घमघमाट सर्वत्र पसरला. ह्या घमघमाटाचें आघ्राणन करीतकरीत दरवान मोठ्या संतोषाच्या मुद्रेनें म्हणाला, " हा गुडाखू फार उमदा आहे. तो अस्सल विजापुरी गुडाखू आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं. द्या पाहूं थोडासा गुडाखू ! "

"होय देतों," असें त्या दरवानाला उत्तर देऊन शेरखानानें आपल्या डब्यांतून एका वेळेपुरता गुडाखू त्या दरवानाच्या हातावर ठेविला.

दरवानाने गुडाखूचे करावयाचे ते सारे संस्कार करून तो चिलमींत भरला. त्याचेवर जवळच्या शेगडींतून दोन निखारे काढून ते त्यानें ठेवून दिले. मग लागोपाठ चारपांच लांबलचक झुरके काढून त्यानें चिलीम ओठांपासून दूर करून समाधानाच्या मुद्रेनें म्हटलें, "ओहो, बहोत उमदा गुडाखू है! असला गुडाखू मी साऱ्या जन्मांत ओढला नव्हता!"

हा उद्गार काढल्यावर त्या दरवानानें पुन्हां ती चिलीम आपल्या ओठांना लाविली, आणि पुन्हा तींतून सातआठ झुरके काढून ती शेरखानापुढें केली. तेव्हा आपला गस्तंगीर म्हणाला, "भाईसाहेब, माफ करा. आम्ही गुडाखू ओढीत नाहीं. ओढला असतां आम्हाला ठसका लागून चक्कर येते."

हें ऐकतांच दरवानानें ती चिलीम पुन्हां आपल्या ओठांना लावून तींतून झुरक्यांवर झुरके काढले. मग तींतील सर्व गुडाखू जळून रक्षा झाली, तेव्हा ती चिलीम त्यानें जमीनीवर उपडी ठेवून दिली. मग समाधान पावल्याच्या मुद्रेने तो म्हणाला, "गुडाखू पर गुडाखू आहे! बहोत नामी! बहोत दिलखूष!"

हा उद्गार काढल्यावर तो दरवान आमच्या दोघां गस्तंगिरांना म्हणाला, "तुम्ही दोघेजण मोठ्या नशीबाचे आहा खास! कारण, तुम्ही येथें दोन घटका अगोदर आलां असतां, तर आम्हीं तुम्हाला परत लावलें असतें. कारण आमच्या गडकरीसाहेबांच्या भेटीला आलेले विजापुरचे वकील गुलाबखान ह्या गडावर आहेत तोंपर्यंत बाहेरच्या कोणाही माणसाला गडात येऊं देऊं नये असा आम्हाला सख्त हुकूम झालेला होता. ते वकील नुकतेच गडावरून गेले. म्हणून तुम्हाला मी आंत सोडीत आहे."

तेव्हां शेरखानानें साधेपणाच्या स्वरानें दरवानाला विचारलें, "ते विजापुरचे वकील ह्या गडावर बरेच दिवस राहिले असतील?"

दरवानानें उत्तर दिलें, "छेः! बरेच दिवस कोठले? आज सकाळीं ते आले आणि आतां इतक्यातच ते परत जावयाला निघाले. ते वाटेत तुम्हाला भेटले नाहींत काय?"

शेरखानाने उत्तर दिलें, "वाटेत आम्हाला दहाबारा स्वार दिसले पण ते कोण आणि कोठले हें आम्हाला ठाऊक नव्हतें."

दरवान म्हणाला, " ते बरोबर आहे. ते कोण आणि कोठले हें तुम्हाला कशानें कळणार ? असो. विजापुरचे वकील आणि त्याच्या तैनातींतील माणसे गेल्याकारणानें आमचे गडकरीसाहेब आतां रिकामे आहेत. तुम्हाला आतां भेटीला येऊं देतील. जा तुम्ही ह्या कासीमाबरोबर; तो तुम्हाला गडकरीसाहेबाच्या सदरकचेरीकडे घेऊन जाईल. "

असें म्हणून दरवानानें कासीम नावाचा जो पोऱ्या तेथें जवळच होता त्याला म्हटलें, " कासीम, ह्या दोघा गस्तंगिरांना हुजूरची भेट पाहिजे आहे. ह्यांना सदरकचेरीकडे घेऊन जा. तेथील पहारेकऱ्यापर्यंत ह्या दोघांना पोंचवून ये. "

कासीम हा पोऱ्या आठवर्षांचा होता. दरवानानें सांगितलेली कामगिरी करावयाला तो उठला. त्याच्यामागून आमचे दोन गस्तंगीर चालूं लागले. सदरकचेरीपर्यंत वाट चालत असता आमचे गस्तंगीर त्या गडांत जें दिसेल तें पाहातपाहात चालले होते.

सदरकचेरीच्या दाराशीं असलेल्या पहारेकऱ्याला कासीम म्हणाला, " ह्या दोघां गस्तंगिरांना हुजूरची भेट घ्यावयाची आहे. "

पहारेकरी म्हणाला, " हुजूर यावेळीं हमीदभाईशीं बोलत आहेत. ते रिकामे झाले म्हणजे ह्या दोघांची वर्दी हुजूरकडे पोंचवितों. "

असें कासीमला पहारेकऱ्यानें सांगितलें तेव्हां तो परत गडाच्या दरवाज्याकडे जावयाला परतला. आमचे दोन गस्तंगीर ह्या पहारेकऱ्याजवळ बसून राहिले.

कांहीं वेळानें गडकरीसाहेब सदरकचेरीच्या दाराशीं जाऊन मोठ्यानें म्हणाले, " आबदुल्ला, माझ्या मुलाकतीला कोणी माणूस आलेलें आहे काय ? "

तेव्हां आबदुल्ला कचेरींत येऊन मुजरा करून म्हणाला, " खाविंद, मुलाकतीसाठीं कोणी माणूस आलेलें नाहीं. पण विजापुरचा माल विकणारे कोणी व्यापारी बाहेर आहेत. हुकूम असल्यास त्याना आंत सोडतों."

तेव्हां दावूद म्हणाला, " आम्हांला आतां कांहीं काम नाहीं. आम्हीं अगदीं रिकामे आहों. आम्हाला कांहीं करमणूक पाहिजे आहे. आबदुल्ला, येऊं दे त्या व्यापाऱ्यांना. पाहूं त्यांनीं काय माल विकावयाला आणला आहे तो, आणि कांहीं माल विकत घेऊं. "

" होय खाविंद " असें गडकऱ्याला उत्तर देऊन आबदुल्ला सदर-कचेरींतून बाहेर आला. त्यानें परवानगी दिल्यावरून शेरखान आणि पलंगखान त्या कचेरींत प्रविष्ट झाले.

---

## प्रकरण ११ वें.

# गडकरी आणि गस्तंगीर.



मागील प्रकरणात सांगितल्याप्रमाणें शेरखान आणि पलंगखान दासे-गडाच्या सदर कचेरींत प्रविष्ट होतांच त्यांनीं आपल्या खांद्यांवरील पडशा जमीनीवर उतरून ठेविल्या; मग त्यानीं दावूदभाई आणि हमीदभाई ह्या बापलेकांना अत्यंत नम्रपणानें मुजरे केले. त्यांना दावूदभाई म्हणाला, "बसा असे आणि तुह्मीं काय काय माल आणला आहेत तो आम्हांला पहावयासाठीं येथें माडून ठेवा. "

" होय खाविंद, " असे त्याला उत्तर देऊन शेरखान आणि पलंग-खान ह्या दोघां गस्तंगिरानीं आपल्या पडशातून सगळा माल बाहेर काढून तो व्यवस्थित रीतीनें पुढें माडून ठेविला. हें ते करीत होते त्या-वेळीं दावूदभाई त्यांना किरकोळ प्रश्न विचारून त्याच्यासंबंधाची माहिती विचारीत होता. ह्या प्रश्नांना शेरखान उत्तरें देत होता. अशा-रीतीनें शेरखानासंबंधाची आणि त्याच्या जोडीदारासंबंधाची जी माहिती दावूदभाईला मिळाली ती पुढें दिल्याप्रमाणें होती.

शेरखान म्हणाला, " माझें नाव शेरखान, ह्या माझ्या जोडीदाराचें नांव पलंगखान. आह्मीं दोघे पठाण असून मूळचे आफगाणीस्थानांतले राहाणारे. आह्मी आमचा देश सोडून हिंदुस्थानांत आल्याला पुष्कळ वर्षें झालीं. हा पलंगखान माझा कोणी नाहीं. आह्मी दोघे सर्कतीनें गस्तं-गिरीचा धंदा करून पोट भरतों. आम्ही विजापुरास जो ठिकठिकाणचा माल विकावयासाठीं येतो तो खरेदी करून आजूबाजूच्या गांवांत आणि शहरांत विकतो. अशारीतीनें आम्ही दक्षिणेकडचा पुष्कळ मुलूख पाहिला

आहे. ह्या धंद्यांत आल्लाच्या कृपेनें आह्माला पुष्कळ पैसे मिळतात.''

त्यावर दावूदभाईनें विचारलें, "शेरखान, तुम्हीं आपल्या धंद्याच्या निमित्ताने कोणकोणचीं गांवें आणि शहरें हिंडलां आहां?''

तेव्हा शेरखानानें आपण पाहिलेल्या गावाची आणि शहराची एक लांबलचक यादी म्हणून दाखविली. ही यादी आह्मी संपूर्ण देत बसलो तर आमच्या ह्या कादंबरीचीं दोनतीन पाने भरतील म्हणून आम्हीं त्या यादींतील कांहीं नांवें मात्र देतों.

तासगांव, मिरज, सांगली, भिलवडी, शिरवळे, वाटेगांव, कऱ्हाड, पाटण, कुरला, उंबरज, कऱ्हाड, सातारा, वाई, मेढा, कोरेगांव इ० इ० इ०

ही यादी शेरखान सांगत असतां त्याचा जोडीदार पलंगखान हा त्या यादींत मधूनमधून भरती घालीत होता.

हे दोघे गस्तंगिर आपल्या धंद्याच्या निमित्तानें पाहिलेलीं ठिकाणें सांगत असतां दावूदभाई आणि हमीदभाई हे एकमेकांकडे मधूनमधून सार्थ दृष्टि वळवीत होते. जणों काय ह्या यादीचा त्यांना उपयोग करून घेता येईल असें त्यांना वाटत असावें. ह्या त्या दोघां बापलेकांच्या सार्थ दृष्टि ह्या दोघां गस्तंगिरांच्या लक्ष्यांत यावयाला चुकल्या नाहींत.

पाहिलेल्या ठिकाणाचें निवेदन समाप्त होतांच दावूदभाईनें शेरखानाला विचारलें, "खानसाहेब, तुम्हीं ठिकठिकाणच्या मोकासदारांना आणि ठिकठिकाणच्या गडकऱ्यांस आपला माल विकावयासाठीं भेटलांच असाल, आणि प्रत्येक ठिकाणच्या सामान्य रयतेंत देखील तुम्हीं आपला माल पुष्कळ खपविला असेल?"

यावर शेरखान आणि पलंगखान हे दोघेही एकदम उद्गारले, "होय खाविंद."

हें उत्तर ऐकून दावूदभाई आणि हमीदभाई ह्या दोघानीं सार्थ दृष्टि एकमेकांकडे वळविली, आणि ते दोघे एकमेकांशीं कांहीं शब्द पुटपुटले. शेरखान आणि पलंगखान ह्यांना त्यांचे पुटपुटलेले शब्द जरी ऐकूं आले नाहींत तरी त्यांना बापलेकांची नेत्रपल्लवी दिसली होती. तथापि त्या दोन खानांच्या मुद्रा अगदीं अविकृत अशा दिसत होत्या.

असो. दावूदभाई म्हणाला, "खानसाहेब, तुमच्या प्रवासासंबंधाची

तपशीलवार हकीगत आम्हांला ऐकावी असें वाटत आहे. तुम्हीं कोणच्या ठिकाणी कोणाकोणाला भेटला, तुम्हांला देशाची स्थिति कशी वाटली, तुम्हांला कोठेंकोठें कायकाय चमत्कार दिसले वगैरे हकीगत आम्हांला ऐकावयाची आहे. परंतु अगोदर आम्हीं तुमचा माल पाहून कांहीं खरेदी करूं. हे झाल्यानंतर आपण तुम्हीं पाहिलेल्या ठिकाणांसंबंधाने गप्पा करूं. ह्याला तुमची कांहीं हरकत नाहीं ना ?"

तेव्हां शेरखान आनंदाच्या मुद्रेनें म्हणाला, "खाविंद, याला आमची कांहीं हरकत नाहीं. आम्हाला आमच्या प्रवासांत जें कांहीं दिसलें, आम्हांला जे अनुभव आले, आम्हांला जी माहिती मिळाली ती सर्व आपणाला सांगूं. आमच्या प्रवासाचे वर्णन ऐकावयाला आपणाला जितका आनंद वाटेल तितकाच आम्हांला तें वर्णन करतांना वाटेल. आम्हीं आपले बंदे गुलाम आहो."

तेव्हां दावूदभाई म्हणाला, "आछा ! आछा ! दाखवा तुमचा माल."

असा हुकूम होतांच शेरखान पुढं मांडून ठेवलेल्या वस्तूंतून एक एक वस्तु उचलून गडकऱ्याला आणि त्याच्या मुलाला तिचें वर्णन देऊं लागला, ही वस्तु अमुक ठिकाणीं पैदा झालेली आहे, तिचे गुणधर्म अमुक अमुक आहेत, वगैरे माहिती सांगून ती वस्तु आपणास पाहिजे असल्यास ती अमुक किंमतीला देऊं, असें शेरखान सांगत होता.

अशा रीतीनें ह्या गस्तंगिरानें सर्व वस्तूंचीं वर्णनें केलीं. ह्यांपैकीं कांहीं वस्तु दावूदभाई आणि त्याचा मुलगा ह्यांनीं खरेदी केल्या. ह्या खरीद-लेल्या वस्तु हे दोघे गस्तंगीर वेगळ्या ठेवीत.

हें झाल्यानंतर खरेदीची एकंदर रक्कम काढण्यांत आली. ही रक्कम ह्या गस्तंगिरांना देण्यांत आली.

हें झाल्यानंतर दोघे गस्तंगीर बाकीच्या वस्तु आपल्या पडशांत भरूं लागले.

दोघा गस्तंगिरांनीं आपल्या मालाची आवराआवर केली तेव्हां दावूदभाई म्हणाला, " शेरखान, तुमचा माल बहोत उमदा आहे आणि पुन्हा स्वस्ताही आहे.आज आम्ही चांगली खरेदी केली म्हणून आम्हाला बहोत आनंद होत आहे. तुम्ही पुन्हा ह्या आमच्या गडाच्या बाजूला आला तर आम्हाला अवश्य भेटा. आम्ही तुमचा पुष्कळ माल खरेदी करूं.

शेरखान हात जोडून म्हणाला, " खाविंद, आम्ही आपल्या पायांचे नोकर आहों, आपली मेहेरबानी आमच्यावर असल्यास आम्हाला काय कमी ? "

तेव्हा हमीदभाई म्हणाला, " पण गस्तंगीर हो, तुम्ही दोनतीन महिन्यांनीं इकडे या. ह्या दीडदोन महिन्यात आम्हाला कांहीं महत्त्वाचीं कामें करावयाचीं आहेत."

तेव्हां दावूदभाई म्हणाला, " होय, तुम्ही दीडदोन महिने इकडे येऊं नका. तुमचा माल पहावयाला आम्हाला फुरसूत सांपडणार नाहीं."

त्यावर शेरखान म्हणाला, " आम्ही एका ठिकाणी पुन्हा तीन चार महिन्याच्या अगोदर कधींच जात नाहीं. खाविंदांची इच्छा असल्यास पुन्हां येथें दीडदोन महिन्यांनी येऊं. आणि येतांना नानाप्रकारचा उंची माल घेऊन येऊं. आपणाला जे महत्त्वाचें काम ह्या दीड दोन महिन्यांत करावयाचे असेल तें संपेपर्यंत आम्ही येथें येणार नाहीं."

तेव्हां दावूद म्हणाला, " ठीक आहे. आतां तुम्ही आपल्या प्रवासांत जें जे पाहिलें, ते तें आम्हाला वर्णन करून सांगा. हें विचारण्याचा आमचा उद्देश काय आहे तें तुम्हाला सांगतों. हा माझा मुलगा हमीदबाळ उद्यां देशपर्यटन करावयाला येथून निघणार आहे. त्याला जगाचा कांहीं अनुभव नाहीं. मुलूख हिंडल्यानें अनेक वस्तु पहावयास मिळतात, अनेकलोकांच्या अनेकप्रकारच्या चालीरीती आढळतात, लोकांचे भिन्नभिन्न स्वभाव समजतात, हे जे अनेक फायदे देश हिंडल्यानें होतात ते दुसऱ्या कशानेंही होत नाहींत. म्हणून मी आपल्या हमीदबाळाला एकदोन महिने मुलूख पहावयासाठीं पाठविणार आहे. "

शेरखान म्हणाला, " खाविंदाचा विचार शहाणपणाचा आहे. "

दावूदभाई म्हणाला, " माझा मुलगा सह्याद्रीच्या रांगेला धरून दक्षिणेकडून उत्तरेकडे जाणार आहे. "

शेरखान म्हणाला, " आम्ही प्रचितगडाच्या मुलखांतून ह्याच आपल्या गडावर आलों. आम्ही आपला माल त्या गडावर विकावयाला गेलों होतों त्याला चारच दिवस झाले. "

दावूदभाई म्हणाला, " तर मग तुमची माहिती ताजीच असणार. त्या गडावर तुमचा माल बराच खपला काय ! "

शेरखान म्हणाला. " खाविंद, त्या गडाचा गडकरी एक हिंदू काफीर आहे. त्याचें नाव हंबीरराव. काफीर लोकांत आमचा माल फारसा खपत नाहीं. हे हिंदू काफीर बिलकूल गद्धे ! "

हे ऐकून दावूद आणि हमीद असे दोघेही खो खो करून हंसले. त्यांच्या हास्यात शेरखान आणि पलंगखान ह्यांनीं भर घातली. हें हास्य समाप्त झाल्यावर शेरखान म्हणाला, " हिंदूकाफिराना अत्तरांची आवड नाहीं. त्याना अत्तराची परीक्षाही नाहीं. बकुळीच्या अत्तराला हंबीरराव चमेलीचें अत्तर म्हणाले; सुरंगीच्या अत्तराला केवड्याचें अत्तर म्हणाले; चाफ्याच्या अत्तराला ते मालतीचें अत्तर म्हणाले. त्याना परीक्षा कांहींच नाहीं. त्यांनीं आमची दोनतीन रुपयांचीं अत्तरें खरेदी केलीं. पण त्यांना आम्ही उंची कनोजी हिन्याचें अत्तर म्हणून गुलाबाचें अत्तर विकलें. सुरंगीचें अत्तर म्हणून जाईचें अत्तर विकलें. त्यांना अत्तराची बिलकूल परीक्षा नाहीं. खोः ! खोः ! खोः !"

ह्या हिंदूगडकऱ्याची अशा रीतीनें कांहीं वेळ टवाळी झाल्यावर शेरखान म्हणाला, " खुद्द गडकरीसाहेब हंबीरराव यांनीं आमचा चार रुपायांचा माल खरीदला. त्याच्या सगळ्या मानकऱ्यांनीं मिळोन दोन रुपयांचा माल खरीदला. आणि त्या गडावरच्या शिपायी प्याद्यांनीं आणि अवातर सर्व लोकांनीं दोन रुपायांचा माल खरीदला. हे हिंदू काफीर लोक अगदीं रानटी लोक आहेत. त्याना विलासांत कसें राहावें हें समजत नाहीं, त्यांना अत्तरें नकोत, त्याना सरबतें नकोत, त्याना आरगजे नकोत, त्यांना रेशमी कापडें नकोत, त्यांना जरीचीं कापडे नकोत, त्यांना सोन्यामोत्यांचे दागिने नकोत, त्यांना हिरेमाणके नकोत, त्यांना कांहीं नको. त्यांना कमरेला लावायला एक वीतभर रुंद आणि दोन हात लांब खादीचा तुकडा मिळाला कीं त्यांना दुसरें कांहीं वस्त्र लागत नाहीं. रात्रीं एक घोंगडी. एवढ्यावर त्यांची गुजराण होते. त्याना खायाला भाकरी बस्स होते. त्याना पक्वान्नें मुळींच ठाऊक नाहींत. हिंदू काफीर बिलकूल गद्धे आदमी ! खोः खोः ! "

ह्या उपहासांत गडकरीसाहेब आणि त्याचा मुलगा हे सामील झाले

हे सांगणें नलगे. ह्यानंतर दावूदभाईनें प्रचितगडाच्या गडकऱ्याच्या मुलखांतील लोकांची स्थिति विचारली. त्यावर शेरखानानें जी माहिती दिली, ती हिंदू लोकांची नालस्ती करणारी होती. ती आम्हीं वाचकांना पुढीलप्रकरणीं निवेदूं.

## प्रकरण १२ वें.

# शिवाजीसंबंधाची माहिती.

दाऊदला हिंदू गडकरी आणि त्यांच्या मुलखांतील रयतेची स्थिति ह्यासंबंधानें जी माहिती मिळवावयाची होती ती अनायासें आणि घरबसल्या शेरखानाकडून मिळत असल्याकारणानें त्याला आनंद होत होता. शेरखानाकडून मिळेल तितकी माहिती मिळविण्याच्या इराद्याने दावूदनें त्याला विचारलें, " शेरखान, प्रचितगडाच्या मुलखांतील रय्यत कितपत आबाद आहे असे तुम्हांला आढळून आलें ? "

त्यावर शेरखान म्हणाला, " त्या काफीर गडकऱ्याची रय्यत अगदीं गरीब आहे. ते सगळे काफीर शेतकरी आहेत. त्यांना लढाईची कांहीं माहिती नाहीं. "

तेव्हां दावूदभाईनें विचारलें, "त्याचा बंदोबस्त कसा काय आहे ?"

त्यावर शेरखाननें उत्तर दिलें, " हे त्या मुलखांतील लोक मला फारसे सुखी वाटले नाहींत. मुसलमानी अंमल त्या मुलखांत झाला तर ते सुखी होतील. हंबीररावांवर त्याची रय्यत फारशी खूष नाहीं. कारण, शेताचं बहुतेक धान्य गडकऱ्याला कर म्हणून त्यांना द्यावें लागतें. खुद्द शेतकऱ्यांना खावयाला फार थोडें धान्य राहतें. "

हें वर्णन ऐकून गडकरी आणि त्याचा मुलगा ह्यांना आनंद झाला असें दिसलें, तेव्हां हमीदनें विचारलें, " प्रचितगडाच्या मुलखांतील रय्यत आपला इसलामी धर्म स्वीकारावयाला तयार होईल काय ? "

त्यावर शेरखानानें उत्तर दिलें "गडकरी जर इसलामीधर्माचा असला तर सगळी रय्यत आपोआप इसलामी धर्माची होईल. आज सगळे हिंदू काफीर काहींतरी रानटी धर्म पाळीत आहेत. त्यांना माणसाच्या दर्जाला आणून पोचवावयाचे असलें तर त्या सर्वांना इसलामी धर्म स्वीकारावयाला भाग पाडलें पाहिजे."

दावूदनें विचारलें, "बरें खानसाहेब, त्या प्रचितगडाच्या मुलखांत तुम्हाला विशेषप्रकारची अशी कांहीं वस्तु दिसली काय ?"

तेव्हां शेरखान म्हणाला, "होय खाविंद; त्या मुलखांत बैलासारखीं उपयुक्त जनावरें मोकाट सोडलेलीं असतात. ह्या बैलांना ते काफीर देव समजून त्यांची पूजा करतात, ह्या बैलाना ते कामाला लावीत नाहींत. हे बैल हावें त्याच्या शेतांत घुसून त्याचें धान्य खातात, पण त्यांना कोणी काठीबिटी मारीत नाहींत. ह्या असल्या बैलांना ते लोक वसू असें म्हणतात. आम्हाला त्या मुलखांत गडाच्या पायथ्याला असले दोन वसू दिसले. दोन्हीही दुधासारखें पांढरें असून त्यांतिल जो मोठा बैल होता तो लहानशा हत्तीएवढा होता. दुसरा त्याच्याहून लहान होता, पण तो देखील घोड्याइतका उंच होता. हे दोन बैल पाहून आम्हाला त्या हिंदूकाफिरांचें आश्चर्य वाटलें. असले उपयुक्त बैल जे कोणी कामाला लावीत नाहींत ते स्वतः बैलच होत."

दावूदनें विचारलें, "प्रचितगड कितपत मजबूद आहे असें तुम्हांला वाटतें ?"

शेरखान म्हणाला, "विजापुरच्या बादशहानें दोन हजार सैन्यानें त्या गडाला पंधरा दिवस वेढा दिला, तर तो गड सहज जिंकून घेतां येईल. तो गड फारसा मजबूत नाहीं. शिबंदी हजाराच्या आंत आहे. त्याच्याजवळ शस्त्रास्त्रें थोडीं आहेत आणि जीं शस्त्रास्त्रें आहेत त्यांचा उपयोग कसा करावा हें त्यांना ठाऊक नाहीं. शिवाय त्यांना लढाईचें कांहीं शिक्षण नाहीं. तो गड अझूनपर्यंत काफिरांच्या ताब्यांत कसा राहिला आहे ह्याचें मला आश्चर्य वाटतें."

हें प्रचितगडाचें वर्णन ऐकून दावूद आणि हमीद ह्यांना आनंद झाला तो त्यांच्या मुखांवर स्पष्ट दिसत होता.

ह्या बापलेकांनीं ह्यानंतर इतर गडासंबंधाने त्या दोन गस्तंगिरांना माहिती विचारिली. गस्तांगिरानींही सर्व गडांची माहिती ह्या बापलेकाना दिली. जे गड मुसलमानाच्या ताब्यात होते त्या गडांवरील गडकरी उत्तम, अधिकारी उत्तम, रय्यत सुखी आणि मुसलमानी अंमलाला संतुष्ट, असे हे गस्तगीर सांगत होते ते ऐकून दावूद आणि हमीद ह्याना आनंद होत होता. शिवाजीनें जे गड नुकतेच जिंकून घेतले होते, त्यावरील गडकरी नादान, अधिकारी नादान, रय्यत असंतुष्ट आणि असुखी आणि गरीब, त्या गडांवरील शिबंदी कमकुवत, लढाईची सामग्री अगदीं जुजबी, अशी माहिती हे दोघे गस्तंगीर गडकरी आणि त्याचा मुलगा ह्यांना पुरवीत होते, आणि त्यांना आनंद होत होता.

असा हा आनंद त्यांना का होत होता ह्याचें कारण वाचकाच्या लक्षांत आलेंच असेल. विजापुरच्या बादशहानें शिवाजीचा बंदोबस्त करण्याची कामगिरी दातेगडाच्या गडकऱ्यावर सोंपविली होती; शिवाजीच्या ताब्यांतील गडासंबंधाची माहिती दाऊदला अनायासें ह्या गस्तंगिराकडून मिळत होती आणि त्या गडावर बंदोबस्त नाहीं, आणि त्या गडांच्या टापूंतील रय्यत असंतुष्ट आहे, ही गोष्ट आपल्याला फायदेशीर आहे असें दावूदला वाटत होतें, आणि असें त्याला वाटणें साहजिकच होतें.

ह्यानंतर दाऊदनें प्रत्यक्ष शिवाजीसंबंधानें त्या गस्तंगिरांना माहिती विचारली, ती त्यांनीं इतका वेळ अवलंबिलेल्या सरणीनेंच दिली.

शेरखान म्हणाला, "खाविंद, शिवाजी या नांवाचा जो काफीर पोरगा आठराएकोणीसांच्या उमरीचा आहे, त्याने आपल्या भोवतीं पुष्कळ काफीर पोरगे गोळा केले आहेत. त्यांनीं जिकडेतिकडे धुमाकूळ मांडला आहे. लोकांना त्याची फार भीति वाटत आहे. कारण, ह्या काफीर पोरांची धाड आपल्या गांवावर किंवा आपल्या घरावर येईल असें त्यांना सदोदित भय वाटत असतें."

दावूदनें विचारलें, "शिवाजीने आजपर्यंत दहाबारा गड जिंकून घेतले आहेत असें माझ्या ऐकिवांत आहे. इतकें गड जर त्यानें जिंकून घेतले आहेत तर त्याच्याजवळ दहाबारा हजाराचें तरी सैन्य असेल !"

तेव्हां शेरखान खोः खोः हंसत सुटला. हें हसें ओसरल्यावर तो हात

जोडून गडकऱ्याला म्हणाला, " खाविंदानीं मला माफी करावी. मी हंसत आहे ह्याचें कारण असें कीं हा शिवाजी काफीर पोरगा तो काय, आणि त्याचें सैन्य तें काय आणि त्याच्या लढाया त्या काय ? सगळीच थट्टा ! खाविंदांना मी शिवाजीसंबंधाची खरी आणि तपशीलवार माहिती सांगतों, ती ऐकण्याची खाविंदानीं मेहेरबानी करावी. "

दावूद आणि हमीद म्हणाले, " सांगा. "

शेरखान म्हणाला, " हिंदूकाफीरांचा शिमगा म्हणून एक सण असतो. ह्या सणांत गांवातील सगळीं उनाड आणि वात्रट पोरें गोळा होतात. ते लोकांच्या घरांत शिरून लांकडें आणि गोवऱ्या चोरून किंवा दांडगाईनें मिळवून आणतात. त्या सर्वांची एक रास करतात. आणि त्याला बत्ती लावून देतात आणि त्या विस्तवाच्या राशीभोंवतीं गोळा होऊन बोंबा मारतात. एवढ्यावरच त्या काफीर पोराचा शिमगा होतो असें नव्हे. मध्यरात्रीं हीं काफीर पोरटीं लोकाच्या घरांचे खांब, दारें, खिडक्या वगैरे जबरदस्तीनें उपटून आणतात आणि विस्तवावर टाकतात. लाकडें, गोवऱ्या वगैरे सर्पण हीं पोरें लोकाच्या घरांतून चोरून आणून विस्तवावर टाकतात. जे जें कांहीं जळण्याजोगें असेल तें तें सारें आणून तीं पोरें विस्तवावर टाकून जाळतात. शिमग्यांत जशी काफीरपोरें गोळा होतात, चोऱ्या करतात, लुटालूट करतात, तसेच हा शिवाजी काफीर पोरगा आणि त्याचे काफीर मदतनीस करीत सुटले आहेत. आज ह्या गडावर छापा घालावा, उद्यां त्या गडावर छापा घालावा, असा क्रम ह्या काफिरानीं चालविला आहे. शिवाजीकाफीराचे मदतनीस काफीर चार पांचशें असतील. त्यांचे सैन्य तें कसचे ? ह्या काफीरांच्या टोळीला किंवा ताफ्याला सैन्य हा शब्द लावणें चुकीचें आहे. कारण त्यांचेपाशीं दारू-गोळा नाहीं, तीरकामठे ओबडधोबड आहेत, तरवारी मोडक्यातोडक्या आहेत, त्याना कवाइतीचा गंध नाहीं, त्याना शिस्त नाहीं; शिवाजी काफीर हा ह्या लुटारू, चोर आणि दरवडेखोर लोकाच्या टोळीचा नायक आहे. त्याला नेस्तनाबूद करणें कांहीं कठिण काम नाहीं. "

दावूदनें विचारलें, " शिवाजीचे मुख्य मुख्य मदतनीस कोणकोण आहेत हे तुम्हाला ठाऊक आहे काय ? "

शेरखानानें उत्तर दिलें, " शिवाजी काफीराचे मुख्य तीन मदतनीस आहेत. ते तीन्ही काफरिच आहेत. एक तानाजी मालुसरे, दुसरा एसाजी कंक आणि तिसरा बाजी पासलकर. याशिवाय त्याचे पुष्कळ मदतनीस आहेत. ते सारे काफीरच आहेत. चोऱ्या करणें, लुटालूट करणें, दरवडे घालणें, हेंच त्या सर्वांचे धंदे. त्यांच्यापैकी कोणीही शेतकीचा किंवा दुसरा कोणताही धंदा करणारे नाहींत. "

दावूदनें विचारलें, " तुम्ही कधीं ह्या शिवाजीला किंवा त्याच्या ह्या तीन मुख्य मदतनीसांना पाहिलें आहे काय ?"

शेरखान म्हणाला, " होय; मी आणि हा माझा दोस्त पलंगखान असे आम्ही दोघेजण आपला माल विकावयासाठीं गणवंतगडावर गेलों होतों. इतक्यांत शिवाजी आणि त्याची दरवडेखोरांची टोळी अचानक त्या गडांत शिरली. त्या काफीरांनीं तो गड लुटला. आल्लाच्या लेकरांना त्यांनीं कापून काढलें, आणि तेथें मंदार ह्या नांवाचा एक काफीर पोरगा गडकरी केला. त्याप्रसंगीं आमचा सर्व माल त्या काफीर दरोडेखोरांनीं लुटला आणि मोठ्या प्रयासानें आम्ही जिवानिशीं सुटलों. त्याप्रसंगीं तो शिवाजी काफीर आणि त्याचे मुख्य तीन काफीर दोस्त आमच्या पाहाण्यांत आले. त्यावेळीं आमचें पांचशें रुपायांचें नुकसान झालें. परंतु आमचे पुष्कळ पैसे विजापुरास ठेवलेले असल्याकारणानें आम्हांला हें पांचशे रुपायांचें नुकसान फारसें जाणवलें नाहीं. असो. पण विजापुरच्या बादशहाच्या परवानगीनें आपणच त्या शिवाजी काफिराला पकडावयाचा प्रयत्न कां करीत नाहीं ? आपण हां हां म्हणतां त्या दरवडेखोर काफीर टोळीला नेस्तनाबूद करून टाकाल. "

तेव्हां दावूद आणि हामीद हे एकमेकांकडे पाहून गालांतल्या गालात हंसले, पण ते कांहीं बोलले नाहींत. मग दावूद म्हणाला, " हें पहा खानसाहेब, आमच्या ह्या दातेगडाला आमच्या मुलखांतील रयतेला त्या दरवडेखोर लोकांनीं जोंपर्यंत उपद्रव दिला नाहीं, तोंपर्यंत आम्हाला तिकडे लक्ष्य देण्याचें कांही कारण नाहीं. विजापुरचे बादशहा वाटल्यास त्या टोळीचा बंदोबस्त करतील. तुम्हांला असेंच नाहीं कां वाटत ? "

शेरखान म्हणाला, " खाविंदांचा विचार स्तुत्य आहे. आपणाला उपद्रव होत नाहीं इतकी आपण खबरदारी घेतली म्हणजे बस्स. "

दावूद म्हणाला, " आम्हांला त्या दरवडेखोरांचा उपद्रव होणें शक्य नाहीं. आमचा हा गड फार मजबूद आहे. उद्या तुम्हीं आमचा हा गड मुद्दाम पहा. तो आमच्यामतानें फार मजबूद आहे. आमची शस्त्रास्त्रांची सामग्री, धान्यसामग्री पांच वर्षें पुरण्याइतकी असून आमच्या शिपायांचें लष्करी शिक्षण उत्तमप्रतीचें आहे. "

शेरखान म्हणाला, " आपण आपला कोणी नोकर आम्हांला हा गड दाखवावयाला दिला तर उत्तम होईल. "

दावूद म्हणाला, " आलबत देऊं. उद्या सकाळीं आमच्या मुलाची रवानगी करून दिल्यावर तुम्हांला हा आमचा गड दाखविण्याची मी व्यवस्था करवीन. उद्या दुपारीं तुम्हीं आपला माल ह्या गडावर विका. परवां तुम्ही ह्या गडावरून गेलां तरी हरकत नाहीं. असो. आतां रात्र होत चालली. आमचा नोकर तुम्हांला रात्रीची वसति करावयाला जागा दाखवून देईल. "

तेव्हां शेरखान आणि पलंगखान असे दोघेजण एकदम उद्गारले, "आम्हीं खाविंदांचे आभारी आहों. आल्ला आपले मनोरथ सफल करो."

यानंतर गडकऱ्यानें आबदुल्लाला हाका मारून बोलाविलें, आणि त्या दोघां गस्तंगिराच्या रात्रीच्या वसतीची तजवीज करावयाला सांगितलें.

---

## प्रकरण १३ वें.

# इलाहीबक्ष आणि गस्तंगीर.



दावूदभाई गडकऱ्याचा मुलगा हमीदभाई हा पुष्कळवेळां दातेगडाच्या बाहेर जात असे. कधींकधीं शिकारीच्या निमित्तानें तो गडाबाहेर जात असे. कधींकधीं तो आपल्या एकाद्या मित्राच्या घरीं लग्नकार्याच्या निमित्तानें जात असे. कधींकधीं तो विजापुरशहरीं केवळ गमतीसाठीं आठआठ पंधरापंधरा दिवस देखील रहावयाला जात असे. ह्या कारणामुळें दातेगडावरील लोकांस हमीदभाईचें गडाच्या बाहेर जाणें ही कांहीं नवल वाटण्याजोगी गोष्ट नव्हती.

मागील प्रकरणात सांगितलेली हकीगत ज्या दिवशीं घडली, त्याच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे शनिवारी सकाळीं हमीद आपल्या बारा मित्रासह आपल्या बापाच्या कामगिरीवर जावयाला सिद्ध होऊन त्याचा निरोप घ्यावयाला आला. दावूदने त्याला निरोप दिल्यावर तो दातेगडाच्या बाहेर पडला. तो कोणच्या विशिष्ट कामगिरीवर निघाला होता, हें कोणालाच ठाऊक नव्हतें. ही नेहमींच्या परिपाठांतीलच गोष्ट होय असें समजून कोणी त्याच्या ह्या सफरीसंबंधानें कांहीं चौकशी केली नाहीं, किंवा त्यात कांहीं विशेष उद्देश आहे अशी कोणालाही शंका आली नाहीं.

परंतु हमीदभाईच्या ह्या सफरीचा उद्देश दातेगडावरील लोकांना जरी ठाऊक नव्हता, तरी तो आमच्या वाचकांना ठाऊक आहे. शिवाजीचें शस्त्रास्त्रबल किती आहे, सामान्य रयतेचा ओढा मुसलमानी अमलाकडे अधिक आहे किंवा हिंदू अमलाकडे अधिक आहे, शिवाजीचे दोस्त कोणकोण आहेत, किती आहेत, त्याचें सैन्यबल किती आहे, द्रव्यबल किती आहे, वगैरे संबंधाची माहिती आणावयासाठीं तो ह्या सफरीवर निघालेला होता. ही माहिती त्याला शेरखान आणि पलंगखान ह्या दोघा गस्तगिरांकडून मिळालेली होतीच. परंतु ही माहिती किती अंशानीं विश्वसनीय आहे, हें तो स्वानुभवावरून जाणून घ्यावयाच्या उद्देशानें ह्या सफरीवर निघालेला होता.

परतु हमीदभाई ही बापाने त्याच्यावर सोपविलेली कामगिरी खरोखरी करणार होता काय ?

हमीदभाईला दातेगडावर राहाणे मनापासून आवडत नसे. कारण तो दातेगडावर असला म्हणजे दावूदभाईची नजर त्याच्या कृत्यावर असे, तेणेंकरून त्याला स्वच्छंदी आचरण करता येत नसे. दातेगडाच्या बाहेर तो असला म्हणजे सुंदर स्त्रियांच्या नादांत असणे, आपण गडकऱ्याचा मुलगा ह्या जोरावर हूडपणाचीं कृत्यें करणें, इत्यादि गोष्टी त्याला मनसोक्त करता येत असत. म्हणून आता त्याला खुद्द बापच दातेगडाच्या बाहेर एका कामगिरीवर पाठवीत असल्याकारणाने त्याला फार आनंद झाला. सभोवतालच्या प्रदेशाची स्थिति पाहाण्याच्या निमित्तानें आपणाला दातेगडाच्या बाहेर पडावयाची आयती संधी मिळाली

आहे, आतां आपण रंगेलपणाने काळ घालवूं शकूं म्हणून त्याला अतोनात आनंद झाला. भरपूर पैसे घेऊन तो आपल्या बारा दोस्तासह दांतेगडाच्या बाहेर पडला.

असो. गडातून मुलाची रवानगी करून दिल्यावर दावूदभाई आपल्या नित्याच्या क्रमाला लागला. आपले दोन गस्तंगीर शेरखान आणि पलंगखान हे आपले विकावयाचे पदार्थ घेऊन त्या गडावरील मानकऱ्याच्या आणि मोठ्या मोठ्या अधिकाऱ्यांच्या वाड्यांत जावयाला निघाले.

ह्या दातेगडावरील जे मुख्य अधिकारी होते त्यात इलाहीबक्ष हा सेनापति पहिल्या प्रतीचा होता. त्याच्याच वाड्यात आपले हे दोन गस्तंगीर प्रथम शिरले.

देवडीवरील पहारेकऱ्यानें त्याना आत सोडल्यावर ते इलाहीबक्ष आणि त्याचा भाऊ हे ज्या दिवाणखान्यात होते तेथे जाऊन बसले. येथे इलाहीबक्ष ह्याच्या परवानगीने त्यानीं आपले विकाऊ पदार्थ पसरून मांडून ठेविले.

सेनापति आणि त्याचा भाऊ ह्यानीं अनेक प्रकारचीं तेले, अत्तरें, उदबत्त्या, धूप, अरगजे, वगैरे पदार्थ खरेदी केले. नंतर त्यांनीं आपल्या बायकासाठीं अनेक रंगांचीं आणि नानाप्रकारचीं रेशमें, सुया, दोरे वगैरे पदार्थ खरेदी केले.

हें खरेदी करण्याचें काम आटोपलें तेव्हां आपले गस्तंगीर सामानाची अवराआवर करूं लागले. ह्या वेळीं सेनापति त्यांना त्यांच्या धंद्यासंबंधानें, त्यांनी पाहिलेल्या ठिकाणासंबंधानें, त्यांच्या प्रवासासंबंधानें, ह्यांना आलेल्या अनुभवासंबंधानें आणि त्यानीं पाहिलेल्या देखाव्यासंबंधाने प्रश्न विचारीत होते. त्याचीं उत्तरें शेरखान आणि पलंगखान हे देत होते. ह्या प्रश्नोत्तरांपैकीं काहीं प्रश्न आणि उत्तरें आम्ही वाचकांना सादर करतों.

इलाहीबक्ष ह्यानें विचारले, " खानसाहेब, तुमचा माल विशेषतः कोठें खपतो ? "

शेरखानाने उत्तर दिलें, " आमचा माल शहरांत फार खपतो. वाई, सातारा, कऱ्हाड, पाटण वगैरे ठिकाणीं चैनीचे, विलासाचे, शौकाचे पदार्थ फार खपतात, खेड्यात उपयोगाचे पदार्थ फार खपतात, आणि गडांवर दोन्ही प्रकारचे पदार्थ खपतात. पण सर्वच गडांवर सारखे खपत नाहींत. ज्या गडाचे गडकरी हिंदू आहेत त्या गडांवर आमचा अगदीं थोडा माल खपतो. जे गड आपणा मुसलमान लोकांच्या अमलाखालीं आहेत त्यांचेवर फार खपतो. "

खुदाबक्षनें विचारलें, " तुम्हीं कोणकोणच्या गडांवर गेलेले आहां ? "

पलंगखाननें उत्तर दिलें, " आम्ही कमालगड, पांडवगड, केजळगड, कल्याणगड, भूषणगड, भोपाळगड, प्रचितगड, गणवंतगड, जंगली जयगड, बहिरवगड, वगैरे पुष्कळ गडांवर आमचा माल विकावयासाठी गेलेले आहों. गणवंतगडावर आम्हीं गेलों असतां आमचें फार फार नुकसान झालें. आमच्या सर्व मालाची नासाडी झाली, आमच्या जवळचे पांचशें रुपये चोरीस गेले किंवा लुटले गेले आणि आम्ही दोघेजण मोठ्या शर्तीनें जिवानिशीं सुटलों. मग पुन्हा आम्हीं विजापुरास गेलों. तेथें आमचे जे पैसे होते ते खर्चून नवीन माल खरेदी केला, आणि पुन्हा हा गस्तंगिरीचा धंदा करावयाला निघालेले आहों. "

इलाहीबक्ष हळहळून म्हणाला, " शेरखान, असे कसें झालें ? काय प्रकार झाला तो आम्हांला तपशीलवार सांगा. "

शेरखान म्हणाला, " आम्हीं गणवंत गडावर आपला माल विकावयासाठीं गेलो. तो गड त्यावेळीं मुसलमानांच्या ताब्यांत होता. उस्मानभाई हा तेथला गडकरी होता. तो गड त्यावेळेपर्यंत विजापुरच्या बादशहाच्या ताब्यांत होता, आणि त्यानेंच नेमलेला उस्मानभाई त्या गडाचा गडकरी होता. त्या गडावर आमचा पांचसहाशे रुपयांचा माल दोन तीन दिवसांत खपला. आम्ही उरलेला माल चवथ्या दिवशीं घेऊन तो गड सोडून जाणार होतों, तों त्या रात्रीं ( ती अमावास्येची रात्र होती ) त्या गडावर एक चारपांचशे दरोडेखोरांचा हल्ला आला. "

खुदाबक्ष आश्चर्याच्या मुद्रेनें म्हणाला, "हे दरवडेखोर गडांत घुसले कसे ? गडाचे दरवाजे त्यांना उघडतां आले कसें ? गडाच्या शिबंदीनें त्यांना पळवून कसें नाहीं दिले ? किंवा त्यांची कत्तल कशी नाहीं केली ? "

त्यावर शेरखान म्हणाला, " हा दरवडा आला तो मध्यरात्रीं आला. त्यावेळीं आम्ही दोघेजण गाढ झोंपेत होतों. दरवडेखोर गडांत कसे शिरले तें आम्हाला साधार कळलें नाहीं. कोणी म्हणत कीं, दरोडेखोरांनीं दरवाज्यांवर डुकरमुंड्या चालवून ते फोडून टाकले. कोणी म्हणत कीं, पहारेकऱ्यांच्या हलगर्जीपणामुळें दरवाजे उघडे राहून गेले होते. कोणी म्हणत कीं, अमावास्येच्या अगोदर दोन तीन हिंदू मुसलमानी पेहेरावांत गडावर येऊन राहिले होते, त्यानीं दरवाजे त्या दरवडेखोराना उघडून दिले असतील. अनेक लोकाचे अनेक तर्क होते. दरवडेखोर गडांत कसे शिरले हे नक्की कोणालाच ठाऊक नव्हते. "

इलाहीबक्षनें विचारलें, " पण ते दरवडेखोर गडांत शिरले तेव्हां त्याना गडाच्या शिपायांनीं पकडलें नाहींत कसें ? "

तेव्हा शेरखान म्हणाला, " हे दरवडेखोर आले ते मध्यरात्रीं आले. त्यावेळीं गडाचें निम्याहून अधिक सैन्य गडकरीसाहेब आपल्या हाताखालीं घेऊन कोणच्याशा मोहिमीसाठीं बाहेर गेलेलें होतें. गडाच्या संरक्षणासाठीं दोनशें शिपायी त्यांनीं मागें ठेविलें होते. हे दोनशें शिपायी चारपांचशे दरवडेखोरापुढें कसा टिकाव धरणार ? दरवडेखोर गडात आले तेव्हां गडातलि शिपाई निजलेले होते. ते जागे होऊन हत्यारांपात्यारांची जुळवाजुळव करावयाच्या अगोदरच ते त्या दरवडेखोराकडून कापले गेले. "

इलाहीबक्ष म्हणाला, " बरे पुढे ? "

पलंगखान म्हणाला, " त्या धादलींत जे कोणी लोक पळून जाऊं शकले त्यांत आम्ही दोघेजण होतों. आमचा माल खपवून आम्हीं मिळविलेले पांचसहाशें रुपये आणि आमचा न खपलेला माल तेथेंच टाकून देऊन आम्हीं गडातून मोठ्या शर्तीनें निसटून बाहेर पडलों. आमची मोठी नुकसानी झाली. "

इलाहीबक्षने विचारलें, " पण उस्मानखानाच्या बरोबर गडाच्या बाहेर गेलेले दोन तीन हजार शिपायी परत नाहीं आले कां ? "

पलंगखान म्हणाला, " त्यांपैकीं सातआठशें लोक प्राचितगडाच्या पुढें मरून पडले होते. पण बाकीच्या दोन--आडीचहजार शिपायांचें काय

झालें तें कोणाला ठाऊक नाहीं. आम्हीं सांगत आहो ती सगळी हकी-गत ऐकीव आहे. प्रत्यक्ष पाहिलेली नाहीं."

खुदाबक्षनें विचारलें, "हे दरवडेखोर कोण लोक होते ? त्याचा नायक कोण होता ? त्यांच्याजवळ शस्त्रास्त्रें काय होतीं ! त्यांचे पोशाख कसले होते ?"

त्यावर शेरखानाने उत्तर दिले, "ती अमावावस्येची रात्र असल्या-कारणानें आम्हाला त्याचे पोशाख किंवा शस्त्रास्त्रे दिसली नाहींत. परंतु ते वारंवार 'हरहर महादेव' अशा आरोळ्या मारीत होते. त्यावरून ते हिंदू काफीर असावेत असे आम्हाला वाटले. ह्या दरवडेखोरांसंबंधाने आम्हाला त्या अमावास्येच्या रात्रीं काही माहिती कळली नाही. परंतु दुसऱ्या दिवशीं आणि त्यानंतर आम्हाला अनेक लोकांच्या तोंडून पुष्कळ माहिती मिळाली."

इलाहीबक्षनें विचारले, "ती काय काय माहिती तुम्हाला मिळाली?"

शेरखानानें उत्तर दिलें, "आम्हाला भिनभिन्न लोकांकडून, भिन्न-भिन्न वेळीं, भिन्नभिन्न ठिकाणीं, जी माहिती मिळाली ती एकवटून मी सांगतों."

इलाहीबक्ष म्हणाला, "सागा."

शेरखान म्हणाला, "आम्हीं असें ऐकिलें आहे कीं ह्या दरवडेखोर टोळींतील सर्व इसम हिंदू काफीर आहेत. ह्या टोळींत सर्वजातीचें लोक आहेत, पण मराठे जातीच्या काफिरांचा फार मोठा भरणा आहे. ह्या टोळीचा नायक शिवाजी ह्या नांवाचा एक मराठे जातीचा काफीर आहे. ह्या शिवाजीचे तीन दोस्त आहेत. त्यांचीं नांवें तानाजी, एसाजी आणि बाजी अशीं आहेत. हे तीघेही मराठा जातीचे काफीर आहेत. ह्या टोळीचा उद्देश चोऱ्या करणें, दरवडे घालणें, एकाद्या गांवावर हल्ला करून लुटालूट करणें, एकाद्या श्रीमंताला छळून त्याच्यापासून पैसे काढणे असा आहे. ह्या टोळीमध्यें पांचशें काफीर आहेत, असें आम्ही बहु-तेकांच्या तोंडून ऐकिलें आहे. पण काही लोक म्हणतात कीं, ह्या दरवडे-खोर काफिरांच्या टोळींत एकहजार लोक आहेत, कोणी म्हणतात दोन हजार आहेत, कोणी म्हणतात तीन हजार आहेत, पण आम्ही गण-वंतगडावर जो प्रकार पाहिला, त्यावरून त्यांची संख्या पांचसहाशेंहून

अधिक नसावी असें आम्हाला वाटतें. आपणासारख्यांनीं ह्या टोळीचा विध्वंस करावयाचें मनांत आणलें, तर आपण तीन दिवसांत त्यांचा विध्वंस करून टाकाल. ह्या काफीरांनीं ह्या मुलखांत भारी पुंडावा मांडला आहे. कोणाला सुखानें भाकरी खाता येत नाहीं. ह्या दरवडेखोरांचा हल्ला केव्हा येईल याचा नेम नाहीं. सर्व रय्यत दुःखी आहे. आम्हासारख्या निरुपद्रवी गस्तंगिराना ते केव्हा गाठून लुबाडतील ह्याचा नेम नाहीं. आम्ही हा धंदा मुठींत जीव धरून करीत असतो. आम्हावर दया करून ह्या दरवडेखोर काफिरांची टोळी आपण नेस्तनाबूद करून टाकिली, तर अलम दुनियेवर मोठे उपकार होतील."

त्यावर इलाहीबक्ष म्हणाला, "आमच्या पादशहाच्या हुकुमावांचून आम्हाला हा गड आणि त्याच्या अमलाखालचा मुलूख सोडून जातां येत नाहीं. त्या दरवडेखोरानीं ह्याच गडावर हल्ला केला किंवा ह्या गडाच्या हद्दींत दरवडे घातले तर आम्ही त्याचा समाचार घेऊं, पण आमचा गड इतका मजबूत आहे कीं, दहाहजार सैन्य जरी ह्या गडावर हल्ला करावयाला आलें तरी आम्ही आपला गड सुरक्षित ठेवूं शकूं."

त्यावर शेरखान म्हणाला, "आपण म्हणता ते खरें आहे. हा गड फार मजबूद आहे. त्याची तटबंदी दहाबारा हात रुंदीची भिंत असून ती सगळी आतून आणि बाहेरून घडीव चिऱ्याची बांधलेली आहे. दोन दगडांत दाभण खुपसूं म्हटले तरी तें शक्य नाहीं."

इलाहीबक्ष आनंदानें म्हणाला, "होय, आमचा गड फार मजबूद आहे आणि आमच्याजवळ दहा वर्षें पुरण्याइतकी अन्नसामग्री आणि दारूगोळा आहे. आमच्या गडाला मुळीच कांहीं भीति नाहीं."

---

## प्रकरण १४ वें.

# एक बहिरी आणि मुकी मुलगी.



दातेगडाच्या मजबूतपणाबद्दल इलाहीबक्ष ह्यानें तपशीलवार माहिती त्या दोघां गस्तंगिरांना सांगितली, नंतर दातेगडावर शस्त्रास्त्रांचा, दारू-

गोळ्याचा, धान्याचा, गवताचा वगैरे खूब मोठा पुरवठा आहे म्हणून त्यानें मोठ्या अभिमानाने त्या दोन गस्तंगीरांना सांगितले.

हें इलाहीबक्ष ह्याचें भाषण ते गस्तंगीर स्वस्थपणे ऐकून घेत होते, आणि तें वर्णन त्याना आनंददायक वाटत होते असें त्याच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसण्याजोगे होते.

तें इलाहीबक्ष ह्याचे भाषण संपले तेव्हा शेरखान म्हणाला, "आम्हा गरीब गस्तंगिरांची आपणाला दया येऊं द्या. विजापुरच्या बादशहा-कडून आपण परवानगी आणवून जर त्या दरवडेखोर टोळीवर हल्ला केला तर ती टोळी आपण क्षणार्धांत उधळून लावूं शकाल. आपल्या शौर्याची आणि पराक्रमाची कीर्ति विजापुरच्या ज्या त्या इसमाच्या तोंडी आहे."

ह्या प्रशंसेने खूष होऊन इलाहीबक्ष म्हणाला, "खरेंच का?"

शेरखान म्हणाला, "होय खाविंद, सर्व लोक असें म्हणत आहेत कीं ह्या दरवडेखोराचा विध्वंस करावयाला एक इलाहीबक्ष समर्थ आहेत, दुसरे कोणी नाहींत."

इलाहीबक्षनें विचारलें, "सर्व लोक असें म्हणत आहेत काय?"

शेरखान म्हणाला, "होय खाविंद. ह्या गडाचे गडकरीसाहेब दावूद-भाई याचें कोणी नांव घेत नाहीं."

इलाहीबक्ष म्हणाला, "गडकरीसाहेब साठी उलटलेले आहेत. आम्हा तरुणांच्या इतके ते तल्लख असणें शक्य नाहीं. मी ती टोळी नेस्तनाबूद करावयाला निघालों तर तीन दिवसात तसें करूं शकेन; इतकेंच नव्हे, तर जे जे किल्ले आज हिंदूंच्या ताब्यात आहेत, ते ते सर्व पंधरा दिवसांच्या आंत जिंकून बादशहाच्या राज्याला जोडून देईन."

शेरखान म्हणाला, "विजापुरचे सर्व लोक हेंच म्हणत आहेत. आपण आपल्या तीन हजार सैन्यानिशीं जर स्वारीवर निघालां तर एका मागून एक असे गड जिंकीत जाल."

इलाहीबक्षनें विचारलें, "मऱ्हाठे लोकांच्या ताब्यात जे गड आहेत त्यापैकीं अत्यंत अशक्त गड कोणचा?"

तेव्हा पलंगखान म्हणाला, " सर्वच गड अशक्त आहेत. कोणत्याही गडाची शिबंदी पांचशेंहून अधिक नाहीं. कोणत्याही गडावर पंधरा दिवस पुरण्याइतकी अन्नसामग्री नाहीं. एकाही गडावर तोळाभर दारु नाहीं. त्या काफिरांची लढण्याचीं साधने म्हटलीं म्हणजे तीर, कमानी, मोडक्या-तुटक्या तरवारी, गोफणी हीं असतात. सर्वांत अत्यंत अशक्त गड विचाराल तर तो माझ्या मतानें गणवंतगड होय. त्या गडापुढें आपण सैन्य घेऊन गेला कीं तो गड आपणाला शरण येईल. तो जिंकून घ्यावयाला आपणाला कांहीच श्रम पडणार नाहींत. त्या गडाचा गडकरी एक सतराआठरा वर्षांचा पोरगा आहे असें मीं ऐकिलें आहे. तोही मराठे जातीचा काफीर आहे. त्याची शिबंदी म्हटली म्हणजे पन्नास साठ बाजारबुणगे काफीर आहेत. गणवंतगड जिंकून घेतल्यावर आपण प्रचितगडावर स्वारी करावी. तेथील गडकरी हंबीरराव म्हणून एक म्हातारा काफीर आहे. मग आपण जंगली जयगड, भैरवगड, भोपाळगड, केंजळगड वगैरे गड सर करीत जावे. एकेक गड जिंकून घ्यावयाला आपणाला एक एक दोन दोन दिवस पुरे होतील. ह्या शिवाजीने आपल्या मुसलमानी राज्यांत फार धुंडावा मांडला आहे. त्याचें शासन झाल्याशिवाय रय्यत आबाद होणार नाही. येवढें पुण्य आपण पदरांत घ्याच घ्या. आम्हां गस्तंगीर लोकांचा धंदा सुरक्षित चालेल असें झालें, म्हणजे तमाम दुनियेचें कल्याण होईल."

त्यावर खुदाबक्ष म्हणाला, " तुम्हीं म्हणता ते खरें आहे. पण बादशहाची परवानगी मिळाल्याशिवाय आम्हांला हें करतां येणार नाहीं. तशी परवानगी मिळण्याची मी खटपट करीन. आणि तुम्हासारख्या गस्तं-गीर लोकानीं बादशहाच्या दरबारात फार बोभाटा केला पाहिजे, म्हणजे बादशहा ह्या गोष्टीचा विचार करूं लागतील. बरें तें असो, पण आतां तुम्ही आपला माल दुसरीकडे विकावयाला घेऊन जा."

शेरखान आणि पलंगखान एकदम उद्गारले, " होय खाविंद, तस-दीची माफी असावी."

असें म्हणून ते दोघे गस्तंगीर सामान आवरून ते पडशांत घालून आणि त्या पडशा खांद्यावर टाकून खुदाबक्षच्या वाड्याच्या बाहेर पडले.

मानकरी आणि अधिकारी वगैरे लोकांच्या वाड्यांत ह्या गस्तंगिरानीं

आपला माल खपविल्यानंतर ते त्या गडावरील एका झाडाच्या छाये-खाली आपला माल मांडून बसले. शिबंदीतील शिपायी, आणि गडावरील इतर रहिवासी त्याचा माल खरेदी करावयाला येत होते, येथेही त्याचा बराच माल खपला. ह्या गस्तंगिराच्या पडशा आणि कंटाळ्या अगदीं हलक्या झाल्या.

ह्या गस्तंगिराचें हे माल खपविण्याचें काम मध्यान्हापर्यंत चाललें होतें. मध्यान्हाच्या सुमारास एक मुसलमान त्याच्यापाशी कांहीं जिन्नस विकत घ्यावयाला आला. हा जिन्नस विकत घेऊन तो तेथून उठून जावयाला निघतो तोंच तेथे एक सोळासतरा वर्षांची मुलगी कांहीं जिन्नस विकत घ्यावयाला आली. तिला पाहाताच हा गिऱ्हाईक मुसलमान तिच्याकडे अनुकंपेच्या मुद्रेने एकवार नजर टाकून गस्तंगिराना म्हणाला, " हतभागी बिचारी ! ही पोरगी इतकी सुंदर आहे, इतकी कुशल आहे, इतकी प्रामाणिक आहे, इतकी सभ्य आहे, पण बिचारी मुकी आणि बहिरी आहे ! "

त्याला शेरखानानें विचारले, " ती ह्या गडावर पोट कसें भरतें ? "

तो मुसलमान गिऱ्हाईक म्हणाला, " आमचे सेनापति इलाहीबक्ष आणि त्यांचा भाऊ खुदाबक्ष याच्या बायकाना ती कशीदा शिकविते. त्या तिच्या आणि तिच्या बहिणीच्या पोटाला पुरण्याइतका तिला पगार देतात. ती बहीण दोघींचा स्वयंपाक करते. ही पोरगी कशीदा उत्तम काढते. "

पलंगखानानें विचारलें, " त्या दोघी हिंदू आहेत काय ? "

तो गिऱ्हाईक मुसलमान म्हणाला, " आलबत ! त्या दोघी मराठे जातीच्या आहेत. ह्या पोरीचा पेहेराव पहा. तो मराठे जातीचा दिसत आहे. "

असें बोलून तो मुसलमान गिऱ्हाईक तेथून निघून गेला.

नंतर ती मुकी आणि बहिरी मुलगी ह्या गस्तंगिरांच्या पुढें बसली आणि हाताच्या खुणांनीं त्याचे जवळ कांहीं जिन्नस आहेत काय म्हणून विचारूं लागली. परंतु ह्या मुलीचा ह्या दोघां गस्तंगिराशीं जो सौदा

झाला तो वर्णावयाच्या अगोदर तिचा थोडासा परिचय वाचकाना करून देणे जरूर आहे.

ही मुलगी वयानें सोळासतरा वर्षांची असून ती काठीनें मध्यम उचीची आणि अंगाने मध्यम जाडीची होती. तिचीं गात्रें प्रमाणशुद्ध असून ती वर्णानें निमगोरी होती. तिचे कपाळ उंच असून डोळे विशाल आणि काळेभोर होते. तिचें मुख जरासें वाटोळे होते आणि तिच्या लालभडक ओठांतून दिसत असलेले पांढरे शुभ्र दात हारीनें माडलेल्या मुक्ताफलाप्रमाणे झळकत होते. ह्या वेळीं ती नारायणपेठचे लुगडें नेसलेली असून त्याचा पदर तिनें डोक्यावरून घेतलेला होता. हें लुगडें ती नीटनेटकेपणानें नेसलेली होती आणि तेणेकरून तिच्या गात्रांची प्रमाणशुद्धता व्यक्त होण्याजोगी होती.

ही मुलगी सुंदर होती, पण तिच्या सौंदर्यापेक्षा तिचा मोहकपणाच प्रेक्षकाची दृष्टि अधिकप्रमाणात आकृष्ट करून घेत असे. ह्या विशिष्ट समयीं तिच्या मुद्रेवर गंभीरपणाचा ठसा उमटलेला होता.

ही मुलगी ह्या गस्तंगिराचे पुढें बसली आणि तिनें आपल्या हातांतील रेशमी फडक्याची पुर्चुडी खोलून त्याच्यापुढें ती पसरून ठेविली. हें रेशमी फडकें काळ्या रंगाचें असून त्याचेवर कशिद्याचीं फुलें काढलेलीं होतीं. हीं फुले कांहीं लहान आणि कांहीं मोठी असून तीं अनेक रंगात भरलेलीं होती. ह्या फुलाची माडणी त्या काळ्या फडक्यावर कांहीं विशिष्ट तत्त्वावर केली होती की काय कोण जाणें.

ह्या सुंदर मुलीनें तें रेशमी फडकें त्या गस्तंगिरांच्यापुढें जमीनीवर साफ पसरून ठेविलें, आणि त्या फडक्यात तिनें बाधून आणलेल्या वस्तु त्या फडक्याच्या ज्या भागावर मुळींच कशिद्याचीं फुलें नव्हतीं त्या भागीं उजव्या हाताच्या तर्जनीनें सारुन ठेविल्या. ह्या वस्तु काय काय होत्या हे आमचे वाचक आम्हाला विचारतील तें आम्ही त्याना सागतों.

ह्या वस्तूंमध्यें एक पाढरा वाल, एक गुंज, दोन गव्हाचे दाणे, तीन मसूराच्या डाळीच्या डाळिंब्या, तीन उडीद, आणि पांच हरभऱ्याच्या डाळिंब्या होत्या.

ह्या मुक्या मुलीनें ह्या १५ वस्तूंचा बोटांनीं कसा निर्देश करून हातांनीं काय काय आणि कशा कशा खुणा करून आपलें मनोगत त्या गस्तंगिरांना कळविलें, गस्तंगीर तिच्याशीं कोणच्या खुणांनीं बोलले, हें आम्ही येथें तपशीलवारपणें सांगत बसत नाहीं. आम्ही येथें वाचकांना इतकेंच सांगतों कीं, ह्या सुंदर पण हतभाग्य मुलीला जे जे पदार्थ जितक्या जितक्या परिमाणांत पाहिजे होते, ते ते पदार्थ तितक्या तितक्या परिमाणांत त्या गस्तंगिरांनीं तिला पुरविले. ते पदार्थ पुढे दिल्याप्रमाणें होतेः—

पांढऱ्या वालाच्या रंगाची एक लड, गुंजेसारख्या तांबड्या रंगाची एक लड, गव्हाच्या रंगाच्या दोन लडी, शेंदरी रंगाच्या तीन, उडदी रंगाच्या तीन, आणि हरभऱ्याच्या डाळिंब्यांच्या रंगाच्या पांच लडी, अशा एकंदर पंधरा रेशमी लडी त्या गस्तंगिरांनी तिला दिल्या. हें रेशीम कशिद्यासाठीं त्या मुलीला पाहिजे होतें असें तिनें हाताच्या खुणांनीं त्या गस्तंगिरांना कळविलें.

ह्या पंधरा लडींची किंमत जी झाली ती त्या मुलीनें त्या गस्तंगिराना दिली, आणि मग ती तेथून उठून आपल्या बिऱ्हाडाकडे ( म्हणजे इलाहीबक्षाच्या वाड्यांतील तिला दिलेल्या खोलीकडे ) रवाना झाली.

ही सुंदर मुलगी ह्या लडी विकत घेत असतां त्या वाटेनें जाणारे-येणारे लोक तिच्याकडे सानुकंप नजरेनें पाहात होते, आणि कांहीं लोक " हतभाग्य बिचारी ! " असा उद्गार काढीत होते.

ह्या वेळीं मध्यान्हाचा समय झाला होता. गस्तंगीर आपल्या विकून उरलेल्या सामानाची आवराआवर करण्याच्या कामाला लागले, तों तेथें आबदुल्ला नांवाचा गडकऱ्याचा खिजमतगार आला आणि त्यांना म्हणाला, " खाविंदांनीं आपणास उभ्या उभ्या येऊन त्यांना भेटून जाण्याचा हुकूम केला आहे. "

शेरखानानें त्याला विचारलें, " आह्मी आतांच यावें काय ? आणि दोघांनींही एकदम यावें काय ? "

त्यावर आबदुल्ला म्हणाला, " तुह्मा दोघांपैकीं कोणीही एक इसम आला तरी चालेल. पण जो येणार असेल त्यानें आतांच आणि मजबरोबरच आलें पाहिजे, असा खाविंदांचा हुकूम आहे. "

तेव्हा शेरखान म्हणाला, " ठीक आहे. हा माझा जोडीदार सामान आवरीत आहे, तोंपर्यंत मी खाविंदाच्या भेटीला तुझ्याबरोबर येतों. "

शेरखान गडकरीसाहेबांना अदबीनें मुजरा करून त्यांच्या बोलण्याची वाट पहात स्तब्ध उभा राहिला. त्याला गडकरीसाहेब म्हणाले, " तुमचा माल ह्या गडावर पुष्कळ खपला काय ?"

शेरखान आनंदाच्या मुद्रेनें म्हणाला, " खाविंद, आमचा बहुतेक माल खपला. आम्हाला खूब फायदा झाला. आतां आमचीं सगळीं बारदानें बहुतेक रिकामीं होऊन गेलीं आहेत. आता आम्ही विजापुरास जाऊन नवीन माल आणणार आहों. आम्ही आपले फार फार आभारी आहों. अल्ला आपणाला दीर्घ आयुष्य देवो आणि आपले मनोरथ सफल करो ! "

दावूदभाई म्हणाला, " तुम्हाला चागला फायदा झाला, हें ऐकून आम्हाला भारी आनंद होत आहे. तुम्ही हा गड सोडून केव्हां जाणार आहां ? "

शेरखान म्हणाला, "आतां आमच्याजवळ माल कांहींच शिल्लक राहिलेला नाहीं. आम्ही उद्या सकाळीं येथून जाऊं. "

त्याला दावूद म्हणाला, " तुम्ही आमचा गड आणि त्याच्यावरचा बदोबस्त पाहिलात काय ? "

शेरखानानें उत्तर दिलें, " नाहीं खाविंद, आम्ही आपला माल खपविण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. "

गडकरी म्हणाला, " आज तिसऱ्या प्रहराच्या सुमारास मी आपला एक नोकर अजमल्ल तुमच्याकडे पाठवीन. तो तुम्हाला ह्या दातेगडावर सर्व ठिकाणीं हिंडवून आणील. तुम्ही दुसरे पुष्कळ गड पाहिलेले आहेत. आमचा गड त्या गडांच्या मानानें तुम्हाला कितपत मजबूत वाटतो तें मला सांगा. "

तेव्हां शेरखाननें उत्तर दिलें, " होय खाविंद. "

---

## प्रकरण १५ वें.

# दर्याखान आणि भाऊमीया.



दातेगडावर शनिवारच्या मध्यान्हापर्यंत जो वृत्तान्त घडला तो आम्ही वाचकाना येथवर निवेदिला. आता ह्याच शनिवारीं सकाळपासून मध्यान्हापर्यंत कासेगावीं आणि आसपास जो वृत्तान्त घडला, तो वाचकांना निवेदिणें जरूर आहे.

दातेगडाच्या गडकऱ्याचा मुलगा हमीदभाई हा आपल्या बारा दोस्तासहवर्तमान शनिवारीं सकाळी दातेगडाहून निघाला, हें आमच्या वाचकांना ठाऊक आहे. शिवाजीनें जिंकून घेतलेले गड किती मजबूत स्थितींत आहेत, ते परत जिंकून घेऊन विजापूरच्या राज्याला जोडून देणे कितपत सोपें किंवा कठिण काम आहे, एकंदर सर्व मुलखातील लोकांच्या मनात शिवाजीविषयीं कितपत प्रेमभाव आहे, शिवाजीचें मनुष्यबळ किती आहे, त्याचे दोस्त कोणकोण आहेत, त्याचेपैकीं लाचाला वश होणारे कोणकोण दोस्त आहेत, त्याचें शस्त्रास्त्रबळ किती आहे, वगैरे माहिती मिळविणें हा हमीदचा उद्देश होता, हेंही वाचकाना ठाऊक आहे. आतां हमीद आणि त्याचे बारा दोस्त हे कोठेंकोठें गेले आणि त्यांनीं काय काय केलें हे आपण पाहूं.

ही मंडळी दातेगडावरून आली ती त्या टेकडीच्या पायथ्याशीं असलेल्या कासेगांवाला प्रहरभर दिवस चढला तेव्हा येऊन पोचली. हे घोडेस्वार गांवाच्या सीमेपाशीं आले तों त्याना एक पंधरासोळा वर्षांची मुलगी दिसली. तिच्या लुगडें नेसण्याच्या धाटणीवरून आणि तिच्या हातातील फुलाच्या परडीवरून ती हिंदू असावी, आणि ती देवदर्शनाला निघालेली असावी, असें सहज कळण्याजोगे होतें. आणि वस्तुस्थितीही तशीच होती, ही मुलगी कासेगावाच्या लगत असलेल्या भवानीच्या दर्शनाला निघालेली होती.

ही मुलगी वयानें सुमारे पंधरासोळा वर्षांची असून रूपाने अत्यंत सुंदर आणि मोहक होती. तिची अंगकांति गुलाबाच्या फुलाप्रमाणे

असून ती मुलगी अंगलटीनें गुबगुबीत होती. ती दिसण्यात नाजूक दिसणारी होती. ही मुलगी दुसरी तिसरी कोणी नसून आपल्या पूर्व-परिचयाची सजेगाव निवाळकर याची मुलगी पद्मिनी ही होती. ती आपल्या नित्याच्या नियमाप्रमाणे भवानीच्या दर्शनाला निघालेली होती.

वर सांगितल्याप्रमाणें पद्मिनी ही भवानीच्या देवळाकडे चाललेली असता ती हमीदच्या दृष्टीस पडली. हमीदनें एका दृष्टिनिक्षेपात तिच्या सौंदर्याचे, मोहकपणाचे आणि गोंडस बांध्याचे निरीक्षण करून टाकिलें. पद्मिनी त्याच्या पापविचाराचा विषय झाली. ती आपण कसेंहीकरून प्राप्त करून घेतली पाहिजे, असा त्यानें आपल्या मनात निश्चय केला.

ज्या ठिकाणी पद्मिनी हमीद आणि त्याचे बाग दोस्त ह्याच्या नजरेस पडली होती, त्या ठिकाणापासून हाकेच्या टप्प्याच्या बाहेर जाताच हमीद आपल्या दोस्ताना म्हणाला, " ती सुंदर पोरगी मला जो कोणी विलासासाठी मिळवून देईल, त्याला मी शंभर मोहोरा बक्षीस देईन. हे काम तुह्मापैकी कोण पतकरतो आहे ? "

हे ऐकताच त्या टोळीतील एक इसम भाऊमिया छातीवर हात ठेवून म्हणाला, " ती पोरगी मी तुमच्या विलासासाठी मिळवून देण्याचे काम पतकरतो. "

दुसरा इसम दर्याखान छातीवर हात ठेवून म्हणाला, " हमीदभाई, ती सुंदर पोरगी मी तुम्हाला मिळवून देतो. "

तेव्हा हमीदभाई म्हणाला, " भाऊमिया आणि दर्याखान, तुम्ही दोघेही मिळून ही कामगिरी पतकरा. मी तुह्मापैकी प्रत्येकास शंभर शंभर मोहोरा बक्षीस देईन. "

दर्याखान म्हणाला, " कबूल ! "

भाऊमिया म्हणाला, " कबूल ! तुम्ही बाकीचे सर्व लोक पुढे चालू लागा. तुम्ही इपकगावाला जाऊन तेथें मुक्काम करा. आम्ही दोघेजण या पोरीला धरून आणून इपकगावी येऊन दाखल होतो. "

दर्याखान म्हणाला, "होय. तुम्ही इपकगावाला जा. आम्ही दोघेजण मिळून त्या पोरीला फसवून किंवा जबरदस्तीने धरून आणून तुम्हाला इपकगावी भेटतो. मध्यान्हाच्या आत तुमची इच्छा सफल होईल. "

हमीद आनंदानें म्हणाला, " ठीक आहे. आम्ही बाकीचे माणसें इषकगांवाकडे रवाना होतों. तुम्ही त्या पोरीला घेऊन इषकगांवीं या. ती पोरगी माझ्या मनांत फार भरली आहे. ती पोरगी मला विलासाला मिळाली नाहीं तर माझा जन्म फुकट गेला असें मी समजेन. त्या पोरीला आणाच आणा. हे पहा आम्ही पुढें रवाना होतों. "

असें म्हणून हमीदनें आपल्या घोड्याला टाचललें. त्याच्या बाकीच्या दहा जोडीदारांनीं तसेंच केलें. ही मंडळी तेथून गेली, तेव्हां तेथें भाऊ-मिया आणि दर्याखान असे दोघेजणच काय ते शिल्लक राहिले.

तेव्हां दर्याखान आपल्या जोडीदाराला म्हणाला. " कायरे भाऊ मिया, तूं त्या पोरीला कशी काय पकडणार आहेस ? "

तेव्हां भाऊमिया म्हणाला, "कशी म्हणजे ? मी तिच्याजवळ जाईन. तिच्या कंबरेभोंवतीं माझा हाताचा विळखा घालून तिला माझ्या घोड्या-वर माझ्यापुढें बसवून घेईन, आणि दौडत इषकगांवीं जाऊन आपल्या हमीदभाईच्या हवाली तिला करीन. "

दर्याखान म्हणाला, " हे तुझें करणें मूर्खपणाचें होईल. ती पोरगी ओरडेल, तिच्याभोंवतीं हिंदूकाफीर गोळा होतील, तिला तुझ्या कचाट्या-तून सोडवितील आणि तुला काजीपुढें उभें करतील. "

तेव्हां भाऊमिया तुच्छतेच्या मुद्रेनें त्याला म्हणाला, "अरे जा ! माझ्या अंगाला हात लावायाला कोणा हिंदूकाफीराची छाती होणार आहे ? मुसलमानी राज्यामध्यें मुसलमानाला हावे तें करण्याची मोकळीक असते. हिंदूस्त्रीला मुसलमानानें विलासासाठीं पकडणें हा गुन्हा फारसा मोठा नाहीं. काजी मला फार तर दोनतीन रुपये दंड करील. आणि आधीं माझ्यावर गुन्हा शाबीतच होणार नाहीं. मीं त्या पोरीच्या वाटेस मुळींच गेलो नाहीं असें म्हटले, म्हणजे काजी माझें म्हणणें खरें धरील; आणि मजविरुद्ध हिंदूकाफिरांनीं कितीही मोठा गिल्ला केला, तरी काजी त्यांचें ह्मणणे भरंवशाला पात्र नाहीं असें म्हणून मला सोडून देईल. "

तेव्हा दर्याखान त्याला म्हणाला, " तुझें म्हणणें मला कबूल आहे. तूं बेगुन्हा म्हणून सुटून मोकळा होशील. परंतु हमीदभाईला ती पोरगी मध्यान्हाच्या आंत मिळेल काय ? "

भाऊमिया म्हणाला, " तूं म्हणतोस तें खरें आहे. मी त्या मुलीला जबरदस्तीनें पकडूं लागलों आणि तेथें लोक अमले आणि त्यांनीं हरकत केली, तर ती मुलगी मध्यान्हाच्या आत हमीदभाईकडे नेता येणार नाहीं. मजवर जरी खटला झाला तरी मी बेगुन्हा म्हणून सुटेन किंवा फार तर दोन तीन रुपये मला दंड होईल हें खरें आहे, पण ती पोरगी हातची निसटून जाईल. हमीदची इच्छा मध्यान्हाच्या आंत पुरविता येणार नाहीं. बरें, तूं कोणच्या रीतीनें तिला पकडावयाचें योजिलें आहेस ? "

त्यावर दर्याखान म्हणाला, " मी एक युक्ति मनांत योजून ठेविली आहे. त्या युक्तीनें ती पोरगी मी धरून आणूं शकेन असें मला वाटतें. आपण आधीं पलीकडे जाऊन एका झाडाच्या छायेंत आपलें घोडे बांधून ठेऊं. "

असें म्हणून दर्याखान पुढें चालला. त्याच्या मागोमाग भाऊमीया जाऊं लागला.

हे दोघेजण ज्या प्रदेशातून चालले होते, तो खडकाळ असून त्यात लहान मोठे अनेक वृक्ष होते. वाटही वाकडीतिकडी होती. पुढें कांहीं अंतर गेल्यावर दर्याखान एका कवटीच्या झाडाखालीं उभा राहून आपल्या दोस्ताला म्हणाला, " ही जागा सोयीची आहे, हिच्याभोंवतीं दाट वृक्ष आहेत."

असें म्हणून दर्याखान घोड्यावरून उतरला. भाऊमीयाही आपल्या घोड्यावरून उतरला. मग त्या दोघांनीं आपल्या घोड्यांना लांबलांब काढण्यांनीं झाडाच्या बुंध्याला बांधलें. त्याचे जेरबंद सईल करून त्यांनीं त्याच्या तोंडांतील लगाम काढून टाकले, आणि त्या घोड्यांना चरावयाला सोडलें. मग दर्याखान आपल्या दोस्ताला म्हणाला, " तूं येथें हे घोडे पाहात बैस—मी त्या पोरीला येथें घेऊन येतों. मग तिला माझ्यापुढें मी घोड्यावर बसवून घेईन. मग आपण दोघे इषकगांवाला जाऊं. "

भाऊमीया म्हणाला, " अरे पण तूं त्या पोरीला येथपर्यंत तरी आण-णार कशी ? तुझी कल्पना काय आहे ती मला सांग तर खरी. "

दर्याखान म्हणाला, " मी तुझ्याशीं बोलण्यांत येथें वेळ घालविला तर

हातची शिकार निसटून जाईल. मी तुला सांगतों तसें कर. येथें तूं आपले दोघांचे घोडे सांभाळीत बस. मी लवकर परत येतों. येतांना त्या पोरीला आणीन. मग मी कोणच्या युक्तीनें त्या पोरीला पकडून आणली, हें मागाहून स्वस्थपणानें सांगेन."

असें म्हणून दर्याखान तेथून परत कासेगावाची वाट धरून धावत निघाला.

---

## प्रकरण १६ वें.

# दर्याखान आणि भाऊमीया यांचा पराक्रम.



दर्याखान त्या कवठीच्या झाडाखालून जो निघाला तो कासेगावच्या रस्त्यानें चालूं लागला. त्यानें पद्मिनीला पकडून आणावयाची जी युक्ति योजली होती, तिच्या सफलतेसाठीं त्याला अत्यंत वेगानें कासेगावाला जाणें जरूर होतें, म्हणून तो बहुतेक वाट धावतच होता.

तो कासेगावच्या भवानीच्या देवळाशीं येऊन पोंचला. येथें येऊन तो पहातो तों पद्मिनी त्याला परत तिच्या घराकडे जात असलेली दिसली. भवानीची यथासांग पूजा करून, तिला दंडवतोक्त प्रदक्षिणा करून, ती परत आपल्या घराकडे जात असलेली दर्याखानाला दिसली.

त्यावेळीं त्या ठिकाणीं पद्मिनीच्या दुर्दैवानें आणि दर्याखानाच्या सुदैवानें आसपास कोणी माणसें नव्हतीं. दर्याखान लगबगीनें पद्मिनीकडे गेला आणि अत्यंत आस्थाळूपणाच्या मुद्रेनें तिला म्हणाला, "मुली, तूं हिंदू आहेस ना?"

पद्मिनी जागच्या जागीं उभी राहून आणि आश्चर्याची मुद्रा त्या दर्याखानाच्या मुखावर निविष्ट करून म्हणाली, "होय, मी हिंदू आहे. पण तूं हा प्रश्न मला का विचारीत आहेस?"

दर्याखान म्हणाला, "मी मुसलमान आहे, पण तुला कांहीं उपद्रव करावयाचा माझा बिलकूल उद्देश नाहीं. मी परोपकारबुद्धीनें तुला कांहीं एक पुण्यकारक गोष्ट करावयाला सांगणार आहे. माझ्या बोलण्यावर जर तुझा

भरंवसा वसला, आणि तूं माझ्याबरोबर आलीस, तर तुझ्या धर्माप्रमाणें तू केल्याकारणानें तुला पुण्य लागेल आणि माझ्या धर्माप्रमाणें मी वागल्यामुळें मलाही पुण्य लागेल. एक परोपकाराची गोष्ट केल्याकारणानें तुला पुण्य लागेल, आणि हें परोपकाराचें कृत्य करण्याची तुला संधी आणून दिल्याबद्दल मलाही पुण्य लागेल."

पद्मिनी ह्या त्याच्या भाषणानें अत्यंत आश्चर्यचकित झाली. दर्याखानाची मुद्रा तिला शांत आणि [illegible] वाटली. त्याच्या मनांत कांही पाप असेल, अशी तिला यत्किंचितही शंका आली नाही. ती हाडाची धीट मुलगी होती. ती दर्याखानाला म्हणाली, "तुझें म्हणणें मला समजत नाही. तूं मला काय करावयाला सांगत आहेस तें मला स्पष्टपणें कळलें, आणि तूं म्हणतोस तसें मी केलें, तर त्यांत मला पुण्य कसें लागेल ?"

तेव्हां दर्याखान अत्यंत प्रामाणिकपणाची मुद्रा धारण करून म्हणाला. "मुली, तूं हिंदु आहेस, हें तूं मला सांगितलेंस. पण तूं कोणच्या जातीची आहेस ? तूं मराठेजातीची आहेस असें मला वाटतें. तूं मराठेजातीचीच आहेस ना ?"

पद्मिनी म्हणाली, "होय, मी मराठेजातीची आहे. पण तुझें काम काय तें मला सांग."

तेव्हां दर्याखान म्हणाला, "सांगतों, ऐक. त्या पलीकडच्या झाडींत येथून दोनतीन हाकांच्या अंतरावर एका गरीबाऊ झोंपडींत एक मराठे जातीची म्हातारी मरत पडली आहे. ओरडून ओरडून तिचा घसा कोरडा पडलेला आहे. तिला प्यावयाला पाणी पाहिजे आहे. तिच्या हाका ऐकून मी आणि माझा दोस्त असे आम्ही तिच्या झोंपडींत गेलों. तुला काय पाहिजे आहे, म्हणून आम्हीं तिला विचारलें. ती मला पाणी पाहिजे आहे असें म्हणाली. तुला पाणी आम्हीं देऊं कां म्हणून विचारलें तेव्हां तिनें आम्हांला आमची जात विचारली. आम्ही मुसलमान आहों असें तिला सांगतांच ती म्हणाली, "मी मेलें तरी बेहत्तर आहे, पण मुसलमानाच्या हातचें पाणी पिणार नाहीं. तुम्ही कोणा तरी हिंदू मराठे

जातीच्या माणसाला घेऊन ये. त्यानें मला पाणी प्यायाला दिल्यावर मी त्याला आपला एक नवस फेडावयासाठीं पन्नास रुपये देणार आहे. त्यानें ते काम पथकरल्याकर मी सुखानें प्राण सोडीन.'' असें ती म्हातारी मला म्हणाली. ती घटकेनें मरेल कीं दोन घटकानीं मरेल याचा कांहीं नेम नाहीं. यासाठीं तूं माझ्यावरोबर ये. त्या म्हातारीला पाणी पाज. आणि तिचा फेडावयाचा नवस ऐकून घे. मी मुसलमान असल्याकारणानें माझा कांहीं उपयोग नाहीं. येत असलीस तर चल मजबरोबर, मी आपला जोडीदार तिच्या सोबतीला बसवून ठेविला आहे. ती मेलीबिली तर तिच्या प्रेताची वाट हिंदूंकडून लागेतोंपर्यंत ते प्रेत जतन केलें पाहिजे.''

पद्मिनीला दर्याखानाचे सर्व भाषण प्रामाणिकपणाचे वाटलें. तिला संशय आला नाहीं किंवा संशय येण्याचें कारणही नव्हतें. "चल पुढें, मी येते तुझ्याबरोबर" असें म्हणून ती त्याच्या बरोबर चालूं लागली.

दर्याखान आणि पद्मिनी कांहीं वाट चालून गेल्यावर पद्मिनीनें त्याला विचारलें, "आतां किती लांब ती झोपडी आहे?"

दर्याखानानें उत्तर दिलें, "मुली, ती झोपडी पहा माझ्या बोटा-समोर आहे. येथून ती एका हाकेच्या अंतरावर आहे."

ह्या उत्तरानें पद्मिनीला धीर आला. दर्याखान पुढें चालला होता. पद्मिनी त्याच्यामागून चालली होती.

अशा रीतीनें कांहीं वाट चालल्यावर पद्मिनीनें दर्याखानाला विचारलें, "अजून कशी ती झोपडी येत नाहीं? तूं वाटबीट तर चुकला नाहीस ना?"

दर्याखानानें उत्तर दिलें, "मुली मी वाट चुकलों नाहीं. मला त्या झोपडीचा ठावठिकाणा चांगला माहीत आहे. ती पहा झोपडी, चल."

हीं दोन माणसें ह्यावेळीं झाडींतून चालत होतीं. वाट अर्थात् वांकडी-तिकडी होती. दर्याखानानें दोनतीन हाकांच्या अंतरावर त्या म्हाता-रीची झोपडी आहे असें पद्मिनीला सांगितलें होतें, पण आतांपर्यंत तिचें चालणें दहापंधरा हाकांच्या अंतराइतकें झालें होतें. कासेगांव फार लांब राहून तिला दिसण्याच्या टप्प्यापलीकडे राहिलें होतें. आतां मात्र तिला त्या मुसलमानाचा संशय येऊं लागला. तिनें आपला आवाज कांपरा न होऊं देतां त्या मुसलमानाला विचारलें, "भल्या माणसा, तूं

दोन तीन हाकाच्या अंतरावर ती झोपडी आहे असें म्हणाला होतास ना ? आपण आतापर्यंत कितीतरी अंतर चालून आलों. अजून कशी नाहीं ती झोपडी येत ? ''

तेव्हा दर्याखानानें अत्यन्त विकट हास्य करून पद्मिनीला म्हटलें, " सुंदरी, दातिगडाच्या गडकऱ्याचा मुलगा हमीदभाई हा तूं भवानीच्या दर्शनाला जात होतीस तेव्हा तुला पाहून मोहीत झाला. तुला त्याच्या विलासासाठीं घेऊन जावयाला मी आलों आहे. तूं ये म्हटल्यानें आली नसतीस म्हणून तुला फसवून येथपर्यंत आणलें. हाः हाः हाः ''

असें म्हणून दर्याखानानें पद्मिनीला उचलून आपल्या पाठुंगळीस घेतलें. तिचे दोन्ही बाहु त्यानें आपल्या गळ्यावरून आपल्या छातीवर आपल्या डाव्या बाहूनें चेपून धरले, आणि उजवा बाहु मागें वळवून त्या बाहूनें त्यानें तिच्या मांड्या आपल्या मांड्यांशीं चिकटून धरल्या. ह्याप्रकारें पद्मिनीला पकडून घेऊन तो पळत सुटला ! दर्याखान धिप्पाड आणि बळकट होता. पद्मिनीचें ओझें हत्तीला गवताच्या काडीप्रमाणें दर्याखानाला हलकें वाटलें !

हें बदमाषपणाचें कृत्य त्या बदमाषानें इतक्या सफाईनें आणि इतक्या जलदीनें केलें कीं, त्याच्या ह्या बदमाषपणाच्या कृत्याचें पूर्ण स्वरूप तिच्या लक्षांत यावयाच्या अगोदरच ती पूर्णपणें गिरफदार केली जाऊन कांहीं अंतर नेली गेली सुद्धा !

पद्मिनी शक्तीनें मजबूत होती, तथापि त्या बदमाष पुरुषाच्या प्रचंड शक्तीपुढें तिची शक्ति कशी टिकणार ?

पद्मिनी धीट होती आणि प्रसंगावधानी होती. तिनें आपल्या आणि प्रतिपक्ष्याच्या शक्तीची मनांतल्या मनात तुलना केली. आपलीं कोणचीं गात्रें ह्या प्रसंगीं निरुपयोगी आहेत आणि कोणच्या गात्रांचा कसा आणि कितपत उपयोग करून घेतां येईल, याचा तिनें आपल्या मनांत बरोबर आजमास केला आणि तशा रीतीनें आपली सुटका करून घेण्याचा तिनें निश्चय केला.

पद्मिनीचे दोन्ही बाहु त्या बदमाषाच्या डाव्याबाहूनें आपल्या छातीवर घट्ट चेपून धरलेले असल्याकारणानें तिच्या दोन्ही बाहूंचा तिला

कांहीं उपयोग होण्याजोगा नव्हता. परंतु गुडघ्याखालचे तिचे दोन्हीं पाय मोकळे आणि लांबट होते. तिनें खूप जोराजोरानें आपल्या टाचा त्याच्या मांडीवर हापटण्याचा सपाटा चालविला. तिनें शेकडो रट्टे त्याच्या मांड्यांवर लगावले. त्यापैकीं दोनतीन रट्टे त्याच्या मर्मस्थानीं बसले. तेणेंकरून त्याचा जीव व्याकुळ झाला. त्याला मर्मान्तिक यातना होऊं लागल्या. पद्मिनीवर त्यानें घातलेली पक्कड ढिली पडली. तिनें धडपड करून आपली सुटका करून घेतली. तो व्याकुळ होऊन जमीनीवर मट्‌किनीं उताणा पडला. पद्मिनी मोकळी झाली; परंतु पुन्हा तो सैतान आपला पाठलाग करील, तो त्याला करता येऊ नये म्हणून तिनें जमीनीवरील एक खूब जड धोंडा त्याच्या पायीं डोक्यात हाणला. त्याच्या डोक्याची चटणी झाली!

मग पद्मिनी मागें वळून न पाहता एकसारखी पळत सुटली. आपण कोणच्या दिशेनें पळत आहों, ह्याचें तिला भान नव्हतें. तिनें एकदा देखील मागें वळून पाहिलें नाहीं. ती एकसारखी पळत होती. आपण कासेगावाकडे जात आहों किंवा त्या गावापासून दूर चाललों आहों, याचें तिला भान राहिलें नव्हतें.

ह्याप्रमाणें ती धावत असता तिच्यावर दुसरें एक संकट ओढवलें. 'संकटें येतात तीं कधीं एकएकटीं येत नाहींत' ह्या म्हणीची सत्यता तिला पटवून द्यावयाला तिच्या दैवानें जणोंकाय कासच कसली होती.

हतभाग्य पद्मिनी याप्रमाणें पळत होती तों तिला भाऊमीया समोरून येतांना दिसला. हा भाऊमीया येथें ह्यावेळीं कसा आला असें आम्हाला आमचे वाचक विचारतील. म्हणून तें त्याना सांगणें जरूर आहे.

दर्याखान जो गेला तो अझून कां परत येत नाहीं, म्हणून भाऊमीयाला चिंता लागली. दर्याखान हा त्याच्या अटकळीप्रमाणें एव्हाना परत यावयाला पाहिजे होता. तो अझून आला नाहीं म्हणून तो कवठीच्या झाडाखालून निघाला. दर्याखान ज्या वाटेनें परत येईल असें त्याला वाटत होतें, त्या वाटेनें तो कांहीं अंतर तेथून चालत येत होता. तोच समोरून येतांना पद्मिनीला दिसला.

ह्या भाऊमीयाला पद्मिनी सैरावैरा आणि बावऱ्या मुद्रेनें धांवत येत अस-

लेली दिसताच त्याला वस्तुस्थिति तत्काळ समजून आली. तो तिला धरावयासाठी तिच्याकडे धावत येऊं लागला! पद्मिनीला आपल्या स्थितीची बरोबर कल्पना आली. तिचे प्रसंगावधान ह्याही संकटात तिच्या मदतीला आले. तिने थोडेसे ओणवून जमीनीवरुन मुठभर माती हातांत घेतली आणि समोरून धावत येत असलेल्या बदमाषाच्या डोळ्यात फेकली! तो व्याकूळ झाला आणि डोळे चोळीत जागच्याजागी उभा राहिला! मग तो रागारागाने आणि बेफामपणाने पद्मिनीच्या मागून आजमासाने चालूं लागला. परंतु पद्मिनी त्याची स्थिति काय आहे हें पाहाण्यांत वेळ न दवडता पुढे एकसारखी पळत होती. ह्यावेळी ती भ्रांत झाली होती. आपण काय करतो आणि कोठें जातों आहो याचा विचार करण्याची तिला ताकदच नव्हती! ती वेड्या माणसाप्रमाणे पळत सुटली होती!

दर्याखान मर्मस्थानी तडाखे लागून मरण पावला हे वाचकाना ठाऊक आहे. भाऊमिया बहुतेक अंध झालेल्या डोळ्यानी पद्मिनीला पकडण्यासाठी सैरावैरा धावत असतां एका उच्चवट्यावरुन एका खोल खड्डयात पडला. ह्या खोल जागेत दाट निवडुंगाचें बन होते. ह्या बनात भाऊमीया पडला! त्यानें हालचाल केली किंवा न केली तरी त्याच्या सर्वांगात काटे रुतत होते! तो एकसारखा ओरडत होता. परंतु त्याच्या आरोळ्या कोणाच्याही कानी पडत नव्हत्या. कारण, तो खड्डा आडवळणाला होता आणि तिकडे जाणाऱ्यायेणाऱ्या माणसाची मुळींच रहदारी नव्हती.

भाऊमीया शारीरिकयातनांनी आणि अन्नपाण्याच्या अभावानें काहीं दिवसांनीं त्या निवडुंगाच्या बिछान्यावरच मरण पावला, इतके सांगून हे प्रकरण आम्ही संपवितो.

---

## प्रकरण १७ वें.

# भास्कर आणि पद्मिनी.



मागें प्रकरण सोळामध्ये सांगितल्याप्रमाणे पद्मिनीनें दर्याखान आणि भाऊमीया ह्या दोघा बदमाष मुसलमानाच्या कचाटींतून आपली सुटका

करून घेतल्यावर ती एकसारखी पळत होती. तो प्रदेश बराच डोंगराळ होता. त्यात उचवट्याचे आणि सखल भाग पुष्कळ होते. काहीं ठिकाणीं झाडें दाट होतीं, काहीं ठिकाणीं विरळ होतीं. वाट अर्थात वाकडीतिकडी होती. आपण ज्या वाटेनें जात आहों, ती वाट कामेगावाला जाणारी आहे किंवा दुसऱ्याच एकाद्या गावाकडे जाणारी आहे, ह्याचा विचारच तिच्या मनात आला नाहीं. ती भांबावल्यामारखी एकसारखी पळतच होती!

अशा रीतीनें ती घटका अर्धघटका पळत होती. एवढ्याना तिचे विचार थोडेसे शांत झाले होते. ती एके ठिकाणीं विसावा घ्यावयासाठीं उभी राहिली. आपण जात आहों ते घराच्या दिशेनें जात आहों कीं भलत्याच दिशेनें जात आहों, हा विचार तिच्या मनात आला. तिनें सभोंवार नजर केली. परंतु तिच्या ओळखीची अशी काहींही वस्तु दिसेना. उचउंच वृक्ष तिच्याभोंवतीं असल्याकारणाने तिच्या दृष्टीचा पल्ला रुद्ध झालेला होता. दातेगडाचा बालेकिल्ला, किंवा भवानीच्या देवळाचें शिखर, किंवा तिचें घर, किंवा तिच्या ओळखीची दुसरी कोणतीही वस्तु तिच्या दृष्टिपथांत येत नव्हती. तेव्हां आता आपण कोणच्या दिशेनें जावें आणि त्याप्रसंगीं काय करावें, हें तिला ठरविता येईना. ती भांबावली आणि ती थोडीशी घाबरलीही. ती ह्यावेळीं निश्चल उभी राहून विचार करीत होती, तों तिच्या समोरून तिच्याचकडे येत असलेला एक स्वार तिला दिसला, आणि त्या स्वारालाही ती दिसली.

पद्मिनी आणि हा स्वार हीं दोन्हीं माणसें एकदम एकमेकाना दिसलीं. त्यांच्या दृष्टींचें मेलन झालें; त्यानीं क्षणार्धांत साकल्यानें परस्पराच्या मूर्तींचें निरीक्षण करून टाकलें.

हा ह्या समयीं अकस्मात् तेथें आलेला स्वार कोण, हे वाचकांना सांगणें जरूर आहे.

हा स्वार वयानें सतरा वर्षांचा असून तो दिसण्यात एकदोन वर्षे अधिक वयाचा दिसत होता. तो वर्णानें निमगोरा होता. तो चेहेऱ्यानें भारी सुंदर आणि मोहक होता. तो अंगानें गुटगुटीत असून त्याचे अवयव प्रमाणशुद्ध होते. त्याचें कपाळ उंच व डोळे विशाळ आणि

काळेभोर होते. त्याच्या भिवया जाडसर परंतु कमानदार आणि अग्रांकडे निमुळत्या होत गेलेल्या होत्या. त्याचें नाक सरळ होतें आणि जिवणी लहानसर होती. बोलताना त्याचे बारीक आणि हारीनें असलेले दांत दिसत ते मोत्याप्रमाणें शुभ्र होते. त्याच्या शरीराची गात्रें प्रमाणशुद्ध असून ती तालमीनें बळकट झालेली होती.

हा सुंदर मुलगा आपल्या भिमथडी घोड्यावर मोठ्या ऐटीनें बसला होता. त्याच्या डोक्याला सुती पटका असून त्याचा एक सोगा पाठीवर मोकळा सोडलेला होता. त्याच्या अंगांत एक तांबडा रूमन्या अगरखा होता आणि पायात माडचोळणा होता. त्याच्या पायाच्या पोटऱ्या—ज्या उघड्या होत्या त्या,—ठासीव दिसत होत्या. ह्या मुलाच्या कमरेला एक तलवार लटकत असून, पाठीशीं एक पोलादी धनुष्य आणि भाता होता.

पद्मिनीनें ह्या तेथें आलेल्या सुंदर अश्वारोहाचें एकाच दृष्टिनिक्षेपांत साकल्यानें निरीक्षण केलें असें आम्ही वर म्हटलेलेंच आहे. त्याच्या विशाल आणि काळ्याभोर नेत्रांची पावित्र्यव्यंजक दृष्टि पाहून पद्मिनीचें चित्त आश्वस्त झालें. ती त्याच्याशीं कांहीं बोलणार होती. इतक्यांत तोच तिची साकांक्ष दृष्टि पाहून ह्मणाला, " मुली, तूं ह्या निर्जन ठिकाणीं एकटी असून तूं भांबावल्यासारखी दिसत आहेस. ह्यावरून तूं वाट चुकली असावीस असें मला वाटतें. माझा तर्क खरा आहे काय ? "

हा त्या युवकाचा सभ्यपणाचा आणि गोड आवाजानें उच्चारलेला प्रश्न ऐकून पद्मिनी म्हणाली, " भाईजी, तुमचा तर्क खरा आहे. मी वाट चुकलेली आहें. मला वाटेला लावण्याची मेहेरबानी तुम्ही कराल काय ? "

" आलबत करीन, " तो युवक आदरशीलपणानें म्हणाला, " पण तुला कोठें जावयाचें आहे हें तूं मला सांगितलेंस तर मी तुला वाटेला लावून देईन. तुला कोठें जावयाचें आहे ? "

पद्मिनीनें उत्तर केलें, " मी कासेगांवची राहाणारी, आणि मला कासेगांवासच जावयाचें आहे. त्या गांवापासून मी किती दूर आलेली आहे याचा मला कांहींच आजमास करतां येत नाहीं. "

हें पद्मिनीचें उत्तर ऐकून आमच्या युवकाला आनंद झाला आणि हा आनंद त्याच्या सुंदर चेहेऱ्याची मोहकता वाढवीत होता. तो मंद-स्मितपूर्वक तिला म्हणाला, " मुली, मलाही कासेगावासच जावयाचें आहे ही सोयीची गोष्ट आहे. मुली, तुझें नाव काय आणि कासेगावास तुला कोणाच्या घरीं मी पोंचवूं ? "

पद्मिनी म्हणाली, " माझें नाव पद्मिनी. मी सजेगाव निंबाळकर ऊर्फ नाईक यांची मुलगी. तुम्ही मला कासेगावच्या हद्दीपर्यंत पोंचविलेंत म्हणजे पुढें मी आपल्या घरापर्यंत जाऊं शकेन. तुम्ही कासेगावांत कोणाच्या घरीं जात आहात ? "

यावर त्या युवकानें उत्तर दिलें, " पद्मिनी, मी सजेगाव निंबाळकरांना एकदा दोनदा पाहिलेलें आहे, पण त्या गोष्टीला पुष्कळ वर्षे झाली, आणि शिवाय तेव्हा मी लहान होतों. मी त्यांना आतां पुन्हा पाहिलें तर मी त्यांना ओळखीनच अशी खात्री नाहीं. तुझें नाव मी ऐकिलेलें होतें, पण तुला डोळ्यांनीं पाहण्याचें भाग्य मला आजपर्यंत लाभलेलें नव्हतें. मी कासेगावच्या दिवाकररावाचा मुलगा भास्कर. मी कासेगावचाच खरा, पण मी नेहेमी केजळगडावर माझे मामा कोंडिबा यांचेकडे असतों. मी कासे-गावाला क्वचित् येतों, आणि आलों तरी एकदोन दिवसापेक्षा अधिक काळ रहात नाहीं. माझें घर कासेगावाच्या एका टोकाला आणि तुझें घर दुसऱ्या टोकाला असल्याकारणानें मोरे आणि निंबाळकर ह्यांच्या माणसांचा विशेष घरोबा नाहीं. बरें पण पद्मिनी, आपण येथें किती वेळ बोलत राहणार ? तुला लवकर घरीं परत जावयाची ओढ असणार. मलाही बाबांना लवकर भेटलें पाहिजे. "

पद्मिनी म्हणाली, " तुम्ही चला पुढें, मी तुमच्याबरोबर येतें. "

भास्कर म्हणाला, "तूं पायानें येणार ? आणि मी घोड्यावर ? छेः, ही गोष्ट मी कबूल करणार नाहीं. कासेगाव येथून दीडकोस आहे, थोडेंथोडकें दूर नाहीं. तूं दमशील. तूं बस ह्या घोड्यावर आणि मी पायानें तुझ्या-बरोबर येतों. "

पद्मिनी म्हणाली, " मी तुमच्या घोड्यावर बसावें आणि तुम्हाला पायानें चालावयाला लावावें हे मला मान्य नाहीं. "

भास्कर म्हणाला, " तर मग आपण ह्या माझ्या घोड्यावर दोघे-जण बसून प्रवास करू. माझा घोडा अस्सल भिमथडी अवलादीचा आहे. तो आपणा दोघांचे ओझें सहज वाहूं शकेल. हं ! बस घोड्यावर, तुझ्या मागें मी बसतो. तुला मी हात देतो. संकोच बाळगूं नको. मी तुला आपली धाकटी बहीण समजेन आणि तूं मला आपला वडील भाऊ समज. हू ! चढ वर ! हा मी तुला हात देतो. "

असें ह्मणून भास्करानें तिला हात देऊन आपल्यापुढें बसवून घेतलें आणि घोड्याला चालण्याची इशारत केली. घोडा चालूं लागला. भास्कराला कासेगावाला जाणारी वाट चांगली ठाऊक होती, हें सांगणें नलगे.

---

## प्रकरण १८ वें.

# मुलांचा पुढचा प्रवास.

वहीणभावाच्या नात्यानें एकमेकाना एकमेकाशीं बांधून घेणारीं दोन मुलें—पद्मिनी आणि भास्कर हीं,—एका घोड्यावर बसून कासेगावच्या दिशेनें निघालीं, असें आम्हीं वाचकाना मागल्या प्रकरणीं निवेदिलें आहे. आता त्याच्या पुढच्या प्रवासाचें वर्णन आम्हीं करतो.

त्याची वाट जंगलातून असल्याकारणानें त्याना सावधगिरी बाळगावी लागत होती. परंतु जेथ गोर्याची वाट असे तेथ त्यांचें संभाषण चालत होतें. हें संभाषण वाटेच्या अडचणींमुळें मधूनमधून खंडित होत असे. चांगली वाट लागली म्हणजे तें पुन्हा सुरू होत असे. त्याचें जें संभाषण झालें त्यात त्यानीं एकमेकाची हकीकत विचारून घेतली.

भास्करानें पद्मिनीला विचारलें, " पद्मिनी, तूं घरापासून इतक्या दूर आणि अपरिचित ठिकाणीं कशी आलीस हें मला सांग. "

तेव्हा पद्मिनीनें आपली हकीगत सांगण्यास सुरवात केली. आपण भवानीच्या दर्शनासाठीं घरून निघालो, दर्शन घेतलें व परत फिरलो असता आपणास एक मुसलमान भेटला, त्यानें आपणाला खोटी थाप

मारून गांवापासून दूर नेलें, तेथें त्यानें आपणाला दातेगडाच्या गड-कऱ्याचा मुलगा हमीद ह्याच्या विलासासाठीं इषकगांवीं घेऊन जाण्याचा आपला बेत कळविला, त्यानें आपणाला जबरदस्तीनें उचलून पाठुंगळीस घेतलें, त्याच्या तावडींतून आपण अमुकअमुक रीतीनें आपली सुटका करून घेतली, आणि तेथून पळत सुटलों, तों त्या पहिल्या बद मापाचा साथीदार तेथें आला, त्याचे डोळे आपण धुळीनें अंधळे करून आपली सुटका करून घेतली, मग आपण भांबावलेल्या मनाच्या स्थितींत पळत सुटलों, आणि दोनतीन घटकांनीं आपण विचार करण्यासाठीं एके ठिकाणीं उभें राहिलों, तेथें भास्कर तिला भेटला, वगैरे हकीगत पद्मिनीनें भास्कराला तपशीलवारपणें सांगितली. ती हकीगत वाचकांना ठाऊकच आहे.

मग भास्करानें आपली हकीगत पद्मिनीला सांगितली. तो म्हणाला, " माझे वडील दिवाकरराव हे कासेगांवाला दोषिक तापानें आजारी आहेत. त्यांनीं मला भेटावयाला ये असा निरोप पाठविल्यावरून मी केंजळगडाहून कासेगांवाला यावयाला निघालेला आहे. "

पद्मिनीनें विचारलें, " तुम्ही कासेगांवाला आपल्या वडिलाच्याजवळ न राहातां केंजळगडास कां राहातां ? "

त्यावर भास्कर म्हणाला, " कासेगांवाला माझे वडील आणि त्यांची मावशी अशी दोन माणसें राहातात, आणि त्यांची गुजराण कशीबशी आमच्या शेतावर होते. मी कासेगांवाला राहिलों, तर आम्हा तिघांना पुरण्याइतकें आमच्या शेताचें उत्पन्न नाहीं. म्हणून मी केंजळगडावर माझे मामा कोंडीबा हे असतात त्यांच्याकडे राहतों. मी येथें न राहण्याचें दुसरें कारण असें कीं, येथें शिक्षणाच्या सोयी कांहीं नाहींत, आणि केंजळगडावर त्या भरपूर आहेत. केंजळगडावर मी आज बारापंधरा वर्षे राहात असल्याकारणानें माझें शारीरिक आणि बौद्धिक शिक्षण उत्तमप्रकारचें झालेलें आहे. तालमींतील सर्व कामें, उघड्या मैदानांतील सर्व कामें, घोड्यावर बसणें, कवाईत, लढाईचे सर्व प्रकार, इत्यादिकांत मी चांगला तरबेज आहें. शिवाय मला मराठी, ऊर्दू, फारशी ह्या भाषा येत आहेत. पत्रें लिहिणें, तोंडचे हिशेब, वगैरेची मला माहिती आहे. ह्याशिवाय

दरबारी शिरस्तेही मला ठाऊक आहेत. हा जो माझा फायदा झाला तो केंजळगडास मी राहिल्याकारणानें झाला. कासेगावास मी राहिलों असतों तर ह्या सर्व फायद्याला मी मुकलों असतों. ”

त्यावर पद्मिनी म्हणाली, “ तुम्ही म्हणतां तें खरें आहे. केंजळगडावर राहिल्यानें तुमचें जें शिक्षण झालें त्याच्या शतांशही कासेगावास झालें नसतें. बरें. तुम्ही कासेगावास किती दिवस राहाल ? ”

त्यावर भास्कर म्हणाला, “ तें मला नक्की सांगतां यावयाचें नाहीं. बाबाना जो ताप आला आहे तो दोषिक ताप आहे असें वैद्याचें मत ठरताच बाबांनीं मला केंजळगडावर जासूद पाठवून भेटावयाला बोलावलें, म्हणून मी कासेगावाला येत आहे. बाबाच्या तापाला आजचा सातवा दिवस. हा ताप नवज्वरावर जातो, कीं विषमावर जातो, कीं मधुऱ्यावर जातो, हे कांहीं निश्चितपणानें कोणालाच सांगता यावयाचें नाहीं. म्हणून कासेगांवास माझें राहणें किती दिवसाचें होईल हें अनिश्चित आहे. परंतु इतकें निश्चित आहे कीं, बाबांना चांगला आराम पडल्याशिवाय मी परत केंजळगडास जाणार नाहीं. ”

येणेंप्रमाणें पद्मिनी आणि भास्कर यांचें संभाषण चाललें असतां तीं मुलें कासेगांवाच्या हद्दीवर येऊन पोचलीं. तेव्हां पद्मिनी भास्कराला म्हणाली, “ भाईजी, तुम्हीं मला आपल्या घोड्यावर बसवून घेऊन येथ-पर्यंत आणून सोडलें, हे तुमचे मजवर मोठे उपकार आहेत. ते मी कधीं विसरणार नाहीं. आता येथें मी उतरतें आणि पायानें आपल्या घरीं जातें. तुम्ही आपल्या घरीं जाऊन वडिलाना अगोदर भेटा, मग फुरसत होईल तेव्हा आमच्या घरीं या, म्हणजे माझे बाबा तुम्हांला शाबासकी देतील. आज घडलेली हकीगत मी बाबांना सांगेन म्हणजे तेही तुमच्या घरीं येतील. मीही आज संध्याकाळीं तुमच्या घरीं येईन. माझा विचार तुम्हांला करा काय पटतो ? ”

त्यावर भास्कर म्हणाला, “ तुझा विचार ठीक आहे. परंतु तुझी किंवा तुझ्या बाबांची शाबासकी घेण्याइतकें मी कांहीं काम केलें असें मला वाटत नाहीं. ”

असे म्हणून भास्करानें पद्मिनीला आपल्या घोड्यावरून खालीं उतरविलें. ती पायानें आपल्या घराच्या दिशेनें निघाली, आणि तो आपल्या स्वताच्या घराच्या दिशेनें घोड्यावरून जाऊं लागला.

भास्कराच्या आगमनाची चाहूल लागताच अनुमावशी घरातून बाहेर आल्या. त्यांना पाहाताच भास्कर घोड्यावरून खालीं उतरला आणि त्याच्या पायावर त्यानें डोकें टेंविलें. नंतर तो घोड्याचें खोगीर उतरीत असता, त्याच्या तोंडातील लगाम काढीत असता, आणि त्याच्या आरामाच्या तजवीजी करीत असता तो मावशीबाईंना दिवाकररावाच्या प्रकृतीसंबंधानें कांहीं ठळकठळक प्रश्न विचारीत होता.

आपल्या घोड्याच्या आरामाच्या सर्व तजविजी केल्यावरोबर तो आपल्या बापाच्या खोलींत गेला. येथें दिवाकरराव भिंतीशीं उभ्या असलेल्या तक्क्याला टेंकून आणि गादींत पाय लांब करून बसलेले होते. त्याच्या पायावर कमरेपर्यंत पासोडी ओढलेली होती.

दिवाकरराव हा मूळचा सणसणीत हाडापेराचा मनुष्य होता. तो उंच बांध्याचा आणि जाडी अंगलटीचा पुरुष होता. तरुणपणीं त्यानें त्या काळच्या रिवाजाप्रमाणें सर्व शारीरिक शिक्षण संपादन केलेलें होतें. त्यामुळें त्याचीं गात्रें मजबूद झालेलीं होतीं. परंतु मोरकुटुंबाच्या गतवैभवाच्या दुःखामुळें आणि वृद्धापकाळामुळें तो अलीकडे फार क्षीण झाला होता. त्याचें अंग रोडावलें होतें. गाल बसले होते. त्याच्या शरीराच्या सर्व हालचाली मंदपणानें चालत असत. परंतु त्याची बुद्धि पूर्वीप्रमाणें तरतरीत होती. त्याच्या विचाराची गुंतागुंत अद्यापि होऊं लागली नव्हती. त्याची स्मरणशक्तिही पूर्वीप्रमाणें जोरदार होती.

भास्कर आपल्या बापाच्या खोलींत गेला. त्याच्यापुढें दंडवत घालून तो त्याच्या जवळ बसला. दिवाकररावांनीं त्याच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवून त्याला म्हटलें, " भास्करबाळा, तूं माझा निरोप जाताच माझ्या भेटीस आलास, हे फार चांगलें केलेस. बस असा माझ्याजवळ. केजळगडावरचीं सर्व माणसें खुशाल आहेत ना ? तुझे मामा, मामी, त्यांचीं मुलें वगैरे आनंदात आहेत ना ? "

भास्करनें उत्तर दिलें, " होय, बाबा, सर्व माणसें खुशाल असून आनंदांत आहेत. पण तुमची प्रकृति कशी आहे ते मला अगोदर सांगा. "

त्यावर दिवाकरराव म्हणाले, " सांगतों, ऐक. माझी साठीं उलटून गेलेली आहे. मी फार क्षीण झालेला आहे. यःकश्चित् निमित्त झालें तरी मी गचावेन असें मला वाटते. हल्लीं मला दोषिक ताप येऊं लागला आहे. आजचा सातवा दिवस. हा ताप कदाचित् नवज्वरावर जाईल, कदाचित् विषमावर जाईल, कदाचित् मधुऱ्यावर जाईल. मी कदाचित् ह्या आजारांतून निभावेन, कदाचित् ह्यांतच माझा अंत होईल. इतःपर माझे जीवित अशाश्वत झालें आहे, म्हणून मी तुझ्याशीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टीं संबंधानें बोलणार आहे. तूं आतां मोठा झाला आहेस, आणि मी जें काहीं तुला सांगणार आहे त्याचें महत्व समजण्याची तुला पात्रता आली आहे. मी जे कांहीं तुला सांगणार आहे तें स्वस्थपणें सांगितलें पाहिजे आणि तें सांगावयाला मला चारसहा घटका पाहिजेत. तें घाईघाईनें सांगणें बरोबर नाहीं. तूं लांबच्या प्रवासानें दमून आलेला आहेस. तर आता अगोदर स्नान कर, सूर्याला अर्घे दे, मग पोटभर जेव, मग माझ्याकडे ये; तूं आल्यावर मी तुला स्वस्थपणें जे सांगावयाचें तें सांगेन. समजलास ? जा तर मग. "

" होय बाबा. " असें बापाला उत्तर देऊन भास्कर तेथून उठला आणि स्नान वगैरे उरकावयाला गेला.

---

## प्रकरण १९ वें.

# मोरे कुटुंबाचा पूर्वेतिहास.



पित्याच्या आज्ञेवरून स्नानादिक आन्हिक करावयासाठीं भास्कर गेला हें मागे प्रकरण अठरामध्यें आम्हीं वाचकांना कळविलें आहे. आता भास्कराची पुढची हकीगत सांगावयाच्या अगोदर कांहीं पूर्वकालीन गोष्टी वाचकांना कळविणें जरूर आहे.

दातेगड ज्या डोंगरावर बांधलेला होता, त्याच्या पश्चिमेकडे दोन टेकड्या किंवा जमिनींचे उंचवटे होते; उत्तरेकडच्या उंचवट्यावर सर्जेरावांचें घर होतें आणि दक्षिणेकडच्या उंचवट्याचे आम्ही प्रसंग येईल तेव्हां वर्णन करूं असे मागें पहिल्या प्रकरणात आम्ही वाचकांना वचन देऊन ठेविलें. होतें. त्याप्रमाणें आतां ह्या कादंबरीच्या ओघानें ह्या उंचवट्यासंबंधानें कांही वर्णन करणें जरूर आहे.

हा दक्षिणेकडचा जो उंचवटा तो उत्तरेकडच्या उंचवट्याएवढाच मोटा होता. ह्या उंचवट्यावर एक दहाखण जाबत्याचे पूर्वाभिमुख तिघई घर होते. पुढच्या घईत दोन चाधयांना चिकटून दोनदोन खणाच्या दोन खोल्या होत्या, तेणेंकरून ओटी सहा खणाची होती. मधल्या घईत सातखणाचें माजघर असून तीन खणाची एक खोली होती, तींत घराचा मालक निजतबसत असे. तींतच मूल्यवान् पदार्थांची संदूक असे. पिछाडीच्या घईत चार खणाचे स्वयंपाकगृह असून, बाकीच्या सहा खणांत दळणाकांडणाच्या सोयी होत्या. मागल्या पडवींत सर्पण, कडबा वगैरे साठविण्याच्या सोयी होत्या. मागें जें पटांगण होते त्यात गोठे, तबेले, वगैरे होते.

पूर्वीच्या काळीं ह्या घराचा मालक श्रीमंत आणि वैभवशाली होता. परंतु कालगतीनें ह्या कुटुंबाला गरीबी आल्याकारणानें गोठ्यात एकही गुरूं नव्हतें, तबेल्यांत एकही घोडा नव्हता; पिछाडीच्या घईत गवताची एक काडी नव्हती व उखळ वर्षाचे बहुतेक दिवस शेणाच्या रंगाचें होते!

आतां ह्या घराचा एकच विशेष सांगावयाचा राहिला आहे, तो हा कीं, मालकाच्या खोलींतून दर्शनी घईतील खोलींत जावयाला एक दार होतें, एक दार माजघरांत जावयाला आणि एक दार पिछाडीच्या घईतील रिकाम्या जागेंत जावयाला होतें.

पिछाडीस असलेल्या विस्तीर्ण पटांगणाला वेष्टिणारी एक दीड पुरुष उंचीची दगडी भिंत होती, आणि हें पटांगण दोनतीन हजार माणसे एकदम जेवावयाला बसतलि इतकें मोठे होतें.

मुख्य घर, त्यांतलि खोल्या, पडव्या, पिछाडीचे पटांगण, त्या पटांगणाचा विस्तार वगैरेंची आम्ही माहिती दिली आहे ती वाचकांनीं

नीट लक्ष्यांत धरून ठेवावी. कादंबरीच्या ओघानें ज्या गोष्टींचें पुढें वर्णन करण्याचा आम्हाला प्रसंग येणार आहे, त्या गोष्टी नीट समजण्याला त्या माहितीची जरूरी आहे. असो.

ह्या घराचे मालककुटुंब मोरे ह्या आडनांवाचे होते. हे मोरे-कुटुंब एकेकाळीं फार वैभवसंपन्न होतें. परंतु त्याला उत्तरोत्तर विपन्न दशा येत चालली होती. ती इतकी कीं, घराला वेळच्यावेळीं दागदुजी न केल्या-कारणानें त्याचे कांहीं भाग ढासळलेले होते. जागोजाग भिंतीच्या गिला-व्याचे ढपले पडलेले होते. घरावरचीं कौलं फुटलेलीं होतीं, तेथे नवीं कौलें विकत घेऊन घातलेलीं नसल्याकारणानें पावसाचें पाणी भिंतींवर पडून त्यांत भगदाडें झालीं होतीं. ह्या मोठ्या घरांत नेहमी दोनच माणसें राहात असत. त्यांनी आपल्या उपयोगाला जरूर तेवढा भाग मात्र बऱ्याच चांगल्या स्थितींत ठेविलेला होता.

घराच्या पिछाडीला जें विस्तीर्ण पटांगण होतें त्यात एकेकाळीं दहा पांच आंब्यांचीं झाडें होतीं, पुष्कळ फुलझाडे आणि फळझाडें होतीं. तसेंच उपयुक्त आणि औषधी झाडेही लाविलेलीं होतीं. परंतु ह्या झाडांना वेळच्यावेळीं पाणी देण्याची आणि त्यांची निगा राखण्याची मालकाला ऐपत नसल्याकारणानें तीं मरून गेलीं होतीं. मोठीं झाडें मालकाला सर्पणा-साटीं तोडावीं लागलीं होतीं. ह्या कारणांमुळें त्या पटांगणांत हल्लीं रान माजून राहिलें होतें. नाहीं म्हणावयाला दहापांच तुळशींचीं, दोनचार कण्हेरीचीं, आणि तीन चार जास्वंदीचीं झाडेंच काय तीं टिकून राहि-लेलीं होतीं.

आमची कादंबरी सुरू होत आहे त्यावेळीं मोरेकुटुंबांतील दिवा-करराव हा घराचा मालक असून तो त्यांत राहात असे. त्याची मावशी अनुबाई ही अगदीं निराश्रित असल्याकारणानें तीही त्याच्याच जवळ राहात असे. ह्या एवढ्या विस्तीर्ण घरांतहीं दोनच माणसें काय तीं राहात असत. दिवाकररावाचें शेत अगदीं लहान असल्याकारणानें त्याच्या उत्पन्नावर ह्या दोन माणसांचा चरितार्थ मोठ्या मुष्किलीनें होऊं शकत असे. दिवाकररावाचा मुलगा भास्कर हा केजळगडावर आपल्या मामाकडे राहात असे.

मोरे हें कुटुंब शंभरसवाशे वर्षांच्या मागे वैभवसंपन्न होतें, पुढे नशी-बाचें पारडें फिरल्यामुळे तें अपकृष्ट होत चाललें होतें. मोरे कुटुंबाला पूर्वीच्या वैभवावर चढविणारा कोणी पुरुष निर्माण झाला नाहीं म्हणून दिवाकररावांना अतोनात दुःख होत असे. ह्या दुःखामुळें त्यांच्या राहा-णीवर आणि विचारसरणीवर जबरदस्त औदासीन्यानें आपली छाप बसविलेली होती. ह्याच कारणामुळे ते गावांतील लोकांशीं फारसे मिस-ळत नसत. शेतावर जातांना आणि देवदर्शनास जाताना ते घराच्या बाहेर पडत. एऱ्हवीं क्वचित् ते घराच्या बाहेर पडत. गांवकऱ्यापैकीं कोणाशींही त्याचा विरोध नव्हता. गांवांत कोणाच्या घरीं लग्न वगैरे असल्यास ते पानसुपारीला जात असत, आणि तेथें जे कोणी भेटतील त्याच्याशीं ते बोलत असत. परंतु एऱ्हवीं ते कोणाच्या घरीं कधीं जात नसत. आपल्या कुटुंबाच्या विपन्न स्थितीनें उत्पन्न झालेल्या औदासीन्यामुळे ते एकलकोड्या स्वभावाचे झाले होते. सर्जेराव निंबाळकर ह्याच्याशीं त्यांचा विरोधही नव्हता आणि सलगीही नव्हती. ते दोघेजण एकमेकाना ओळखीत आणि रामराम करीत, एवढेंच. ह्याचेपलीकडे त्याचा संबंध कांहीं नव्हता.

दिवाकररावांची कौटुंबिक स्थिति, सांपत्तिक स्थिति, त्यांची राहाणी, त्यांचा स्वभाव, इत्यादिकासंबंधाची जरूर ती माहिती आम्ही वाच-कांना दिली. आतां आम्ही आपलें कथासूत्र पुन्हा हातीं घेतों.

बापाच्या सांगण्यावरून भास्कर त्याच्या खोलींतून बाहेर आला. त्यानें आंघोळ करून सूर्याला अर्घ्य दिले; मग जेवण उरकून तो बापाच्या खोलींत आला, आणि त्याच्या गादीजवळ बसून तो म्हणाला, " बाबा, मी जेवून आलो आहे. तुम्हाला जे कांहीं सांगावयाचें आहे. तें सांगा. मी लक्ष्यपूर्वक ऐकतों. "

दिवाकरराव म्हणाले, " भास्कर बाळा, ऐक. माझे वडील प्रभाकर-राव ह्यांनीं मरताना जो उपदेश मला केला तोच उपदेश मी तुला आतां करतों. माझे आजोबा विभाकरराव ह्यांनीं मरणसमयीं माझ्या वडिलांना हाच उपदेश केला होता. म्हणजे असे कीं तुझ्या पणजोबांचे शब्द तुझ्या आजोबाच्या कानीं पडले, तुझ्या आजोबांच्या मुखानें तेच शब्द

तुझ्या बापाच्या म्हणजे माझ्या कानीं पडले, आणि तेच शब्द माझ्या मुखातून तुझ्या कांनीं पडत आहेत. हे शब्द आपल्या कुटुंबांत वडिलोपार्जित जिंदगीप्रमाणे चालत आले आहेत. ते चार पिढ्याच्या जुनेपणामुळें चौपट पूज्य आहेत, आणि भास्करबाळा, हेच शब्द तूंही मरतेसमयीं आपल्या मुलाला ऐकीव. ते शब्द भगवद्गीतेच्या इतके आपल्या कुटुंबात पवित्र गाणिले आहेत."

भास्कर म्हणाला, "बाबा, तुमच्या इच्छेप्रमाणे मी करीन असे मी तुम्हाला शपथपूर्वक सांगतो."

दिवाकरराव म्हणाले, "शाबास! भास्करबाळा, शाबास! देव तुझें भले करो! ऐक तर आता पुढे."

आपले कुटुंब महाराष्ट्रात कधीपासून राहूं लागलें हे मला ठाऊक नाहीं. परंतु मला इतके ठाऊक आहे कीं, आपल्या पूर्वजानी नानाप्रकारच्या व्यवसायात चांगला लौकिक मिळविला. आपल्या एका पूर्वजानें दातेगड स्वताचा असा करून घेतला आणि तो गड त्याच्या संततिकडे अनेक पिढ्या होता. आपल्या कुटुंबांतील शेवटचा जो पुरुष दातेगडाचा गडकरी होता त्याचे नाव विभाकरराव असे होते. तो तुझा प्रपितामह. दातेगडावर विजापुरच्या बादशहांचा अनेक वर्षं डोळा होता. त्यांनीं दातेगड जिंकून घेण्याचे अनेकवेळा प्रयत्न केले. परंतु विभाकररावांच्या पूर्वजांनीं तो गड यवनांच्या ताब्यांत जाऊ दिला नाहीं. तो किल्ला अतिशय मजबूत आणि अगदीं अजिंक्य असा आहे. तुझे प्रपितामह विभाकरराव हे दातेगडाचे गडकरी असतां विजापुरच्या बादशहाने तो किल्ला सर करण्यासाठीं दहाहजार शिपायांचे सैन्य पाठविले. हल्ला करून हा किल्ला सर करणें अशक्य आहे हें जाणून, त्या सैन्याच्या सेनापतीनें त्याला वेढा दिला. हा वेढा पाच वर्षें चालूं होता. पुढें किल्ल्यांतील माणसांची आणि जनावरांची उपासमार होऊं लागली. तीन चार हजार माणसें आणि सातआठशे जनावरें मृत्युमुखीं पडूं नयेत म्हणून विभाकररावांनीं तो किल्ला शत्रूच्या ताब्यांत दिला. यवनांचा सेनापति मकबूल यानें सर्वांना बाहेर पडण्याची परवानगी दिली त्यानें कोणाला कांहीं उपद्रव केला नाहीं. किल्ल्यांतील सर्व लोक

बाहेर पडल्यावर मकबूलने तेथें सर्व मुसलमान अधिकारी नेमले. आपल्या कुटुंबांतून दातेगड गेला. ह्या गोष्टीला बरोबर शंभर वर्षे झालीं ''

इतकी हकीगत सांगून झाली तेव्हा दिवाकरराव विसांवा घ्यावयासाठीं कांही वेळ थांबले मग त्यांनी पुढे दिल्याप्रमाणे आपलें निवेदन चालू केले.

दिवाकरराव म्हणाले, '' भास्करबाळा, आपल्या कुटुंबात अनेक पिढ्या टिकून राहिलेला दातेगड आपण गमावला म्हणून विभाकररावाला अतोनात दुःख झाले. तो ह्या घरात राहावयाला आला.हे घर यवनांनी त्याच्यापासून हिसकावून घेण्याचा किंवा त्याचीं थोडीशी शेते होतीं तीं त्याच्यापासून लुबाडून घेण्याचा क्रूरपणा केला नाहीं. विभाकरराव ह्या घरांत आपली बायको आणि आपला मुलगा प्रभाकरराव ह्यासहवर्तमान साध्यामाणसाप्रमाणे राहूं लागला. परंतु आपल्या हातून आपल्या कुटुंबाची हानि झाली, ही गोष्ट विभाकररावाच्या मनाला लागून राहिली. तो भ्रमिष्ट झाला. त्याने दहाबारा वर्षे तीर्थयात्रा करण्यांत घालविली. पुढे तो वार्द्धक्यानें अशक्त झाला आणि आपल्या गावीं आपल्या घरात मरावे, म्हणून तो साठाव्या वर्षी यात्रा बंद करून येथें आला. ह्यावेळी त्याचा मुलगा प्रभाकरराव हा वीस वर्षांच्या वयाचा होता. विभाकररावाने आपल्या मुलाला आपल्या कुटुंबाचा पूर्वेतिहास सांगितला. आपल्या कुटुंबाच्या मालकीचा दातेगड कसा गमावला, हेंही विभाकररावाने आपल्या मुलाला सांगितलें. नंतर त्यानें त्याला कांहीं उपदेश केला. नंतर त्यानें त्याला सूर्य हा आपल्या कुटुंबाचें दैवत आहे, त्याचे स्तोत्र जपित जा आणि आपल्या कुटुंबातील पुरुषांचीं नांवें सूर्याचीं वाचक ठेवण्याचा परिपाठ चालू ठेव, असें त्यानें बजावून सांगितलें. मग विभाकरराव आपल्या मुलाला म्हणाले, '' मी तुला वाचावयासाठीं एक कागद लिहून ठेविला आहे, तो मी तुला आतां देईन. मी मेल्यानंतर चवदाव्या दिवशीं तूं तो वाच.तुला नशीब अनुकूल असल्यास तूं पूर्वीच्या भाग्याला चढशील. हा कागद तूं आपल्या मुलाला दे, आणि मी जें तुला सांगितलें आहे तें त्याला सांग. आपल्या कुटुंबाचा इतिहास आपल्या कुटुंबांतील प्रत्येक पुरुषाला

माहीत असला पाहिजे, आणि हा कागद प्रत्येक पुरुषाने वाचला पाहिजे." असें म्हणून विभाकररावानें नळकंड्यांत घातलेला कागद प्रभाकररावाला दिला.

विभाकरराव मेल्यानंतर प्रभाकररावानें तो कागद वाचला. त्यात मूल्यवान् उपदेश भरलेला होता, आणि त्यांत "चाधया पहा" असें एक वाक्य होतें. चांधयात म्हाताऱ्याने कांहीं डबोले लपवून ठेविले असेल अशा समजुतीनें प्रभाकररावाने ह्या घराच्या दोन्ही चांधया उतरल्या; पण त्यांत त्याला कांहीं डबोलें सापडले नाहीं. तो निराश झाला. मग त्यानें त्याच विटांनीं पुन्हां पहिल्यासारख्या चाधया बांधून टाकल्या. त्याचा सारा जन्म साध्या शेतकऱ्याप्रमाणे गरीबींत गेला. ही माझ्या वडिलांची हकीगत मी तुला सांगितली. आता कांही वेळ विसांवा घेऊन माझी स्वताची हकीगत मी तुला सांगतों."

---

## प्रकरण २० वें.

# दिवाकररावांचें जीवनवृत्त.



मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे दिवाकररावांनीं आपल्या मोरे-कुटुंबाचा इतिहास प्रभाकररावाच्या मरणसमयापर्यंत आणून ठेविला. नंतर त्यांनीं कांहीं वेळ विसावा घेतला. विसांवा घेतल्यावर ते भास्कराला म्हणाले, " भास्करबाळा, माझे वडील प्रभाकरराव ह्यांनीं आपल्या हयातींत काय काय केले ते मी तुला सागितलें. आतां त्यांनीं मरतेसमयीं मला काय सांगितलें ते मी तुला सांगतों तें ऐक."

भास्कर म्हणाला, " सांगा."

तेव्हां दिवाकरराव म्हणाले, " प्रभाकरानें मरतेसमयीं कुटुंबाचा इतिहास मला सांगितला, त्याच्या वडिलांनीं त्याला केलेला उपदेश त्यानीं मला केला. आणि तो कागद त्यानीं मला वाचावयाला दिला."

भास्करनें विचारिलें, " बरें पुढें ? "

दिवाकरराव म्हणाले, " मी लक्ष्यपूर्वक तो कागद वांचला. मला असें वाटलें कीं, चांधया ज्या विटांच्या बांधलेल्या होत्या त्या विटांपैकीं कांहीं विटांच्या पोटांत मोहोरा पुतळ्या घालून ठेविलेल्या असतील. ह्या समजुतीवर मी पुन्हा चांधयांच्या भिंती उतरल्या. प्रत्येक वीट मी फोडून पाहिली पण मला एकाही विटेच्या पोटांत मोहरा किंवा पुतळ्या सांपडल्या नाहींत. मी भारी निराश झालों. लोक मला हंसले. मग मी दुसऱ्या विटा आणून दोन्ही चांधया पूर्वीप्रमाणे बांधून टाकल्या. मी शेतकीवर गरीबाऊरीतीनें सारा जन्म घालविला. तुझी आई मेली तेव्हा तूं लहान होतास. तुझें संगोपन चांगल्या रीतीनें व्हावें म्हणून मी तुला केजळगडावर तुझ्या मामाकडे पाठविलें. भास्करबाळा, मी आता थोडक्याच दिवसाचा सोबती आहे. आपलें कुटुंब एकेकाळीं श्रीमंत आणि वैभवशाली होतें. हल्ली आपण गरीब झालों आहों. हें घर आपलें आहे आणि आपलीं थोडींशीं शेतें आहेत, तीं तुला ठाऊकच आहेत. हें घर तूं विकूं नको. प्रामाणिकपणानें वाग. आपला देश यवनांच्या दास्यांत आहे. त्याला स्वातंत्र्य मिळालें पाहिजे, हें ध्येय तूं सतत डोळ्यापुढें ठेव. जो कोणी मराठा वीर आपला हा देश स्वतंत्र करण्याला कास कशील, त्याचा अनुयायी हो. विभाकररावांनीं जो कागद माझ्या वडिलांना दिला तो भ्रमिष्टपणाच्या लहरींत लिहिला असावा असें मला वाटतें. मी मेल्यावर चवदाव्या दिवशीं ही माझी उशी फाड. तिच्यांत एक जस्ताचें नळकांडें आहे. त्यांत एक कागद आहे तो तूं वाच. त्यातील उपदेश मूल्यवान् आहे. तो लक्ष्यांत बाळग. सूर्याची आराधना करीत जा. मी तुला जें सांगितलें आहे तें तूं आपल्या मुलाला सांग. जो कागद मी तुला देत आहे तो तूं आपल्या मुलाला दे. मला दुसरें कांहीं सांगावयाचें नाहीं."

तेव्हां भास्कर म्हणाला, " बाबा, तुम्ही सांगत आहां त्याप्रमाणें मी करीन. जो [illegible] कागद मला तुम्ही वाचावयाला सांगतां त्यांतील उपदेशाच्याबाहेर माझें वर्तन नाहींना ? "

दिवाकरराव म्हणालें, "आपल्या कुटुंबांतील सर्व पुरुष व सर्व स्त्रियाही त्या उपदेशाप्रमाणें वागत आलीं आहेत. मी त्या उपदेशाप्रमाणें सारा

जन्म वागत आलों आहे. तूंही आजपर्यंत त्या उपदेशाला सोडून वागलेला नाहींस, असें तुझे मामा कोंडीबा हे मला सांगत असतात. तूं आपल्या मराठे जातीला कलंक लागेल असें कांहीं केलेलें नाहींस. तूं सूर्याचें स्तोत्र जपीत असतोस. तुझें लग्न माझ्या हयातींत होऊं शकत नाहीं हे माझें दुर्दैव असें मी समजतों. पण जेव्हां केव्हां तुझ्या लग्नाचा योग येईल, तेव्हा अस्सल क्षत्रिय मराठे जातीची तूं बायको करून घे. तुझें मामा कोंडिबा यांना मी हेंच सांगून ठेविलें आहे. तुझ्या आणि त्यांच्या विचारानें मुलीची पसंती होऊं दे. माझ्या ह्या उशीतील नळकांड्यांत जो कागद आहे, त्यांतही अशीच ताकीद आहे. मुलीच्या केवळ सौंदर्याला भुलून आणि तिची संपात्ति पाहून मुलगी ठरविणें बरोबर नाहीं. तिचें कुळ मुख्यत्वेंकरून पाहिलें पाहिजे. मुलगी कुरूप असली तरी चालेल, गरीब असली तरी चालेल पण ती कुलशीलसंपन्न असली पाहिजे. ह्याच सरणीनें आपल्या कुटुंबातील सर्व पुरुषांचीं लग्नें झालीं आहेत. तूंही ह्याच सरणीनें वाग."

भास्कर म्हणाला, "होय बाबा, पण ही जबाबदारी मजवर आहे त्यापेक्षा कोंडीमामावर अधिक आहे."

दिवाकरराव म्हणाले, "होय. तूं म्हणतोस तें खरं आहे. कोंडिबा ही जबाबदारी वहातीलच. परंतु भास्करबाळा, दैवाची गति अगम्य आहे. मानवी जीविताला शाश्वती नाहीं. तुझ्या लग्नाचा योग कोंडिबांच्या हयातींत येईलच असा नेम नाहीं. कदाचित् कोंडिबाच्या पाठीमागेंही तुझें लग्न होईल. असें झाल्यास मी सांगतों त्याप्रमाणें तूं बायको करून घे. मुलीच्या सौंदर्याला आणि पैशाला आणि चटकदार संभाषणाला भुलूं नको. मुलीचें कुलशील प्रथम पहा."

भास्कर म्हणाला. "होय बाबा. पण मी एक प्रश्न तुम्हाला विचारतों. विचारूं का ?"

दिवाकरराव म्हणाले, "विचार."

भास्कर म्हणाला, "बाबा, तुमचे आजोबा म्हणजे माझे पणजोबा, हे जेव्हां दातेगडाचे स्वतंत्र गडकरी आणि मालक होते तेव्हां ते अर्थात् खूब श्रीमंत असतीलच, आणि त्यांची कांहीं संपात्ति दातेगडाच्या गंगा-

जळींत असेल. ती गंगाजळी यवनाच्या ताब्यात गेली असेल हें ओघानेंच येतें; परंतु तुमच्या आजोबाची कांही संपत्ति ह्या त्यांच्या घरांत आणि दुसऱ्या कांहीं ठिकाणीं असावयास पाहिजे होती. त्या संपत्तीचा कांहींच कसा पत्ता आजपर्यंत कोणालाच लागला नाहीं ? ''

तेव्हा दिवाकरराव म्हणाले, '' तूं विचारलास तो प्रश्न अगदीं योग्य आहे. माझ्याही मनांत तोच प्रश्न अनेकवेळां आला. माझे आजोबा धूर्त आणि शहाणे असतीलच. त्यांनीं आपली सर्वच संपत्ति दातेगडावरच साठवून ठेविली असेल हे सयुक्तिक दिसत नाहीं. प्रत्येक मनुष्य आपली संपत्ति अनेक ठिकाणीं पसरून ठेवितो. कांहीं संपत्ति शेतांत, कांहीं बागांत, कांही घरात, कांहीं दागिन्यांत, कांही भांड्याकुंड्यात, कांहीं वस्त्रांत, कांही गहाणापाहाणात आणि कांहीं रोकड ठेवितो. अशासाठीं कीं, एकेठिकाणची संपत्ति नाश पावली तर दुसऱ्या ठिकाणच्या संपत्तीने हात द्यावा. म्हणून माझ्या आजोबांची संपत्ति दुसरीकडे ठेवलेली असावी असा मला बळकट संशय होता. असाच संशय माझ्या वडिलानाही येत असे. त्यानीं बारकाइने पुष्कळ माणसापाशीं शोध केला. परंतु आपणाकडे विभाकररावांची कांहीं ठेव आहे असें कोणीही कबूल केले नाहीं. माझ्या वडिलांनीं अनेक पंचाक्षरी व अनेक देवऋषि ह्या घरात बोलावून आणले, गुप्त द्रव्य कोठें असेल म्हणून त्याना विचारलें, परंतु कोणीही पैसा अमुक ठिकाणीं पुरून ठेविला आहे असें सांगूं शकले नाहींत. ह्या पंचाक्षऱ्यांच्या आणि देवऋष्यांच्यापायीं माझ्या वडिलांनीं पुष्कळ पैसा नाशिला. परंतु संपत्तीचा ठाव लागला नाहीं. ''

भास्कर म्हणाला, '' मग तुम्हीं देवऋष्यांचा नाद सोडून दिला असेल ? ''

दिवाकरराव म्हणाले, '' होय, मी तो नाद सोडून दिला. आपल्या नशिबी संपत्ति नाहीं. आपणाला गरीबींत दिवस काढले पाहिजेत, असें मनांत आणून मी स्वस्थपणें आयुष्याचे दिवस कंठूं लागलों. माझ्या आजोबांच्या हातून मोरेकुटुंबाची मोठी हानि झाली, वडिलोपार्जित दातेगड गमावून घेतला ही गोष्ट त्यांच्या मनाला लागून राहिली. त्यांना भ्रमिष्टासारखें झालें. त्यांनीं त्या नळकंड्यांतील कागदांत कांहीं तरी

लिहून ठेविलें असेल; कारण, त्या कागदांत जरी मूल्यवान् उपदेश केलेला आहे तरी तो तुटकवाक्याच्या रूपात आहे. आणि तो कागद लिहीत असता मध्येंच त्यांना वेडाचा झटका आला असेल आणि त्या झट-क्याचा अमल त्याच्या मनांत असताना त्यांनीं 'चाधया तपास' हे शब्द लिहिलेले असतील. त्या शब्दाचा मागच्या पुढच्या शब्दाशीं कांहीं संबंध नाहीं. "

भास्कर म्हणाला, " हें भारी चमत्कारिक आणि विचित्र दिसतें. बरं, तो कागद तरी किती मोठा आहे ? "

दिवाकरराव म्हणाले, " तो कागद दीडदोन विती लांब आहे, त्याचेवर वीस ओळी असून प्रत्येक ओळींत वीस अक्षरें आहेत. तीं सगळीं अक्षरें वळणदार बाळबोध लिपींत आहेत. त्या कागदांतील मज-कूर मी अनेकवेळां वाचला आहे आणि तो मला तोंडपाठ झाला आहे. "

भास्कर म्हणाला, " त्या कागदात ज्याअर्थी वीस ओळी आहेत, आणि प्रत्येक ओळीतही वीसच अक्षरें आहेत, त्याअर्थी तो कागद तुमच्या आजोबांनीं वेडाच्या किंवा वैतागाच्या लहरीत लिहिला असेल असें म्हणतां येत नाहीं. त्यांनी बुद्धिपुरःसरच मजकुराची तशी मांडणी केलेली असेल. "

दिवाकरराव म्हणाले. " माझेंही तसेच मत होतें. पण त्याच्याबद्दल आतां शुष्क तर्क करीत बसण्यात कांहीं अर्थ नाहीं. मी मेल्यावर चव-दाव्या दिवशीं तूं ही उशी फाडून तींतील नळकंड्यांतून तो कागद काढून वाच. तो कागद वंशपरंपरेनें तुझा होईल. तो कागद तूं आपल्या मुलाला वडिलोपार्जित देणगी म्हणून दे. ह्यात अगदीं चुकूं नको. "

भास्कर म्हणाला, " तुम्ही सागतां तसें मी करीन. "

दिवाकरराव म्हणाले, " ठीक आहे, भास्कर, तूं बराच वेळ येथें माझ्याजवळ बसलेला आहेस. आतां पाय मोकळे करावयासाठीं जरा हिंडून ये, जा. "

ह्या थराला हें संभाषण आले तेव्हां तिसरा प्रहर उलटून बराच

वेळ झालेला होता. भास्कर आपल्या बापाच्या शेजारून उठणार होता, तों त्या खोलींत दोन माणसें दिवाकररावांच्या समाचारासाठीं आलीं.

हीं दोन माणसें कोण होतीं आणि त्याचें दिवाकररावांशीं काय संभाषण झाले, ते वाचकांना आह्मी पुढीलप्रकरणीं निवेदूं.

---

## प्रकरण २१ वें.

# दिवाकररावांचा समाचार.



दिवाकररावांच्या समाचारासाटीं दोन माणसें आलीं तीं कोण होतीं आणि त्यांच्याशीं दिवाकररावांचें काय काय बोलणे झालें हें आतां वांचकांनां निवेदितों.

हीं दोन माणसें सर्जेराव निंबाळकर आणि त्यांची कन्या पद्मिनी हीं होतीं. सर्जेराव ह्याचा पोषाक त्याकाळच्या रिवाजाप्रमाणें होता. त्यांच्या अंगांत पायघोळ अंगरखा होता आणि पायात तंग विजार होती. ह्या अंगरख्याची घाटणी त्या काळच्या रिवाजाप्रमाणेच होती. म्हणजे छातीवर पेल्याची आकृति झालेली होती. त्या अंगरख्याला उपयोगाचे दोन बंद असून केवळ शोभेसाठीं लावलेले आणखी दोन बंद लोंबत होते. त्याच्या टोकांना रेशमी गोंडे होते. ह्या अंगरख्याच्या अस्तन्या त्या काळच्या रिवाजाप्रमाणें तीन हात लांब असून कोपरापासून तों मनगटापर्यंत त्या मागें सारीत नेल्याकारणानें प्रकोष्ठाच्या भागावर त्या अस्तन्यांचा चीण भरला गेला होता. त्यांच्या पायांतील तुमानीच्या बाह्यांनादेखील असाच चीण गुडघ्यापासून घोट्यापर्यंत होता.

सर्जेरावांच्या डोक्यावर एक चार कोनांचे मुंडासें असून तें त्यांनीं मोठ्या अक्कडबाजरीतीनें डोक्याला घातलेलें होतें.

सर्जेरावांच्या डाऱ्या हातांत दोन सलकडीं होतीं. पण तीं अस्तनीच्या खालीं लपलेलीं होतीं. ह्या गृहस्थाच्या दोन हाताच्या दहा बोटांत मिळून सात आंगठ्या होत्या.

सर्जेराव हा उंच काठीचा आणि धिप्पाड अंगलटीचा पुरुष असल्याकारणानें तो ह्या पोषाग्वांत फार भव्य दिसत होता.

आता त्याच्याबरोबर त्याची कन्या पद्मिनी आली होती. ती सकाळचे लुगडें बदलून काळा रास्ता ह्यावेळीं नेसली होती. खानदानीच्या कुटुंबांतील स्त्रियांच्या अंगावर जे दागिने नेहेमीं असतात, तेच ह्यावेळीं तिच्या अंगावर होते. म्हणजे गोठ, पाटल्या आणि बिलवर हे दागिने तिच्या मनगटात असून गळ्यात मोत्याच्या टिका आणि सोन्याची कंठी हे दागिने होते. डाव्या हाताच्या अनामिकेंत हिऱ्याची अंगठी होती.

आता ह्या नवागताच्या भेटीची हकीगत आमच्या वाचकांना सांगण्यापूर्वी एक सूचना त्याना देऊन ठेवावी असे वाटतें. ती सूचना ही कीं, सर्जेराव निंबाळकर ह्यांना मूर्ख म्हणण्याचे धाडस आम्हीं करूं शकत नाहीं. परंतु ह्या सर्जेरावाला आपल्या ग्वानदानीच्या कुलाबद्दल आणि श्रीमंतीबद्दल इतका अभिमान वाटत असे कीं, त्याचे संभाषण हें बहुधा बेअकलीपणाचें प्रदर्शनच होत असे.

असो. सर्जेराव हे दिवाकररावांच्या खोलींत शिरले. त्यांच्या बरोबर पद्मिनीही खोलींत शिरली. सर्जेराव उंबऱ्याच्या आलीकडे दोन पावलें चालत येऊन तेथेंच उभे राहून दिवाकरराव,–जे तक्क्याशीं टेकून बसले होते,–त्यांच्या मुखावर दृष्टि निविष्ट करून म्हणाले, " रामराम, दिवाकरराव, रामराम ! "

दिवाकरराव अशक्तआवाजाने म्हणाले, " रामराम, सर्जेराव, रामराम, या, इथे बसा. " असे म्हणून दिवाकररावांनीं आपल्या डाव्या हाताकडे त्यांना बसावयासाठीं स्थानाचा निर्देश केला.

सर्जेराव त्या स्थानीं वीरासन घालून बसले. पद्मिनी त्याच्यापासून थोड्याशा अंतरावर त्याच बाजूस,–म्हणजे दिवाकररावांच्या डाव्या बाजूस–बसली. भास्कर,–जो त्या खोलीच्याबाहेर पडावयासाठीं उठलेला होता, तो बाहेर न पडतां दिवाकररावाच्या उजव्या बाजूस बसून राहिला; आणि बसल्याबसल्या तो आपल्या बापाचा उजवा पाय चेपूं लागला. पद्मिनी त्याच्यासमोरच बसली होती, ती दिवाकररावांचा डावा पाय चेपूं लागली.

ह्या संनिवेशांत भास्कराला समोर बसलेल्या पद्मिनीचें मुख दिसत होतें, तसेंच सर्जेरावांचेंही मुख दिसत होतें. पद्मिनीला तिच्यासमोर बसलेल्या भास्कराचें मुख दिसत होतें. ह्या संनिवेशांत हीं दोन मुलें असता पहिल्यानें जेव्हा त्याच्या दृष्टीचें मीलन झाले तेव्हा ती गालातल्या गालात हंसली, पण एकमेकाशीं कांहीं बोललीं नाहीत.

निर्दिष्ट स्थानीं उपविष्ट होतांच सर्जेराव म्हणाले, " दिवाकरराव, मला आजच दुपारीं ह्या माझ्या मुलीनें तुम्ही आजारी आहा म्हणून सांगितलें. तिने सांगेतोंपर्यंत मला तुमच्या आजारीपणाबद्दल कांहीच खबर नव्हती. म्हणून ती खबर मला कळतांच मी तुमच्या समाचारासाठीं आलों. "

दिवाकरराव म्हणाले, " उपकार झाले. "

सर्जेराव म्हणाले, " दिवाकरराव तुम्हीं आजारी असून तुमच्या समाचाराला मी आलो नसतो तर तो शिष्टाचाराचा भंग झाला असता. कारण, तुम्हीं आणि मी तीनप्रकारच्या संबंधाने बाधले गेलो आहों. "

दिवाकररावांनीं विचारलें, " ते कोणचे ? "

सर्जेरावांनीं उत्तर दिले, " ते तीन संबंध असे आहेत. एक तर तुम्हीं आणि मी असे दोघेही ह्या एकाच कासेगांवचे राहाणारे आहों. म्हणून आपण ग्रामबंधुत्वाच्यासंबंधानें एकमेकांना बाधलें गेलों आहों हा एक संबंध. "

दिवाकरराव म्हणाले, " होय. तें खरें आहे. "

सर्जेराव म्हणाले, " दुसरा हा संबंध आहे कीं, आपण दोघेही जातिवंत क्षत्रिय मराठे आहों. आपणा दोघांमध्यें जातिबंधुत्वाचा संबंध आहे. हा दुसरा संबंध. "

दिवाकरराव म्हणाले, " होय. "

सर्जेराव म्हणाले, " आणि तिसराही एक संबंध आपणा दोघांमध्यें आहे. तो कोणचा म्हणाल, तर टेकडीबंधुत्वाचा संबंध !"

आपण कांहीं विनोद केला किंवा करीत आहों अशा समजुतीनें सर्जेराव खो खो खो करून हंसले. त्यांना दिवाकररावांनी विचारलें, "टेकडीबंधु म्हणजे काय ? "

सर्जेराव म्हणाले, " अहो दिवाकरराव, तुम्हीं असे पहा कीं, आम्हीं कासेगांवच्या उत्तरेकडील टेकडीवर राहातां, आणि तुम्हीं दक्षिणेकडील टेकडीवर राहातां. दुसरे कोणीही लोक आपल्या दोघाप्रमाणे टेकडीवर राहात नाहींत. आपण दोघेचजण दोन टेकड्यावर राहातो, म्हणून आपण टेकडीबंधु आहों. टेकडीबंधुत्वाच्या संबंधाने आपण दोघेजण एकमेकांशीं बांधले गेलों आहों. तर अशा तीनप्रकारच्या संबंधानीं आपण बांधलों गेलों आहों. म्हणून तुमच्या समाचारासाठीं एकदा येऊन जाणें हें माझें कर्तव्यच आहे म्हणून मी आतां तुमच्या समाचाराला येत आहे. "

दिवाकरराव म्हणाले, " ठीक. "

सर्जेराव म्हणाले, " बरें दिवाकरराव, मला आतां असें सागा कीं, तुम्ही जे आजारी आहा तें कोणच्या रोगानें ? वैद्यशास्त्रात असें सांगितलेलें आहे कीं मानवीप्राण्याला बहात्तर रोग होऊं शकतात. पोटदुखी आहे, अर्धेशिशी आहे, जाळवात आहे, पक्षघात आहे, धनुर्वात आहे, भगंदर आहे, गरमी आहे, परमा आहे, बद्धकोष्ट आहे, इत्यादि इत्यादि इत्यादि. ह्या इतक्या बाहात्तररोगांपैकीं तुम्हाला झाला आहे तरी कोणता रोग ? ह्या बाहात्तरांबाहेरचा तर कांहीं रोग नाहींना झाला ? "

दिवाकरराव म्हणाले, " आज सात दिवस मला मुदतीचा ताप येत आहे. "

हे शद्व ऐकतांच सर्जेरावांनीं उजवीकडून डावीकडे आणि डावीकडून उजवीकडे दोनवेळां डोकें कलवून दुःखाच्या मुद्रेनें म्हटलें, "हें बोवा भयंकर खटलें दिसतें आहे. मुदतीचा ताप हें कांहीं सामान्यस्वरूपाचें खटलें नाहीं. कारण मुदतीचा ताप कधींकधीं नऊ दिवस टिकतो आणि दहाव्या दिवशीं मनुष्य गचावतो. असें झालें म्हणजे त्याला नवज्वर असें म्हणतात. मुदतीचा ताप वीस दिवस येऊन एकवीसाव्या दिवशीं मनुष्य गचावला तर त्या तापाला विषम ज्वर असें नांव देण्यांत येतें. हा मुदतीचा ताप चाळीस दिवस राहून एकेचाळीसाव्या दिवशीं मनुष्य गचावला तर त्याला मधुरा असें म्हणतात. ह्या मुदतीच्या तापातून मनुष्य क्वचित्च निभावतो, आणि असल्या भयंकर प्रकारचा ताप तुम्हाला येऊं लागला आहे. आणि तशात तुमचें म्हातारपण. मला लक्षण

कठिणच दिसतें आहे. परंतु परमेश्वराच्या मनांत असले तर तुम्ही यातू-नही निभावाल. बरें, दिवाकरराव, तुम्ही औषध कोणाचें चालविलें आहे ? किंवा घरगुती औषधावरच भिस्त ठेवून बसला आहा ? ''

दिवाकररावांनी उत्तर दिलें, " मी मुकुंदराव जोशी यांचे औषध घेत असतों. ''

सर्जेराव उजवीकडून डावीकडे आणि डावीकडून उजवीकडे दोन-वेळां डोकें कलवून म्हणाले, " मुदतीच्या तापासारखा आजार आणि मुकुंदराव जोशी ह्यांच्यासारखा वैद्य ! मग काय विचारावयाचे आहे ! जोडीपर जोडी ! अशी जोडी जमली म्हणजे यमराजाने रोग्याच्या आग-मनासाठीं अगोदरपासूनच आपल्या राज्याचा दरवाजा उघडून ठेवाव-याला कांहीं हरकत नाहीं ! म्हणजे आयत्यावेळीं धांदल व्हावयाला नको ! अहो दिवाकरराव, त्या मुकुंदराव जोशाच्या हाताला यश नाहीं ! तुम्हीं गोविंदराव सावरकर ह्यांचें औषध का नाहीं सुरू केलें ? ''

दिवाकरराव म्हणाले, " मुकुंदराव हेच आमचे कुटुंबवैद्य आहेत. नेहेमीं आम्ही त्यांचेच उपचार करतों. ''

सर्जेराव म्हणाले, "एकाद्याच्या संबंधानें आपण काहीं वाईट बोलूं नये. पण त्या मुकुंदराव जोशानें गोविंदराव पारसनीसाना औषध दिले, आणि गोविंदराव आठ दिवसांतच मेले. ह्या मुकुंदराव जोशानेंच भगवान्भाई गुर्जर ह्याच्या मुलाला औषध चालविले होते, पण तो मुलगा पंधरादिवसातच गचावला. लक्ष्मणराव भावे हे अर्धांगवायूने पछाडले होते तेव्हा ह्याच मुकुंद-रावांचें औषध त्यांना चालविलें होतें. पण लक्ष्मणराव दहा बारा दिवसा-तच मरण पावलें. दुसरी अशी कितीतरी उदाहरणे मी देऊं शकेन. पण देवाची तुमच्यावर कृपा असली तर ह्याच मुकुंदरावाच्या औषधांतूनही तुम्हीं निभावून बरे व्हाल. कारण मुकुंदरावांचें औषध हाही एक प्रकारचा रोगच आहे. तो श्याहत्तरावा रोग म्हणावयाला कांहीं हरकत नाहीं !''

आपण कांहीं विनोदी भाषण केलें अशा समजुतीनें सर्जेराव खो खो करून हंसले. परंतु त्यांच्या हास्यात कोणी भर घातली नाहीं.

सर्जेरावाचें वरीलप्रमाणें भाषण चाललें असतां पद्मिनीला बापाबद्दल लाज वाटत होता. तिला किळसही वाटत होती. लाज आणि किळस हे विकार मुद्रेवर उमटूं न देण्याचा ती प्रयत्न करीत होती. परंतु भास्कराला

तिच्या मुद्रेच्या अस्वस्थपणावरून तिला बापाबद्दल वाटत असलेली लाज कळत होती. पद्मिनीही मधून मधून भास्कराच्या मुखावर दृष्टिनिक्षेप करीत होती. आपल्या पित्याचें भाषण भास्कराला कितपत रुचत आहे, हें त्याच्या मुद्रेवरून अजमावण्याचा तिचा उद्देश होता. परंतु भास्कराची मुद्रा त्याच्या मनांतील कोणताच विकार दर्शवीत नव्हती.

असो. सर्जेराव हे दिवाकररावाच्या समाचारासाठीं आलेले होते. समाचार घेण्याचा विधि वर सांगितल्याप्रमाणें उरकल्यानंतर ते घरीं जावयाच्या विचारानें दिवाकररावांस म्हणाले, " दिवाकरराव, मी तुमच्या समाचारासाठीं आलों होतों. तें काम उरकलें. आतां मी तुमची रजा घेतों. रामराम ! "

दिवाकररावानीं बसल्या बसल्या अशक्त आवाजानें उलट रामराम करून त्याना निरोप दिला. ते उठले, त्यांच्याबरोबर पद्मिनी उठली. तेव्हा दिवाकरराव आपल्या मुलाला म्हणाले, " भास्करबाळा, त्यांना पोंचवावयाला दारापर्यंत जाऊन ये. "

पित्याच्या आज्ञेप्रमाणें भास्कर उठला आणि सर्जेराव आणि पद्मिनी यांच्यामागून चालूं लागला. सर्जेरावांना पद्मिनी हलक्या स्वरांत म्हणाली, " बाबा, भास्कररावांची काही विचारपूस करून त्यांना शाबासकी द्या. "

मुलीची ही बापाला केलेली सूचना भास्कराला ऐकूं आली. ह्या सूचनेप्रमाणें सर्जेराव मागे वळून भास्कराला म्हणाले, " भास्कर, आज सकाळीं तूं माझ्या मुलीच्या उपयोगीं पडलास ह्याबद्दल मी तुला शाबासकी देतो. बरें तूं परत कैंजळगडाला केव्हा जाणार ? "

भास्करनें उत्तर दिलें, " बाबाना चांगला आराम पडल्याशिवाय मी परत कैंजळगडाला जाणार नाहीं. "

सर्जेराव आणि त्याची मुलगी हीं दोन माणसें एव्हांना घरांतून बाहेर पडून रस्त्यांत उभीं राहिलीं होतीं. भास्कर दारांत उभा होता. तेव्हां पद्मिनी आपल्या बापाला म्हणाली, " बाबा दिवाकररावांच्या शुश्रूषेचा भार एकटया भास्कररावावर पडतो आहे असें मला वाटतें. तर त्यांच्या मदतीला मी रोज इकडे येत जाऊं कां ? "

सर्जेरावांनीं उत्तर दिलें, "तुझी इच्छा असल्यास येत जा. माझी त्याला कांहीं हरकत नाहीं."

बापानें आपणाला परवानगी दिली म्हणून पद्मिनीला आनंद झाला. तिनें मागें वळून भास्कराला म्हटलें, "भास्करराव, मी तुमच्या मदतीला उद्यापासून येत जाईन बरें कां ? येऊं ना ?

भास्करने उत्तर दिलें, "तूं आलीस तर मला उपकार वाटतील."

सर्जेराव आणि पद्मिनी चालूं लागलीं. भास्कर घरात वळला.

---

## प्रकरण २२ वें.

# गडकरी आणि सेनापति.



शनिवारच्या सकाळपासून तों तिसराप्रहरापर्यंत कासेगांवीं ज्या हकीकती घडल्या त्या आम्हीं येथपर्यंत निवेदिल्या. तसेंच खुद्द दातेगडावर शनिवार सकाळपासून मध्यान्हापर्यंत ज्या हकीगती घडल्या त्याही वाचकांना निवेदिल्या आहेतच. आता दातेगडावर शनिवारच्या मध्यान्हानंतर ज्या हकीगती घडल्या त्या वाचकांना निवेदितों.

दातेगड हा अत्यंत मजबूत गड आहे, ह्या गोष्टीचा दावूदभाईला भारी अभिमान वाटत असे आणि ह्या गडावर आपली नेमणूक झाली म्हणून त्याला भारी समाधान वाटत असे. ह्या गडावर शत्रूंचा हल्ला येणें ही अशक्यकोटींतील गोष्ट आहे, आणि ह्या गडाच्या मुलखांत कोठें बंड होणें अगदींच असंभवनीय आहे, आणि म्हणून आपणाला गडांत बसून स्वस्थपणें कालक्रमणा करता येत आहे हें आपलें भाग्य होय, असें त्याला वाटत असे. त्याची साठी उलटली होती आणि त्या मानानें त्याची शक्ति कमी झालेली होती आणि लढाईची दगदग टळल्यास बरें असें त्याला वाटूं लागलें होतें. तो जरी लढाईची धामधूम आपणाला फार आवडते, स्वस्थपणांत कालक्रमणा करणें आपणाला आवडत नाहीं, असें तोंडानें म्हणें, तरी वास्तविक त्याला वयोमानाप्रमाणें दगदगीचा त्रास वाटूं लागला होता व हें साहजिक होतें.

आपला दातेगड अत्यंत मजबूत आहे, त्याचेवर हल्ला करणें हें डोंगरावर डोक्याचे धक्के मारून त्याला दूर सारूं पहाण्याइतकें मूर्खपणाचें कृत्य आहे, ही गोष्ट लोकांमध्यें फैलावण्यासाठीं तो गडावर आलेल्या लोकांना गड मुद्दाम दाखवीत असे; गडाचा भक्कमपणा ह्या लोकांनीं पाहिला म्हणजे अर्थात् ते लोक गडाच्या बाहेर गेले म्हणजे गडाचा भक्कमपणा ज्याला त्याला सांगणारच आणि त्या गडावर हल्ला करण्याची प्रेरणा कोणाला होणार नाहीं, आणि आपणाला स्वस्थपणांत कालक्रमण करतां येईल असा दावूदभाई गडकऱ्याचा मतलब असे. ह्या मतलबाप्रमाणें त्यानें शेरखान आणि पलंगखान ह्या दोघां गस्तंगिरांना गड दाखविण्याची तजवीज केली होती.

विजापुरच्या बादशहानें जरी दावूदभाईला शिवाजीचें बंड मोडण्याची कामगिरी सांगितली होती, आणि ती त्यानें जरी बाह्यात्कारी आनंदानें पतकरली होती, तरी ती कामगिरी आपला सेनापति इलाहीबक्ष याच्यावर सोपवावी, आणि आपण केवळ मार्गदर्शक म्हणून असावें, असें त्याला अंतर्यामीं वाटत होतें. खरी दगदग इलाहीबक्ष याचेवर पडावी, आणि आपणच शिवाजीचें बंड मोडलें असें आपण श्रेय घ्यावें, असा त्याचा अंतर्यामींचा बेत होता. हा बेत सिद्धीस न्यावयाच्या विचाराला तो लागला.

म्हणून आजमल्ल दोन गस्तंगिरांना गड दाखवावयाला रवाना झाल्याबरोबर त्यानें आपला सेनापति इलाहीबक्ष याला बोलावणें पाठविलें.

ज्या दिवसाची हकीगत आम्ही आतां सांगणार आहों त्याच दिवशीं ( म्हणजे शनिवारीं ) दुपारचीं जेवणें झाल्यानंतर इलाहीबक्ष आणि त्याचा भाऊ खुदाबक्ष ह्यांचें संभाषण चाललेलें होतें, हें आम्हीं प्रकरण ४ मध्यें सांगितलेलें वाचकांना आठवत असेलच. हें त्या दोघा भावांचें संभाषण समाप्त झाल्यावर खुदाबक्ष आपल्या उद्योगासाठीं निघून गेला आणि तेथें इलाहीबक्ष एकटा राहिला, असें आम्हीं वाचकांना सांगितलें होतें. तो असा एकटा बसलेला होता तों गडकरीसाहेबांकडून त्याला बोलावणें आलें, म्हणून तो पोशाख करून त्यांच्या भेटीला गेला.

गडकरीसाहेबांना शिरस्त्याप्रमाणें मुजरा करून इलाहीबक्ष यथास्थान

उपविष्ट झाला तेव्हां गडकरी त्याला म्हणाला, " सेनापतिसाहेबहो, मीं तुम्हांला ह्यावेळीं कांहीं महत्त्वाच्या कामाची वाटाघाट करण्यासाठीं मुद्दाम बोलावून आणविलें आहे. आपणा दोघाच्या विचारानें आपण एक बेत मुकरर करूं. "

इलाहीबक्ष म्हणाला, " काय काम आहे तें सागण्याची मेहेरबानी करावी; म्हणजे मी आपले विचार आपणाला सागेन. "

तेव्हा दावूदभाई म्हणाला, "काल सरदार गुलाबखान आपल्या गडावर आले होते, त्यांनीं बादशहाकडून मला एक निरोप आणला होता. पण निरोप आणला होता असे म्हणणें बरोबर होणार नाहीं. बादशहाची एक विनंती किंवा हुकूम मला कळविण्यासाठीं गुलाबखान मुद्दाम विजापुराहून माझ्या भेटीला आले होते. "

सेनापतीनें विचारलें, " काय तो हुकूम होता ? "

गडकरी म्हणाला, " हल्लीं ह्या मुलखांत शिवाजी ह्या नावाचा एक हिंदू काफीर पुंडाई करीत असतो. त्यानें आपल्याभोंवतीं कांहीं गांवगुंड गोळा केले आहेत. गावावर दरवडे घालणें, लुटालूट करणें, चोऱ्या करणें, हीं कामें आपल्या गावगुंडांच्या मदतीनें शिवाजी करीत असतो. त्यानें कांहीं गडही दरवडे घालून आपल्या मालकीचे करून घेतले आहेत. ह्या काफीर दरवडेखोराच्या टोळीचा आणि त्या टोळीच्या मुकद्दमाचा बंदोबस्त करण्याची कामगिरी मी पतकरावयाला तयार आहें काय, असा सवाल मला बादशहांनीं गुलाबखानाच्या मुखानें विचारला. "

इलाहीबक्ष म्हणाला, " बरे, पुढें ! "

दावूदभाई म्हणाला, " शिवाजीचें बंड मोडावयाची मला शक्ति आहे आणि मला इच्छा आहे असें मी स्पष्ट शब्दांनीं गुलाबखानाला उत्तर दिलें. "

इलाहीबक्ष म्हणाला, " उत्तम, "

दावूदभाईनें विचारलें, " मीं जें उत्तर दिलें ते योग्य होतें, असेंच तुमचें मत आहेना ? "

इलाहीबक्ष म्हणाला " आलबत, आलबत, आलबत ! तुम्ही जें उत्तर दिलें तें तुमच्या पराक्रमाला आणि लौकिकाला साजेलसेंच होतें."

दावूदभाई म्हणाला, " तुमचें मत माझ्याचसारखें आहे हें पाहून मला भारी आनंद होत आहे, पण हे मी जें धमकदारीचें उत्तर गुलाबखानाला दिलें, तें कोणाच्या जोरावर दिलें हें तुम्हाला ठाऊक आहे काय ?"

इलाहीबक्षनें विचारलें, " कोणाच्या जोरावर ? "

दावूदभाई म्हणला, " कोणाच्या म्हणजे ? अर्थात् तुमच्या. तुम्ही माझे सेनापति आहा. तुम्ही आजपर्यंत अनेक पराक्रम केलेले आहेत. तुमची मदत असल्यावर मला आणखी तो जोर काय पाहिजे असणार ? तुम्ही आणि मी असे दोघेजण मिळून त्या काफीर शिवाजीची टोळी नेस्तनाबूद करावयाला समर्थ होणार नाहीं काय ? आलबत होऊं. "

इलाहीबक्ष म्हणाला, " आलबत होऊं. शिवाजी हा विजापुरच्या राजाचा शत्रु आहे. त्याच राजाचे तुम्ही अंकित आहां तसा मीही आहे. म्हणून शिवाजीला आणि त्याच्या टोळीला नेस्तनाबूद करणें जसें तुमचें कर्तव्य आहे, तसें माझेंही कर्तव्य आहे. मी आपणांस मनोभावाने मदत करावयाला तयार आहें. शिवाजीचा बंदोबस्त तुमच्या पराक्रमानें झाला तरी मला इष्ट आहे, आणि माझ्या पराक्रमानें त्याचा बंदोबस्त झाला तरी तो तुम्हाला इष्टच आहे. आपणा दोघांच्याही पराक्रमाने शिवाजीचा बंदोबस्त झाला तरी ती गोष्टही इष्टच आहे. तर आपण दोघेजण मिळून हें कार्य अंगावर घेऊन पार पाडूं. शिवाजीविरुद्ध जी मोहीम आपण चालविणार. तिचा आराखडा तुम्ही आपल्या मनाशीं कांहीं करून ठेविला आहे काय ? "

दावूदभाईनें उत्तर दिलें, " प्रत्यक्ष मोहिमीचा आराखडा मी कांहीं अद्यापि करून ठेविला नाहीं, पण ह्या मोहिमेची पूर्वतयारी मी करूं लागलों आहे. आज सकाळीं मी आपला मुलगा हमीदबाळ ह्याला ह्या सर्व मुलखाची टेहळणी करून यावयासाठीं रवाना केलें आहे. शिवाजीचे सामर्थ्य किती आहे, त्याच्या टोळींत किती लोक आहेत, त्यांचेंजवळ शस्त्रास्त्रें किती आणि कोणत्या लायकीचीं आहेत, शिवाजीला पैशाचा जोर किती आहे, ह्या मुलखांतले प्रजाजन शिवाजीला कितपत अनुकूल आहेत, लोकांचा ओढा शिवाजीकडे अधिक आहे किंवा आपल्या बादशहाकडे अधिक आहे, शिवाजीविरुद्ध आपण मोहीम

सुरू केली तर लोक आपणाला येऊन मिळतील का शिवाजीला, शिवाजीनें जिंकून घेतलेले गड कितपत बळकट आहेत आणि ते किती दिवस टिकाव धरून राहाण्याजोगे आहेत, शिवाजीचे मित्र कोण आहेत, त्याचे अनुयायी कोण आहेत, शिवाजीला उघडपणें मदत करणारे कोणकोण लोक आहेत आणि गुप्तपणें कोणकोण मदत करणारे आहेत, तसेंच त्यांच्यापैकीं कोणकोण लोक लाचानें फुटण्याजोगे आहेत, कोणकोण लोक त्याचे शत्रू आहेत, इत्यादि माहिती गोळा करून आणावयासाठीं मी आपल्या मुलाला पाठविलें आहें. आणि ही माहिती त्यानें एक महिना ह्या मुलखांत हिंडून गोळा करून आणावी असें मी त्याला सांगून ठेविलें आहे. ही माहिती आपणाला मिळाली, म्हणजे नंतर आपण त्या काफीर बंडखोरांवर मोहीम सुरू करावी असें मी आपल्या मनाशीं ठरविलें आहे. ही आपणाला जी माहिती पाहिजे आहे ती मिळाल्यानंतर आपण ह्या मोहिमेचा तपशीलवार आराखडा ठरवूं. ”

याप्रमाणें दावूदभाईचें बोलणें चाललें असता सेनापतीची मुद्रा निर्विकार होती, आणि हें भाषण संपलें तेव्हां तो त्याच्यावर कांहींच टीका न करतां स्वस्थ बसून राहिला. तेव्हां दावूदनें त्याला विचारलें, “ कां ! इलाहीबक्ष, मोहिम सुरू करावयाच्या अगोदर मी म्हणतो ती माहिती एका महिन्यांत आपण मिळवावी आणि नंतर ह्या माहितीच्या जोरावर आपण आपल्या मोहिमेचा आराखडा करावा ही गोष्ट तुम्हाला कितपत सयुक्तिक वाटते ? ”

तेव्हां इलाहीबक्ष म्हणाला, “ भाईसाहेब, माझे मत तुमच्या माताहून भिन्न आहे त्याला माझा नाइलाज आहे. ”

दावूद म्हणाला, “ तें कसें काय ? ”

इलाहीबक्ष म्हणाला, “ आपलें मत खोडून काढलें असतां ते आपणास रुचणार नाहीं. ”

दावूद म्हणाला, “ आपण येथें बरोबरीच्या नात्यानें वाटाघाट करीत बसलों आहों. आपणा दोघांच्या विचारानें जें सयुक्तिक ठरेल, तेंच आपण करणार आहों. तुमचें मत काय आहे तें मला स्पष्टपणें सांगा. ”

## प्रकरण २३ वें.

# मोहिमेची वाटाघाट.



शिवाजीचें बंड मोडून टाकण्यासाठीं आपण कोणच्या प्रकारें उपक्रम करावा ह्या संबंधानें गडकऱ्यानें आपले विचार आपल्या सेनापतीला कळविले आणि त्याचे विचार काय आहेत हें विचारलें. सेनापतीला गडकऱ्याचे विचार नापसंत होते. हमीदभाई हा पोरगा दावूदभाईला भारी कर्तबगार वाटत असे. आपला मुलगा बुद्धिमान् आहे, धोरणी आहे, धूर्त आहे, चाणाक्ष आहे, गोडबोल्या आहे, लोकांच्या पोटांत शिरून त्यांचे विचार जाणून घ्यावयाला समर्थ आहे, तो चतुर आहे, असें दावूदला वाटत असे. हमीद हा मोहिमेला जरूर ती माहिती मिळवूं शकेल, असें दावूद याला वाटणें पुत्रप्रेमामुळें साहजिक होतें. परंतु इलाहीबक्ष ह्याला हमीदची खरी परीक्षा झालेली होती. पुत्रप्रेमानें दावूद अंध झाला होता तसा इलाहीबक्ष झालेला नव्हता. हमीद हा नादान आणि कर्तृत्वशून्य पोरगा असून बापाच्या लाडामुळें शेफारलेला आहे, तो गडाच्या बाहेर पडला तो रंगेलपणांत एक महिना खर्च करून परत गडावर येईल, अशी इलाहीबक्ष ह्याची खातरी होती. परंतु हमीदच्या हातून कांहीं उपयुक्त कार्य होणार नाहीं असें स्पष्टपणें दावूदला सांगावयाला तो कचरत होता, म्हणून तो मुकाट्यानें बसून राहिला होता.

इलाहीबक्ष ह्याला उत्तेजन देण्यासाठीं गडकरी त्याला म्हणाला, “ तुमचें मत काय आहे तें मला स्पष्ट सांगा. कचरूं नका. आपण येथें बरोबरीच्या नात्यानें वाटाघाट करावयाला बसलेले आहों. बोला. ”

तेव्हां सेनापतीनें हमीदच्या नादानपणाचा बिलकूल उच्चारच न करतां आपल्या मताला पुढील सरणीनें दिशा लाविली. तो म्हणाला, “ भाई-साहेब, तुम्हीं जी पूर्वतयारी करीत आहां, ती करण्याचें कांहीं कारण नाहीं. आणि ती तयारी करण्यांत एक महिना दवडावा हेंही मला योग्य दिसत नाहीं. माफी असावी. ”

दावूदनें विचारलें, “ मी जें योजलें आहे त्यांत तुम्हांला गैर असें काय वाटते ? ”

सेनापति म्हणाला, “ भाईसाहेब, ऐका. शिवाजीसंबंधानें आपणाला जितकी माहिती आहे, तितक्या माहितीच्या जोरावर आपणाला मोहीम सुरूं करतां येईल. जास्ती माहितीची काहीं जरूरी नाही. शिवाजी हा एक बंडखोर काफीर आहे, त्याच्याजवळ पांचसातशें गांवगुंड आहेत; तो मुसलमानांच्या ताब्यांतील गडांवर छापे घालून तो ते आपल्या कबज्यांत घेतो, इतकी माहिती आपणाला आहे ती पुरे आहे. त्याने भोपाळगड, केंजळगड, जंगली जयगड, भैरवगड, गणवंतगड वगैरे गड अशा रीतीनें घेतले हे आपणास माहीत आहे. ही माहिती आपणाला आहे तितकी बस्स आहे. शिवाजीजवळ दोनतीनशें गावगुंड अधिक असलें किंवा कमी असलें तरी आपल्या मोहिमीत आपणास काही फेरफार करावा लागेल असे मला वाटत नाही. त्याने आतांपर्यंत सात आठ गड आपल्या ताब्यात घेतले आहेत असें आपण ऐकतो. त्यांत आणखी दोनचार गडांची भरती पडली म्हणून आपल्या मोहिमीच्या आराखड्यांत काहीं फेरफार करण्याची आपणाला जरूरी पडेल, असें मला वाटत नाहीं. शिवाजी हा बंडखोर आहे इतकी गोष्ट खरी आणि त्याला नेस्तनाबूद करणें हें आपलें कर्तव्य आहे हीही गोष्ट खरी. आपल्या तीन हजार सैन्यापुढें त्याचे आठशें गांवगुंड सारखेच आणि हजार गांवगुंडही सारखेच. एका सिंहाला पाचशे शेळ्या सारख्याच आणि आठशे शेळ्या सारख्याच आणि हजार शेळ्याही सारख्याच ! आपलें सैन्य कवायती आहे, आपल्या सैन्याजवळ मुबलक हत्यारें आहेत, आणि शिवाजीच्या गांवगुंडांना कवाईत ठाऊक नाही. कांहींचीं हत्यारें तीरकामठे, कांहींचीं तरवारी, कांहींचीं गोफणी, कांहींचीं काठ्या ! असल्या गांवगुंडाच्या टोळीला आपलें सैन्य केव्हांच उधळून लावील ! ”

दावूद म्हणाला, “ तुमचें म्हणणें मला बरोबर वाटतें. ”

इलाहीबक्ष म्हणाला, “ या मुलखांतील कोण लोक आपणाला मिळतील आणि कोण लोक शिवाजीला मिळतील, ह्याचीही आपणाला पर्वा करण्याचें कारण नाहीं. शंभर शेळ्यांच्या मदतीला पांचपन्नास कोकरें

आलीं काय किंवा नाहीं काय सारखेंच! एका सिंहाच्या मदतीला दहा-पांच मेंढरें आल्यानें त्या सिंहाचें सामर्थ्य वाढतें अशांतली कांहीं गोष्ट नाहीं."

दावूद म्हणाला, "हेंही तुमचें म्हणणें मला मान्य आहे."

इलाहीबक्ष म्हणाला, "आणखी तुम्ही असें पहा कीं, तुमचा मुलगा हमीद हा अद्यापि बच्चा आहे. त्याला दुनियेचा कांहीं अनुभव नाहीं. लोकामध्यें मुसलमानी राज्यासंबंधानें किती बेदिली किंवा खुपदिली आहे हें त्याला जाणून घेतां येणार नाहीं. आणि जरी त्याला तें जाणून घेतां आलें, तरी त्याचा आपणाला कांहीं उपयोग नाहीं. जर सर्व रय्यत मुसलमानी रियासतीसंबंधानें बेदिल असली, तर आपण आपला मुसलमानी अमल अधिक दृढ करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. रय्यत बेदिल आहे म्हणून आपलें राज्य आपण सोडून द्यावयाचें कीं काय?"

दावूद म्हणाला, "तुमचें म्हणणें मला कबूल आहे. तर तुम्ही काय करावें असा मला सल्ला देतां?"

तेव्हां इलाहीबक्ष म्हणाला, "माझी विचारसरणी तुम्हाला पटत आहे हें पाहून मला आनंद होत आहे. आतां मला काय करावें असें वाटतें तें तुम्हाला सांगतों, ऐका."

दावूद म्हणाला, "सांगा."

इलाहीबक्ष म्हणाला, "जी माहिती मिळविण्यासाठीं तुम्हीं हमीद-भाईला पाठविलें आहे, त्या माहितीची कांहीं जरूरी नाहीं म्हणून त्याला परत बोलवावें."

दावूद म्हणाला, "बरें, पुढें?"

इलाहीबक्ष म्हणाला, "आपलें एकंदर सैन्य तीन हजार असून त्यापैकीं कांहीं ह्या गडावर आहे आणि बाकीचें आपल्या मुलखांत दोन ठिकाणीं आपण ठेविलें आहे. त्या एकंदर तीन हजारांची गणती करून त्यांचीं हत्यारेंपात्यारें बरोबर आहेत किंवा नाहींत, हें काळजीपूर्वक तपासलें पाहिजे. आपले कांहीं शिपायी आजारी असतील, कांहीं रजेवर असतील, कांहीं नोकऱ्या सोडून गेलेले असतील. ह्यासाठीं आपल्या शिपायांची बरोबर गणती करणें जरूरीचें आहे. आणि नवीन शिपायांची लागेल तितकी भरती करून घेतली पाहिजे."

दावूद म्हणाला, " तुम्ही म्हणतां तसें करणें जरूर आहे. बरें, इतकें केल्यावर पुढें काय करावें असें तुम्हाला वाटतें ? "

इलाहीबक्ष म्हणाला, " बरेंच वर्षांत आपल्या शिपायांना लढण्याचा प्रसंग आलेला नाहीं. म्हणून त्यांची कवाईत पाहिली पाहिजे. आपल्या-जवळ दारूचा साठा मुबलक आहे. पण त्याच्याकडे आपण कैकवर्षांत पाहिलेलें नाहीं. तो साठा यथास्थित आहे कीं नाहीं, हें पाहिलें पाहिजे. तटबंदीवर आपल्या तोफा आपण पक्क्या बसवून ठेविलेल्या आहेत. त्या खचल्या किंवा तिरकस झाल्या आहेत किंवा त्यांचे कोन बदलले आहेत कीं काय, हे नीट तपासून पाहिलें पाहिजे. "

दावूद म्हणाला, " हे काम तुमचे बंधु खुदाबक्ष करूं शकतील. "

इलाहीबक्ष म्हणाला, " आलबत ते करूं शकतील. "

दावूद म्हणाला, " बरे ! तुम्ही म्हणतां तें सर्व करणें झाल्यावर प्रत्यक्ष मोहिमीची मांडणी तुम्ही कशी सुचवितां ? "

इलाहीबक्ष म्हणाला, " माझें म्हणणें असें आहे. तुमचा मुलगा हमीदभाई आणि माझा भाऊ खुदाबक्ष यांनीं ह्या दातेगडाच्या संरक्षणा-साठीं ह्या गडावर दोनशें शिपायी घेऊन राहावें, आणि तुम्ही आणि मी दीड दीड हजार सैन्य घेऊन ह्या गडाच्या आजूबाजूचा प्रदेश वाटून घेऊन तो जिंकावयाला निघावें. तुम्ही गणवंतगड, प्राचितगड, वगैरे गड जिंकून घ्या, आणि मी भैरवगड, जंगली जयगड, केंजळगड वगैरे जिंकावयाला जातों. जो एकएक गड आपण जिंकून घेऊं. त्याच्यावर बादशहाच्या वतीचा एकएक गडकरी आपण तात्पुरता नेमावा. नंतर त्या त्या गडावर आपले बादशहा लायक माणसाची नेमणूक करतील. "

दावूद म्हणाला, " मलाही असेंच वाटतें. ह्या कामाला आपण ताबडतोब सुरुवात करावी. मी आपल्या मुलाला परत बोलावण्यासाठीं आजच्या आज दोन स्वार रवाना करतों. तुम्ही आपला भाऊ खुदाबक्ष ह्याच्या मदतीनें बाकीचीं सर्व कामें करा. "

इलाहीबक्ष म्हणाला, " ही कामें ताबडतोब केलीं पाहिजेत. बाद-शहांचा लेखी हुकूम चारपांच दिवसांनीं येवो किंवा आठदहा दिवसांनीं येवो, किंवा मुळींच न येवो. आपण नेहेमीं बंदोबस्ताच्या स्थितींत

असावें, हें केव्हांही इष्टच आहे. आपली तयारी सदासर्वदा पूर्ण असली पाहिजे. तुम्हाला असें नाहीं कां वाटत ? ''

दावूदभाई म्हणाला, ''माझें मत तुमच्या मतासारखेच आहे. आपण ज्या गोष्टी करावयाच्या ठरविल्या आहेत त्या तुम्हीं करावयाची सुरुवात करा. मला जें कांहीं करावयाचें ते करावयाला मीही सुरुवात करतों. बादशहांचा हुकूम केव्हांही आला तरी हरकत नाहीं. आपली तयारी असणारच. हुकूम आल्याबरोबर मी तुम्हाला बोलावणें पाठवीन. ''

इलाहीबक्ष म्हणाला, '' ठीक. मी दोनतीन दिवसांनीं तुम्हाला भेटेन आणि मोहिमेची पूर्वतयारी मी काय काय केली आहे, हें तुम्हाला सांगेन. बरें, आता मी तुमची रजा घेऊं ? ''

गडकरी म्हणाला, '' होय. ''

याप्रमाणें दावूदची परवानगी घेऊन इलाहीबक्ष परत आपल्या घराकडे यावयाला उठला.

---

## प्रकरण २४ वें.

# माषुमभाई आणि फुन्नूभाई.

हमीदभाई आपल्या दोस्तासह इपकगांवाकडे रवाना झाला, असें आम्ही वाचकाना मागील एका प्रकरणांमध्यें सांगितलें आहे. पद्मिनीला आपल्या विलासासाठीं पकडून आणावयाची कामगिरी त्यानें दर्याखान आणि भाऊमीया ह्यांना सांगितली होती. ते दोघेजण पद्मिनीला मध्यान्हाच्या आंत धरून आणतील, अशी त्याला खात्री वाटत होती. परंतु दर्याखान आणि भाऊमीया ह्यांची पद्मिनीनें कशी वाट लाविली होती, याची त्याला कल्पनाच नव्हती. आणि ती कोठून असणार !

असो. मध्यान्हाचा समय उलटून गेला, तरी दर्याखान आणि भाऊमिया इषकगांवीं आले नाहींत, म्हणून हमीदला आश्चर्य वाटलें. तिसरा प्रहर उलटून गेला, तरी त्यांचा ठिकाण नाहीं. संध्याकाळ जवळ येत चालली, तरी त्या दोघांचा ठिकाण नाहीं. तेव्हां हमीदला अस्वस्थता

वाटूं लागली. दर्याखान आणि भाऊमीया ह्यांच्याबद्दल त्याला काळजी वाटत नव्हती, परंतु पद्मिनी आणली गेली नाहीं ह्या बद्दल त्याला अस्वस्थता वाटत होती. पद्मिनीला दुसऱ्या कोणीही पकडून हमीदच्या हवाली केलें असतें तर त्याला आनंद झाला असता, आणि त्यानें दर्याखान आणि भाऊमीया ह्यांची परवाही केली नसती. परंतु ह्या प्रसंगीं पद्मिनीही त्याला दिसली नाहीं, आणि त्याचे दोन दोस्तही दिसले नाहींत. ह्या कारणामुळें त्याला अस्वस्थता वाटूं लागली.

जसजशी संध्याकाळ जवळ येऊं लागली, तसतशी त्याची अस्वस्थता वाढूं लागली. पद्मिनी केव्हा एकदा आपल्या बाहुपाशात कवटाळूं असें त्याला झालें होतें.

ह्या मनःस्थितींत तो आपल्या दोस्तांना म्हणाला, "गड्यांनो, मध्यान्हाच्या आंत आम्ही त्या सुंदर पोरीला आणतों अशी प्रतिज्ञा करून दर्याखान आणि भाऊमीया हे जे गेले ते अजून परत आले नाहींत. तुमच्या पैकीं जो कोणी जाऊन त्या दोघाचा तपास लावून येईल, आणि त्या सुंदर पोरीला आणण्याच्या कामात त्याना काय अडचणी आल्या हें पाहून येईल, त्याला मी शंभर मोहोरा बक्षिस देईन. कोण तयार आहे ? बोला."

हा हमीदनें केलेला सवाल ऐकतांच मापुमभाई म्हणाला, "मी हें काम पथकरतों."

फुन्नूभाई म्हणाला, "मी हें काम करावयाला तयार आहे. रात्र पडावयाच्या आत मी हा तपास करून येतों."

तेव्हा हमीद त्या दोघांना म्हणाला, "तूं मापुमभाई, तूंही जा, आणि तूं फुन्नूभाई, तूंही जा. मी तुम्हां दोघांनाही शंभर शंभर मोहरा बक्षीस देईन. आणि तुम्ही जर परत येतांना त्या सुंदर पोरीला बरोबर आणलें तर शंभराच्याऐवजीं दोनशें मोहोरा एकेकाला बक्षीस देईन."

हें हमीदचें भाषण ऐकतांच मापुमभाई आणि फुन्नूभाई हे बक्षीसाच्या लालचीनें ताबडतोब अश्वारूढ झाले आणि त्यांनीं कासेगांवची वाट धरली.

वाटेनें चालतांना मापुमभाई आपल्या जोडीदाराला म्हणाला, "अरे फुन्नूभाई, आपण दोघेजण एकाच वाटेने जाण्यापेक्षां दोन वाटांनीं गेलों

ार आपणाला दर्याखान आणि भाऊमीया ह्याचा तपास लागण्याचा ाधिक संभव आहे. आपण दोघेही एकाच वाटेने गेलो आणि ते दोघे-ाण जर कर्मधर्मसंयोगाने दुसऱ्या वाटेनें इपकगांवाला जात असले, तर । आपणाला भेटणार नाहींत. म्हणून मी असें म्हणतो कीं, आपण दोन ाटानीं कासेगांवाकडे जावें. तुला कसें वाटते ? "

त्यावर फुन्नूभाई म्हणाला, " माझेही तुझ्याचसारखे मत आहे. येथे स्ता फुटत आहे. ह्या डावीकडच्या वाटेने तूं जा; मी उजवीकडच्या ाटेनें जातो. आपली गांठ पुढें त्या कवठीच्या झाडापाशीं पडेल. "

ह्या ठरावाप्रमाणे माषुमभाई डावीकडच्या वाटेने चालूं लागला आणि फुन्नूभाई उजवीकडच्या वाटेने चालूं लागला.

माषुमभाई जो डावीकडच्या वाटेने निघाला होता, तो सुमारे दोन ाटका चालला, तो त्याला समोर काही अंतरावर एक दृश्य दिसलें.

एका झाडाखाली एक धोतर पसरलेले असून त्याच्यावर कोंवळ्या-कोंवळ्या पानाचा गुडघ्याइतका ढीग केलेला होता. एक इसम झाडाच्या फांद्या एका हातानें वाकवून दुसऱ्या हातानें त्यांची कोवळीं पानें तोडून त्या ढिगावर टाकीत होता. हा इसम नेसलेल्या धोतराशिवाय वस्त्रहीन होता. त्याच्या कपाळावर भस्म असून त्या भस्मावर पांढरें गंध लांब-लचक लावलेलें होतें. त्याच्या गळ्यात चारपाच जानवीं असून त्यांना दोन सल्ले गुतंविलेले होते. तो ब्राह्मण दिसत होता आणि तो होताही. तो कासेगांवच्या भवानीच्या देवळाचा पुजारी होता. आपल्या शेळीसाठीं झाडाचीं कोंवळीं पानें तोडावयासाठी तो ह्या रानात आलेला होता.

ह्या ब्राह्मणाचें पागोटें जमीनीवर अंथरलेल्या धोतरापासून तीन चार हात अंतरावर एका मोठ्या फत्तरावर ठेवलेलें होतें; ह्या ब्राह्मणाच्या एका नातवंडाला मुकुंदराव वैद्याने शेळीचे दूध दिले पाहिजे असें सांगितलेलें होतें, म्हणून त्या ब्राह्मणाने शेळी बाळगली होती व तिच्यासाठीं तो ही पानें तोडीत होता.

हें दृश्य दृष्टीस पडतांच माषुमभाईच्या डोक्यात एक वात्रटपणाची कल्पना उत्पन्न झाली. त्यानें आपला भाला हातांत धरला आणि त्यानें घोड्याला थोडेंसे टाचळलें. तो घोडा धावूं लागला. माषुमभाईनें आपल्या

भाल्याचें टोक अशा नेमबंध रीतीनें त्या पुजाऱ्याच्या पागोट्याव रोखून धरलें कीं, तें पागोटें भाल्याच्या टोकानें फत्तरावरून अचूक उचलले गेलें आणि भाल्याच्या टोकालाच अडकून राहिलें !

हें निशाणबाजीचें कृत्य करून मामुमभाई खो खो हंसत सुटला ! ह्या मुसलमानाचा घोडा दवडत असल्याकारणानें तो कांहीं कदम एव्हांना दूर गेला होता !

मामुमभाईचा हा पराक्रम डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्या थोडया वेळांत केला गेला होता. परंतु तो पराक्रम त्या ब्राह्मणाच्या दृष्टीस पडावयास चुकला नव्हता. त्यानें तत्काळ जमीनीवरून नारळा-एवढा धोंडा उचलून घेतला आणि तो अशा नेमसूध रीतीनें त्या मुसलमानाच्या डोक्यांत हाणला कीं, ज्याचें नांव तें ! तो धोंडा त्या मुसलमानाच्या डोक्याच्या मागल्या बाजूवर हापटून घोड्याच्या पाठीवर पडला ! हा धोंडा खूब जड होता, आणि तो खूब जोरानें फेकला गेला होता, आणि त्यानें आपलें लक्ष्य नेमसूध रीतीने गांठले होतें. मग काय विचारतां ! त्या खोडकर मुसलमानाचें डोकें मडक्याप्रमाणें फुटलें ! त्यांतून रक्ताचा प्रवाह सुरू झाला, तो मुसलमान गतप्राण झाला, आणि त्याचा मुडदा रिकीबींत अडकलेल्या तंगड्यानिशीं घोड्याबरोबर फरफर ओढला जाऊं लागला ! घोडा ह्यावेळीं धांवत होता आणि हा मुडदा धावणाऱ्या घोड्याच्या पायांत वारंवार आडकूं लागला, त्यामुळें घोड्याला भीति वाटून तो खूब वेगानें त्या रानांतून पळत सुटला. त्याच्याबरोबर तो मुडदाही पालथाउलथा फरफटत ओढला जात होता ! हा घोडा बेफामपणानें पळत सुटल्याकारणाने तो क्षणार्धांत त्या पुजाऱ्याच्या नजरेच्या टप्याबाहेर गेला ! भाल्याच्या टोकाला अडकलेलें पागोटें खालीं जमीनीवर गळून पडलें होते ते त्यानें उचलून घेऊन त्याच्यावरचा केरकचरा झाडून टाकला.

घोडा आणि त्याच्याबरोबर फरफटत जाणारा मुडदा त्या ब्राह्मणाच्या दृष्टिपथाच्या बाहेर गेला तेव्हां त्या दिशेकडे तोंड करून तो उद्गारला, "ब्राह्मणाची खोडी करणाऱ्या त्या लांड्याला बरी अद्दल घडली !"

असा उद्गार काढून त्या ब्राह्मणानें डोकीवर आपलें पागोटें घालून

आणि तोडलेल्या पानांची मोटोळी बांधून ती पाठीवर टाकून त्यानें कासेगांवचा रस्ता धरला.

इकडे माशुमभाईचा घोडा त्या रानांत बेफामपणानें सैरावैरां धांवत होता. असा पिसाळलेल्या रीतीनें हा घोडा धावत असतां त्याच्या समोरून फुन्नूभाई येत होता ! माशुमभाईचा घोडा धावत असतां तो फुन्नूभाईच्या घोड्याच्या उजव्या बाजूनें पुढें गेला आणि त्याच्याबरोबर फरपटत असलेला मुडदा डाव्या बाजूनें जाऊं लागला ! तेणेंकरून फुन्नुभाईच्या घोड्याची गति एकदम कुंठित झाली ! माशुमभाईच्या घोड्याचीही गति कुंठित झाली ! ह्या धक्क्याने फुन्नूभाई घोड्यावरून ढासळला, त्याचा स्वताचा घोडा धप्पदिशी त्याच्या अंगावर आदळला आणि माशुमभाईचा घोडा ह्या घोड्यांवर धप्पदिशीं आदळला ! फुन्नूभाई ह्या दोन घोड्यांच्या आघातानें जमीनीवर चिरडला गेला ! त्याच्या बरगड्या कचाकच मोडल्या आणि तो क्षणार्धांत यमलोकाला गेला !

हमीदभाईच्या बारा दोस्तांपैकीं माशुमभाई आणि फुन्नूभाई ह्यांची अशाप्रकारची गति झाली. हमीदभाईचे दोन दोस्त दर्याखान आणि भाऊमीया यांची वाट कशी लागली, हें वाचकाना ठाऊकच आहे. हमीदभाईचे आतांपर्यंत चार दोस्त मरण पावले.

---

## प्रकरण २५ वें.

# विपडी गांवचे दोन वसु.



माशुमभाई आणि फुन्नुभाई आपले गेले तिकडेच गडप झाले, म्हणून हमीदची भारी निराशा झाली. पद्मिनी आतां येईल, अंमळशानें येईल, असें म्हणतां म्हणतां ती शनिवारची रात्रही संपून गेली. आदित्यवार उजाडला तेव्हां हमीद आपल्या दोस्तांना म्हणाला, " गड्यांनो, येथें आपल्या मनाजोग्या गोष्टी घडत नाहींत. आपले आतांपर्यंत चार दोस्त नाहींसे झाले. दर्याखान आणि भाऊमीया गेले तिकडे गेले. त्यांच्या शोधासाठीं माशुमभाई आणि फुन्नूभाई गेले तेही तिकडेच गडप

झाले. आतां आपण त्यांची आशा सोडून देऊन प्राचितगडाकडे जाऊं. दोस्तांनो, तुमचा काय विचार आहे ? "

त्याचा एक दोस्त महिबूबभाई म्हणाला, " होय, हमीदभाई, आतां आपण प्राचितगडाकडे जाऊं. "

दुसरा दोस्त बुढाणभाई म्हणाला, " होय, माझेही असेच मत आहे. दर्याखान, भाऊमीया, मासुमभाई आणि फुन्नुभाई हे शूर आणि हुशार गडी आहेत. ते लवकरच आपणाला येऊन भेटतील. त्यांच्याबद्दल आपणाला काळजी करण्याचे कांहीं कारण नाहीं. आपण आता प्राचितगडाकडे जावे. "

प्राचितगडाच्या मुलखांत जाण्याचा विचार मुकरर करण्यांत आला. त्या सर्वांचे घोडे उमदे होते. आणि आपण प्रहरभर दिवसास प्राचितगडाच्या पायथ्याला जाऊन पोहोंचूं अशी सर्वांना आशा होती. ते [illegible]-असामी अश्वारूढ होऊन प्राचितगडाकडे जावयाला निघाले.

हमीदभाई आणि त्याचे दोस्त हे प्राचितगडाच्या मुलखातून चालले असतां ते विपडी गावापाशीं येऊन ठेपले. आता पुढे कोणीकडे वळावयाचें ह्या विचारांत ते आहेत तों त्याना कांहीं अंतरावर दोन दुधासारखे पांढरे शुभ्र बैल दिसले. हे दोन बैल दोन वेगवेगळ्या झाडांच्या छायेंत स्वस्थ उभें राहून रंवथ करीत होते.

ह्या दोन बैलांपैकीं एक लहान हत्तीएवढा उंच असून तो उंचीच्या मानानें असावा तितका धिप्पाड होता. दुसरा बैल दुसऱ्या एका झाडाखालीं रंवथ करीत होता, तोही घोड्याएवढा उंच असून अंगानें खूब धिप्पाड होता.

हे दोन बैल दृष्टीस पडतांच हमीद आपल्या दोस्ताना म्हणाला, " आपल्या गडावर जे शेरखान आणि पलंगखान ह्या नांवाचे गस्तंगीर आले होते ते सांगत होते कीं, प्राचितगडाच्या मुलखांत आम्हांला दोन धिप्पाड बैल दिसले. ते बैल त्या काफीर हिंदूंचे वसु होत, आणि ते काफीर त्या बैलांना देव समजून त्यांची पूजा करतात आणि त्यांना कोणत्याही कामाला लावीत नाहींत. त्या गस्तंगिरानीं वर्णिलेले जे दोन वसु ते हेच असले पाहिजेत. "

त्यावर हमीदचा एक दोस्त महिबूबभाई म्हणाला, " हे हिंदूलोक किती मूर्ख आहेत तरी ! बैलासारख्या उपयुक्त जनावराला ते मोकळे सोडतात आणि त्यांच्याकडून कांहीं काम घेत नाहींत. काय हा मूर्खपणा ! हिंदूलोक हे खरोखरीं जनावरेंच होत ! "

त्यावर बुढाणभाई,—जो अंगानें धिप्पाड होता आणि ज्याला आपल्या शक्तीचा मोठा गर्व वाटत असे,—तो म्हणाला, " हमीदभाई, ते बैल दिसण्यांत धिप्पाड आहेत हें खरें आहे, पण त्यांच्या अंगांत कांहीं शक्ति नाहीं. मी त्या हत्तीसारख्या बैलाची शेपूट खेंचली तर त्याला दहा हात मागें खेचीत आणीन. "

तेव्हां महबूबभाई,—ज्यालाही आपल्या शक्तीची घमेंड होती,—तो म्हणाला, " अरे बुढाणभाई, तूंही त्या बैलासारखा फोपशा आहेस; तुला तो बैल शेपटीनें खेचतां येणार नाहीं हें मी सांगतो. पण मी मात्र त्याला खेचीन खास ! "

तेव्हां हमीद म्हणाला, "गड्यांनो, वाद कशाला करतां ? बुढाणभाई, तूं प्रथम बैलाला खेच. तुला तो खेचता आला नाहीं, तर महबूब त्याला खेचील. जो कोणी त्या बैलाला शेपूट ओढून दहा हात मागें फरपटत आणील, त्याला मी शंभर रुपये बक्षीस देईन. "

ही हमीदनें ठरविलेली योजना सर्वांना पसंत पडली. बुढाणभाई मोठ्या आवेशानें त्या मोठ्या बैलाकडे गेला. तो बैल स्वस्थपणें रवंथ करीत होता. बुढाणनें त्याची शेपूट धरली, आणि अंगात अवसान आणून बैलाला आपल्याकडे खेचूं लागला. परंतु बैल शांतपणें रवंथ करीत उभा होता तसाच होता !

तेव्हां महबूब पुढें होऊन बुढाणला म्हणाला, " तूं शेपूट सोड आणि बाजूला हो. मी त्याला खेचतों. "

असें म्हणून महबूबनें बैलाच्या शेपटीला हात घातला आणि अंगांतील सर्व शक्ति वेचून तो त्याला खेचूं लागला. परंतु बैल जो स्वस्थपणे रवंथ करीत होता तो तसाच राहिला होता !

तेव्हां महबूबच्या मदतीला बुढाण गेला. त्या दोघांनीं आपली सर्व शक्ति ओतली आणि बैलाला मागें [illegible] प्रयत्न केला, पण तो

बैल एक अंगुळभर देखील मागें खेचला गेला नाही. बैल स्वस्थपणे रवंथ करीत होता तसाच होता!

हा सर्व प्रकार होत असतां हमीद आणि त्याचे जोडीदार मुकाट्यानें पहात होते. ते बुढाण आणि महबूब यांना उत्तेजनही देत नव्हते किंवा त्यांची फजीती झाली म्हणून " फज्या! फज्या! " अशा आरोळ्याही मारीत नव्हते. तसें त्यानीं केलें असते तर बैल कदाचित् भिऊन पळाला असता आणि महिबूब आणि बुढाण ह्यांच्या शक्तीची परीक्षा झाली नसती.

असो. महिबूब आणि बुढाण आपली सर्व शक्ति त्या बैलाला खेचण्यात वेचीत होते, आणि हा देखावा पहाण्यांत हमीद आणि त्याचे बाकीचे दोस्त निमग्न झाले होते, इतक्यांत धाकटा वसु,—जो थोरल्या वसूपासून कांहीं अंतरावर होता असें आम्ही पूर्वी म्हटलें होतें,—तो अकस्मात् तेथें आला आणि त्यानें महबूब आणि बुढाण ह्या दोघांना अशी कांहीं जोराची ढुसणी मारली कीं ज्याचें नाव तें! त्या वसूचीं शिंगें,—जीं दाभणासारखी अणकुचीदार होती,—तीं बुढाणच्या आणि महबूबच्या पाठींत खोल शिरली! ती इतकी जोरानें शिरलीं कीं, तीं त्यांच्या पोटांतून बाहेर पडून वीतभर पुढे आली!

इतकें करून त्या धाकटया वसूनें आपल्या मानेला जोराचे दोन तीन हासडे दिले, तेव्हा बुढाण आणि महबूब,—जे एव्हांना गतप्राण झाले होते, ते—जमीनीवर आदळले!

इतका प्रकार होत आहे तों त्या प्रदेशांत चारी दिशांनीं लोक गोळा होऊं लागले; हे धांवत येणारे लोक मोठमोठ्यानें ओरडत होते! कोणी या मुसलमानांना शिव्या देत होते, कोणी भोजपाटलाला बोलावून आणा म्हणत होते, कोणी त्या धाकट्या वसूची तारीफ करीत होते, कोणी थोरल्या बैलाच्या शक्तीची तारीफ करीत होते.

ही हिंदूमंडळी इतका वेळपर्यंत दूर अंतरावर गायी, म्हशी वगैरे राखण्यांत गुंतलेली होती. ती मंडळी ह्या खोडकर मुसलमानांना दिसत नव्हती, परंतु त्या मंडळींपैकीं एका इसमाचें यदृच्छेनें ह्या वसूंकडे लक्ष्य गेलें. त्यानें इतरास सूचना केली; तेणेंकरून ते सर्व हिंदू लोक ओरडत-ओरडत ह्या वसूंकडे येऊं लागले.

ह्या हिंदूसमाजाला आपणाकडे धांवत आणि ओरडत येतांना पाहून हमीद आणि त्याचे दोस्त ह्यांनीं तेथून पोबारा केला ! समरांगणावर लढण्यांत जितकें शौर्य असतें, त्याहून अधिक शौर्य खुबीनें पळ काढण्यांत असतें !

महबूब आणि बुढाण ह्यांच्या प्रेतांची वाट काय लागली ते आम्हाला ठाऊक नाहीं, आम्हाला इतकेंच ठाऊक आहे कीं, ह्या तेथें गोळा झालेल्या हिंदूंनीं प्रथम आपल्या वस्तूंची स्थिति पाहिली. त्याना कांहीं इजा झालेली नाहीं, असें पाहून त्याना आनंद झाला. नंतर घडलेला वृत्तान्त गडकरी-साहेबाच्या कानावर घालण्याकरता भोजपाटील प्रचितगडावर जावयाला निघाला. इतर माणसें आपआपल्या उद्योगाला गेलीं. थोडक्याच वेळांत तो सर्वच प्रदेश पूर्वीसारखा निर्जन झाला. त्या पळपुट्या मुसलमानांचा पाठलाग करावयाला कोणीं माणसें गेलीं नाहींत.

---

## प्रकरण २६ वें.

# दत्ताजी आणि शेवंती.



ज्या काळच्या हकीगती आम्ही ह्या कादंबरींत निवेदीत आहों, त्याकाळीं गणवंतगड हा डोंगरी किल्ला शिवाजीच्या ताब्यांत होता, आणि हा किल्ला ज्या ज्या देशभक्तांच्या साहाय्यानें त्याला जिंकून घेतां आला होता त्यांत मंदारराव ह्या नांवाच्या एका मराठेगड्याचें त्याला विशेषप्रकारें साहाय्य झालें होतें. ह्या प[ा]ग[ा]मु[ळे] शिवाजीनें त्यालाच त्या गडावर गडकरी म्हणून नेमिलेलें होतें.

मंदाररावाचें लग्न झालेले असून त्याच्या अर्धांगीचें नांव मंजरी असें होतें. तिचा भाऊ दत्ताजी,—मंदाररावाचा मेहुणा,—हा अगदींच गरीब असल्याकारणानें तो आपल्या आईसह मंदाररावाच्याच आश्रयाला रहात असे. हा दत्ताजी शिवाजीचा अनुयायी झालेला होता.

याप्रमाणें थोडीशी प्रास्ताविक माहिती वाचकांना देऊन आम्हीं आतां कथासूत्र पुन्हा हातीं घेतों.

हमीदभाईच्या दोस्तांनीं विपडीगांवच्या वसूंना ज्या दिवशीं उपद्रव दिला, त्या दिवशीं म्हणजे आदित्यवारीं दीड प्रहर दिवस चढला होता, अशा समयीं दत्ताजी हा प्रचितगडाचे गडकरी हंबीरराव यांच्याकडे कांहीं कामानिमित्त गेला होता. तेथील काम आटोपून तो परत गणवंतगडावर शिवाजी होता त्याला कामाची पूर्तता कळविण्यासाठीं चालला होता. ह्या दोन गडांमधील निम्याहून अधिक अंतर दत्ताजीनें आक्रामिलें होतें, अशा ठिकाणीं त्याला समोर त्याच्या वाटेवर एक भयंकर दृश्य दिसलें.

एका पंधरासोळा वर्षांच्या वयाच्या मुलींशी दोन मुसलमान पोरगे हिसकाहिसक करीत आहेत, ते दुष्ट तिला पकडूं पहात आहेत, ती मुलगी त्यांना दूर ढकलून देत आहे, ते पुन्हा तिच्याजवळ जाऊन तिचें लुगडे धरून खेचीत आहेत, ती त्यांना शक्य त्याप्रकारें हरकती करीत आहे,त्याच्या थोबाडींत मारून किंवा त्यांच्या छातीवर बुक्क्या मारून किंवा त्यांना दूर ढकलून देऊन त्याच्या पकडीच्या टप्प्यापलीकडे जाऊं पहात आहे, असा भयंकर देखावा दत्ताजीच्या दृष्टीस पडतांच त्यानें आपल्या घोड्याला टाच मारली. घोडा या स्थलाकडे येऊं लागला. दत्ताजीनें आपला भाला अशा नेमसूद रीतीनें एका बदमाषावर रोखून धरला होता कीं, त्या भाल्याचें टोक त्या बदमाषाच्या पाठींत शिरून बरगड्यांतून बाहेर पडले. तो भाला त्या बदमाषाच्या अंगातून उपसून काढण्यांत वेळ न दवडता दत्ताजीनें भाल्याचा हात सोडून दिला, आणि आपल्या कमरेची तरवार विद्युद्वेगानें उपसून काढून तिचा तडाका त्यानें दुसऱ्या बदमाषाच्या मानेवर हाणला ! त्या बदमाषाचे डोकें उडून दूर जाऊन पडलें !

हा दत्ताजीनें जो पराक्रम केला तो वर्णावयाला आम्हांला जितका वेळ लागला त्याच्या शतांश वेळही तो पराक्रम करावयाला त्यास लागला नाहीं !

ज्या विशिष्ट क्षणीं दत्ताजीनें हे दोन मुडदे पाडले, त्या विशिष्ट क्षणीं ते दोन बदमाष पाठमोरे होते. दत्ताजीला ते दिसत होते पण दत्ताजी त्यांना दिसत नव्हता.

त्या अनाथ मुलीची अशारीतीनें सुटका झाली. इतका वेळपर्यंत दत्ताजीचें सारें लक्ष ती अनाथ मुलगी आणि ते दोन बदमाष ह्यांचेच-

कडे होते. आजूबाजूकडे त्याचें लक्ष नव्हतें. परंतु आतां " या अल्ला!" " या अल्ला! " अशा भयसूचक आरोळ्या त्याच्या कानीं पडल्यामुळें त्यानें त्या आरोळ्याच्या दिशेकडे नजर केली तो त्याला काय देखावा दिसला !

सात मुसलमान आपले घोडे भरधाव फेकीत चालले होते ! ते कोण लोक होते, आणि कोठून आलेले होते, आणि ते आतां कोठें जाणार होते हे दत्ताजीला कळण्याजोगें न हतें ! परंतु ते जीव बचाव-ण्यासाठीं पळत होते, इतकें खास !

ते पळून जाणारे मुसलमान कोण होते, हे दत्ताजलि जरी कळण्याजोगें नव्हतें, तरी आमच्या वाचकाना कळविण्याला आमची काही हरकत नाहीं. विपडीगावीं आपले दोन दोस्त गमावून घेतलेला हमीद हा आपल्या बाकीच्या दोस्तासह गणवंतगडाकडे जावयाला निघालेला असतां त्याला वाटेंत ही अनाथ मुलगी येतांना दिसली. तिला पाहातांच त्याच्या मनांत पापवासना उत्पन्न झाली. तिला पकडावयासाठीं त्यानें शंभरशंभर मोहोरांचें आमिष आपल्या दोस्तांना दाखविलें. कोहेअक्ल आणि कोहेदानिष हे दोघे त्या कामासाठीं सिद्ध झाले. ते तिला पकडा-वयासाठीं तिच्याशीं हातझोंबी करूं लागले. ह्या हातझोंबीचा परिणाम काय झाला हें वाचकांना ठाऊकच आहे.

आतां हमीद आणि त्याचे उरलेले दोस्त, ह्यांनीं दत्ताजीवर हल्ला न करतां तेथून पळ कां काढला असें आमचे वाचक आम्हाला विचारतील. त्याचें उत्तर असे कीं, दत्ताजीच्या मागून येणारे पांचपन्नास हिंदू मुषाफर त्याच्या दृष्टीस पडले. आपण दत्ताजीची कंबखती करण्याच्या नादीं लागलों तर ते हिंदू काफीर आपलीच कंबख्ती करतील अशी हमीदला आणि त्याच्या दोस्तांना भीति वाटली, म्हणून त्यांनीं तेथून यःपलाय केलें ! आपल्याहून सामर्थ्यानें अधिक अशा शत्रूपासून आपला बचाव करून घेण्यासाठीं पोबारा करणें, हा शहाणपणा नव्हे असें कोण म्हणेल ?

असो. पळपुट्या बदमाषांच्या पाठीस न लागतां दत्ताजीनें त्या अनाथ मुलीकडे लक्ष्य दिलें. ती घाबलेरल्या स्थितींत होती. तिच्या मुखाचें

आणि तिच्या शरीरबांध्याचें दत्ताजीनें एका दृष्टिनिक्षेपांत निरीक्षण करून टाकलें.

त्या मुलीचें मुख लांबोडया घाटाचें असून तिची शरीरयष्टि सडपातळ पण घाटसूद होती. ती वर्णानें किंचित सांवळी होती. तिचें कपाळ उंच असून अर्धचंद्राकार होतें. तिचीं नेत्रें विशाळ आणि काळींभोर असून त्यांत पावित्र्याचें तेज झळकत होतें. तिची नासिका सरळ पण थोडीशी अपरी होती. तिचे दोन्ही ओठ थोडेसे बोजड होते, पण आंतील दंतपंक्ति स्वच्छ हारीनें होत्या. तिची हनुवटी टोकाकडे पुढें वळलेली होती. तिचीं गात्रें सडपातळ आणि नाजूक होतीं. एकंदरींत ती मुलगी भारी मोहक होती.

ती मुलगी तिच्या पेहेरावावरून हिंदू मराठा जातीची दिसत होती. ती आपलें लुगडें मराठे जातीच्या धाटणीनें नेसलेली होती. हें लुगडें चार लुगडयांचे चारचार वाभाडे एकत्र शिवून त्याची एकंदर लांबी सोळा हात करण्यांत आलेली होती. आठ हात लांबीच्या एका खडकीच्या काळ्या बांडाच्या तुकडयाला दोन हात लांबीचा चंद्रकलेचा एक वाभाडा, तांबडया आलवाणी पातळाचा एक चार हात लांबीचा वाभाडा, आणि दोन हात लांबीचा धोतराचा एक वाभाडा असे चार तुकडे एकाला एक जोडून सोळा हात लांबीचें एक लुगडें ती मुलगी नेसलेली होती. तिच्या दोन्ही मनगटांत काशाचे गोठ असून एकच बांगडी होती. बाकीच्या बांगडया त्या दोन बदमाषांशी हातझोंबी करतांना पिचून जाऊन त्यांचे तुकडे जमीनीवर पसरलेले होते.

ही मुलगी विधात्यानें बरेंच कौशल्य खर्चून घडविलेली होती, तरी त्यानें तिला अत्यंत दरिद्र स्थितींत घातलेलें होतें, हें पाहून दत्ताजीचें हृदय कळवळून आलें.

ही मुलगी त्या दोन बदमाषांशीं स्वसंरक्षणार्थ पुष्कळ वेळ हातझोंबी करीत असल्याकारणानें तिला फार श्रम झाले होते आणि त्यामुळें ती दीर्घ निश्वास सोडीत होती. तिची छाती जोरानें धडधडत होती व विसाव्यासाठीं ती जमिनीवर बसली होती.

तिची ही स्थिति पाहून दत्ताजी ताडादिशीं घोड्यावरून उडी टाकून तिच्या शेजारीं वीरासन घालून बसला. त्यानें तिला आपल्या एका

गुडघ्याचा टेका दिला आणि तिच्याकडे सानुकंप नजरेनें पाहून आश्वासनदायक स्वराने तो तिला म्हणाला, " मुली, सगळे मुसलमान बदमाष पळून गेलेले आहेत. तूं भीति सोड. मी तुझें रक्षण करावयाला पूर्णपणें समर्थ आहे. तूं कोण ? तुझें नांव काय ? तूं कोठें जावयाला निघाली होतीस ? तुझी हरकत नसल्यास मला ही माहिती सांग. तुला जेथें जावयाचें असेल तेथें मी तुला अगोदर पोंचवून नंतर माझ्या कामाला जाईन. "

तेव्हा त्या मुलीनें उत्तर केलें, " भाऊ, तुम्ही जी माहिती मला विचारीत आहा ती द्यावयाला माझी कांहीं हरकत नाहीं. परंतु अगोदर तुमचे उपकार स्मरणे हें माझें कर्तव्य आहे. तुम्ही जिवाची पर्वा न करतां मला त्या बदमाष मुसलमानांच्या हातून सोडविलें हें तुमचें कृत्य देवाच्या घरीं रुजू आहे. "

त्यावर दत्ताजी म्हणाला, " मुली, मी तुला त्या बदमाषांच्या हातून सोडविलें ह्यांत मी कांहीं विशेष केलें असें मला वाटत नाहीं. संकटांत सांपडलेल्या माणसाला मदत करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य जो कोणी करणार नाहीं तो मनुष्य ह्या नावाला लायक नाहीं. बरें तें असो. पण तूं कोण, कोठली, कोठें जावयास निघाली होतीस तें सांगावयाला तुझी हरकत नसल्यास सांग. "

तेव्हां त्या मुलीनें उत्तर दिलें, " भाऊ, माझें नांव शेवंती. मी मराठे जातीची. मी अगदीं हीन, दीन, विपन्न आहे. मला आई नाहीं, बाप नाहीं, भाऊ नाहीं, बहीण नाहीं. मी पोटाचा कांहीं धंदा प्रचितगडावर मिळाल्यास पहावें म्हणून तिकडे जावयाला निघालें होतें, तों तिकडूनच येणाऱ्या ह्या मुसलमान बदमाषांच्या तावडींत सांपडले. प्रचितगडाचा गडकरी हंबीरराव हा म्हातारा माणूस असून मराठे जातीचा आहे. त्याच्या गडावर मला उपद्रव न होतां कांहीं तरी पोटाला मिळेल अशी मला आशा होती. "

याप्रमाणें शेवंती आपली हकीगत सांगत होती तों अंतरावरून येणारे मुषाफर जवळ येऊन ठेपले. त्यांचा नायक दत्ताजी आणि शेवंती ह्यांच्याकडे कांहीं क्षण दृष्टि लावून म्हणाला, "दत्ताजी, ते मुसलमान बदमाष आम्हांला

ह्या मुलीशीं हातझोंबी करीत असलेले दिसले, तेव्हां आम्हीं लगबगीनें इकडे येत होतो, तो इतक्यांत तूं त्या दोघां बदमाषांना यमसदनाला पाठविलेलें आम्हीं पाहिलें आणि बाकीचे सात मुसलममान पळून गेलेलेही आम्हीं पाहिले. म्हणून सर्व गोष्टी सुरळीत चाललेल्या पाहून सावकाशीनें आम्हीं येथें आलों, नाहींतर धांवतच आलो असतों. असो. आता आमची तुला काय मदत पाहिजे आहे ते सांग. आम्हीं तयार आहों. हिंदूंनीं हिंदूंच्या उपयोगीं पडलें पाहिजे. ''

---

## प्रकरण २७ वें.

# हे नवागत कोण होते ?



मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें जे मुषाफर तेथें आले, त्यांच्या नायकानें दत्ताजीला ओळखून त्याला मदत करावयाला आपण तयार आहों असें आश्वासन दिले.

परंतु आमच्या कादंबरीचें कथानक पुढें न चालवितां हे तेथें आलेले मुषाफर कोण होते, आणि दत्ताजीला ते कोणच्या कारणामुळें ओळखीत होते, हें वाचकांना अगोदर कळविणें जरूर आहे.

दत्ताजीशीं जो इसम परिचयाच्या माणसाशीं बोलावें तसें बोलला, तो जातीचा महार असून त्याचें नांव पांडनाक असें होतें, आणि तो स्वयंस्फूर्तीनें शिवाजीचा अनुयायी झालेला होता; त्यानें स्वताच्या खर्चानें एक महारमुलांचें पथक तयार केलें होतें. तो ह्या पथकानिशीं शिवाजीच्या मोहिमीत भाग घेत असे. शिवाजीनें जेव्हां जंगली-जयगड, भैरवगड, गणवंतगड, हे डोंगरी किल्ले मुसलमान गडकऱ्यांच्या ताब्यांतून जिंकून घेऊन ते गड भावीस्वराज्याचे घटक केले, तेव्हां ह्या पांडनाकानें आपल्या महारांच्या पथकानिशीं भारी धाडसाचे पराक्रम केलेले होते. दत्ताजीही शिवाजीचा अनुयायी असल्याकारणानें दत्ताजी आणि पांडनाक यांची चांगलीच ओळख होती. आणि म्हणून पांडनाक हा दत्ताजीशीं परिचिताप्रमाणें बोलावयाला धजला होता. असो.

पांडनाकाचा प्रश्न ऐकून दत्ताजीनें उत्तर दिलें, "पांडनाक, ह्या मुलीशीं तें मुसलमान हातझोंबी करीत होते म्हणून त्यांच्या अपवित्र तावडींतून मी तिला बचावलें. इतक्यांत तूं येथें आलास. ह्या मुलीला मी प्रचितगडास पोंचविणार आहे. तें करण्याच्या कामीं तुमची मला मदत होईल काय ? "

तेव्हां पांडनाकाला उत्तर द्यावयाला अवसर न देतां, शेवंती म्हणाली, " भाऊ, मी प्रचितगडाकडे जावयाला निघालेलीं होतें ही गोष्ट खरी आहे. परंतु प्रचितगडावर माझ्या नात्यागोत्याचें कोणी माणूस नाहीं. मी केवळ पोटाला कांहीं काम मिळालें तर पाहावें म्हणून तिकडे जाणार होतें इतकेंच. मला प्रचितगड सारखाच आणि हिंदूगडकऱ्याच्या अमलाखाली असलेला दुसरा कोणताही गड सारखाच. तुम्हीं आणि हे पांडनाक इकडून " ( हातानें निर्देश करून ) " आलां आहां आणि इकडे" ( हातानें निर्देश करून ) "जात आहां. माझ्यासाठीं तुम्ही परत फिरण्याची कांहीं जरूरी नाहीं. तुम्ही जिकडे जात आहा तिकडे जर एखादा हिंदूगडकऱ्याच्या ताब्यांतील गड असला तर तुमच्या सोबतीनें मी त्या गडाला येईन. "

तेव्हां दत्ताजी म्हणाला, " मी गणवंतगडाला जात आहे. तेथला गडकरी मंदारराव हा माझा मेहुणा आहे. त्याची बायको मंजरी ही माझी सख्खी बहीण. तुला तेथें यावयाचें आहे काय ? "

पांडनाक म्हणाला, " आम्हा सर्वांनाही त्याच गडावर जावयाचें आहे. तेथें [illegible] भेटून आम्ही पुढें वरंचीकडे जाणार आहों. "

तेव्हां शेवंती म्हणाली, " असें जर आहे, तर मलाही गणवंतगडाकडे तुमच्याबरोबर घेऊन चला. त्यांत तुमची गैरसोय न होतां माझी सोय होईल. "

तेव्हां दत्ताजी म्हणाला, " शेवंती, आमची गैरसोय होत असली तरी तुला सुरक्षित ठिकाणीं पोहोंचविल्याशिवाय आम्हीं राहिलों नसतों. जो कोणी शिवाजमहाराजांचा अनुयायी झालेला आहे, त्याचें कर्तव्य दीन, अनाथ आणि विपन्न अशा माणसांना साहाय्य करणें हें आहे.

बरें शेवंती, तूं बस माझ्या घोड्यावर; आम्ही सर्व माणसें तुझ्याबरोबर चालूं. ''

शेवंती म्हणाली, ''छे ! छे ! ही गोष्ट मी कदापि मान्य करणार नाहीं. तुम्ही घोड्याचे मालक, तुम्ही पायानें चालावें, आणि मी तुमच्या घोड्यावर बसावे, ही गोष्ट कदापि होणार नाहीं. तुम्ही मला बदमाषांच्या कचाटींतून सोडविलें, आणि माझ्या जीविताचें आणि पावित्र्याचें रक्षण केलें, हेंच तुमचे उपकार कितीतरी जड आहेत. तुमच्या घोड्यावर मी बसून तुम्हाला पायानें चालावयाला लावून माझ्या डोक्यावरच्या भारांत आणखी भर घालावयाला मी कबूल नाहीं. ''

हें तिचें तडफदार उत्तर ऐकून दत्ताजी चाकित झाला. तो आणखी आग्रह करणार होता. पण तिनें त्याला आग्रह करावयाला संधि मिळूं दिली नाहीं. ती पुढची वाट धरून चालूं लागली.

परंतु शेवंती कांहीं पावलें चालत गेली नाहीं तोंच ती मटाकिनी जमीनीवर बसली; कारण तिचीं पावलें तिच्या ताब्यांत नव्हती. तिच्या मनांत चालण्याची धमक होती, परंतु तिच्या शरीरांत चालण्याची ताकद नव्हती. ती त्या बदमाष मुसलमानांशीं झगडून फार दमली होती. तिच्या अंगांत ताप भरत चालला होता, आणि तिचें मुख तांबूस वर्णाचें होत चाललें होतें. तिच्या नाकांतून उष्ण श्वास बाहेर पडत होते.

ती वाटेंतच मटक्किनी बसलेली पाहून दत्ताजी तिच्यापर्यंत धांवत गेला आणि तिला उठवावयासाठीं त्यानें तिचा हात धरला. त्याला तो हात कढत लागला. तिला ताप भरत आहे असें तत्काळ दत्ताजीच्या लक्ष्यांत आलें. त्यानें तिच्या कपाळाला आणि गालाना हात लावून पाहिला, तों त्याचा अजमास खरा ठरला. तिला श्रमजन्य ताप भरत होता.

तिची अशी अनुकंपनीय दशा पाहून दत्ताजी तिला म्हणाला, '' शेवंती, तुला ताप भरत आहे. आतां संकोच करूं नको. ही संकोच करण्याची वेळ नव्हे. तुला आतां गणवंतगडापर्यंत चालत जातां येणार नाहींच नाहीं. पण तुला घोड्यावर देखील बसतां येणार नाहीं. तुला आम्ही झोळींत घालून नेणार ! तुझी कबूली या गोष्टीला असो किंवा नसो. ''

त्यावर शेवंती म्हणाली, " भाऊ, तुम्ही म्हणतां तें खरें आहे. मला पायानें चालावयाचीही शक्ति नाहीं, किंवा घोड्यावर बसावयाचीही शक्ति नाहीं. चालतांना माझीं पावले लटकीं पडत होतीं, आणि घोड्यावर मी बसलें तर मला आपला तोलही संभाळतां येणार नाहीं. तुम्ही मला न्याल त्या रीतीनें न्या. माझी कबूली आहे. "

असें म्हणून शेवंती जमीनीवर आडवी झाली. तिचे अंग ह्यावेळीं जणों भाजत होतें, आणि तिचें तोंड ताबडें लाल होऊन गेलें होतें.

दत्ताजीनें लागलीच पांडनाकाचें कांबळें मागून घेतलें. तें त्यानें जमीनीवर आथरलें. त्याच्यावर त्या दोघांनीं शेवंतीला अलगत निजविलें; मग उशागताकडच्या कांबळ्याच्या टोकाना त्यांनीं गांठ मारली; मग तशीच गांठ पायगताकडच्या टोकांना दिली. मग त्या दोन गांठींतून भाल्यांच्या काठ्या घालून त्यांनीं शेवंतीला वाहून गणवंतगडाकडे चालविलें. तिच्या सोबतीला पुष्कळ माणसें होतीं. त्यांनीं आळीपाळीने त्या मुलीचें ओझें वाहण्याचें काम केले.

ही मंडळी गणवंतगडाच्या पायथ्याशीं आलीं, तेव्हां दत्ताजी पुढें होऊन गौळवाड्यांतील शिवाजीच्या हेरांच्या झोपडींत गेला. ह्या विशिष्ट समयीं शिवाजी तेथें होता. त्याला शेवंतीसंबंधाची हकीगत सांगून आणि प्राचित-गडावर तो ज्या कामासाठीं शिवाजीच्या आज्ञेनें गेला होता त्या कामाची सफलता सांगून तो शेवटीं म्हणाला, "आबा, ह्या मुलीची मला अगदीं अल्प माहिती आहे. ती मराठाजातीची आहे, तिला आई, बाप, भाऊ, बहीण कोणी नाहीं, ती अविवाहित आहे, ती अत्यंत दरिद्री आहे, आणि प्रामाणिकपणें काम करून पोटाला मिळविण्याला ती कबूल आहे, इतकीच काय ती तिची मला माहिती आहे. ज्यास्ती कांहीं नाहीं. तर मी तिला माझी बहीण मंजी हिच्या हवालीं करतों. ती ह्या तापांतून बरी झाली म्हणजे तिची काय व्यवस्था करावयाची ठरेल त्याप्रमाणें करतां येईल. असें करूं ना आबा ? "

शिवाजीनें उत्तर दिलें, " होय, असें कर. त्यांत कांहीं वावगें नाहीं. आपली सध्यांची मोहीम शेवटाला गेली म्हणजे मग तिची कांहीं तरी आपण तजवीज करूं. "

शिवाजीच्या आज्ञेनें आणि अनुज्ञेनें शेवंतीला गडावर नेण्यांत आलें. तेथें गेल्यावर दत्ताजीनें तिला आपल्या बहिणीच्या हवाली केलें. आणि म्हटलें, " मंजे, ह्या मुलीला बेफाम ताप भरला आहे. तिची शुश्रूषा तूं करण्याची तजवीज कर. ती मराठेजातीची आहे. ती बरी झाल्यावर तिला कांहीं तरी काम दे. "

मंजरीबाईनीं आपल्या भावानें सांगितलेली कामगिरी आनंदानें पथकरली. आपल्या बहिणीचा निरोप घेऊन आणि शेवंतीला आश्वासन देऊन दत्ताजी तेथून बाहेर पडला.

---

## प्रकरण २८ वें.

# दिवाकररावांचा अंत.



—१—

दिवाकररावांची सेवाशुश्रूषा करण्याच्या कामीं भास्कराला मदत करावयाला सर्जेरावांनी आपल्या मुलीला परवानगी दिली, हे वाचकांना ठाऊकच आहे. ह्या परवानगीप्रमाणें आदित्यवारीं सकाळीं पद्मिनी भास्कराकडे आली, आणि भास्कराच्या कामीं त्याला बरोबरीनें मदत करूं लागली.

आजाऱ्याला एकादी मात्रा द्यायवाची असली म्हणजे पद्मिनी घरांतून सहाण आणी, भास्कर मात्रा उगाळी, पद्मिनी तें चाटण चमच्यांत भरी, भास्कर तें चाटण पित्याच्या जिभेला लावी, पद्मिनी आजाऱ्याच्या ओठांना पाण्याचा हात लावी, भास्कर कोरड्या फडक्यानें ओठ पुशी.

दिवाकररावांचे पाय चेपावयाचे असतां भास्कर एका पायापाशीं बसे, आणि पद्मिनी दुसऱ्या पायापाशीं बसे.

दिवाकररावांच्या डोक्यावर पाण्याची घडी ठेवणें, त्यांचें अंग शेकणें, त्यांना जेवूं घालणें, वगैरे कामांत पद्मिनी ही भास्कराच्या मदतीला असे.

पद्मिनी जेवावयासाठीं आणि रात्रींच्या विश्रांतीसाठीं मात्र आपल्या घरीं जात असे. बाकीचा तिचा सर्व वेळ भास्कराच्या घरीं जात असे.

रात्रीं दिवाकररावाच्या सोबतीला भास्कर, मुकुंदराव वैद्य आणि मावशीबाई आळीपाळीनें बसत. त्यामुळें सर्वांना जरूर ती रात्रीची विश्रांति मिळत असे.

वरील क्रमाप्रमाणें दिवाकररावाची सेवाशुश्रूषा चाललेली असतां सोमवारचा दिवस उजाडला. हा दिवस त्याच्या आजारातील आणी-बाणीचा दिवस होता, आणि त्याच्या सेवकांना त्याच्या तापाच्या चढ-उताराकडे विशेषप्रकारें लक्ष्य पुरवावयाचा असा होता. असो.

सोमवारचा दिवस उजाडला. दिवाकररावाचा ताप यत्किंचितही कमी होत नव्हता. उलटपक्षीं तो थोडथोडा वाढतच होता आणि घाम येण्याचें यत्किंचित् लक्षण दिसत नव्हतें. परंतु रोग्याची शुद्धि अढळ राहिली होती. मनुष्य ओळखण्याची त्याची ताकद कमी झाली नव्हती.

त्यांच्या बिछान्याच्या शेजारीं भास्कर आणि मुकुंदराव हे बसलेले होतें. बिछान्याच्या दुसऱ्या बाजूस पद्मिनी आणि मावशी बसल्या होत्या. वैद्याचे उपचार चाललेले होते.

मुदतीच्या तापाचा आजचा दिवस महत्त्वाचा आहे, आणि दुख-ण्याला उतार पडावयाचा असला तर आजपासूनच पडूं लागणार, म्हणून मुकुंदराव आशा आणि निराशा ह्याच्यामध्ये हेलकावें खात होते.

ह्या दुःखाच्या समयीं सर्व माणसे अगदीं स्तब्ध बसलेलीं होतीं.

दिवस जों जो चढत चालला तों तों तापाचा जोर वाढत चालला. दीड प्रहर दिवस होत आला तों दिवाकररावाचीं पावले हळूहळूं गार पडूं लागलीं. त्याच्या हातांचे पंजेही गार पडूं लागले. हा पावलांचा गार-पणा आणि हाताच्या पंज्यांचा गारपणा वरवर चढत चालला. वैद्यबोवा हस्तस्पर्शानें अंगाची उष्णता वारंवार पहात होते.

मध्यान्हाचा समय जवळ येऊं लागला. वैद्यबोवांचें मुख अधिकाधिक निराशाजनक होऊं लागले. वैद्यबोवाच्या मुखाच्या चर्येवरून इतर माण-सांना त्याच्या मनातील विचार कळत होते, परंतु त्यांना स्पष्ट प्रश्न विचारण्याचें धैर्य कोणालाच होत नव्हतें. सर्वांची नजर वैद्यबोवांच्या मुखावर किंवा दिवाकररावाच्या मुखावर खिळलेली होती.

अशा स्थितींत सुमारें एक घटका गेली, तेव्हा दिवाकररावांचे ओठ

हलत असल्याचा सर्वांना भास झाला, आणि नंतर ते ओठ खरोखर हालले आणि त्या ओठांतून अशक्त आवाजानें पण स्पष्ट रातीनें पुढील शब्द बाहेर पडले.

" भास्करबाळा, मी जें तुला सांगितलें तें लक्ष्यात ठेव. माझा आशीर्वाद–देव तुझें भलें करो. राम राम राम राम........."

बिछान्याशेजारीं बसलेल्या चारी माणसांचे चेहेरे,–जे अगोदरच खिन्न होते, ते-आधिकच खिन्न झाले. मुकुंदरावांनीं हाताच्या आणि डोक्यांच्या खुणांनीं दिवाकररावांचा अंत झाल्याचें सर्वांना कळविलें.

सर्वांच्या डोळ्यांना पाणी आलें. पण रडें कोणालाही आलें नाहीं.

मुकुंदरावानीं प्रेताच्या अंगावर उपरणें घातलें. मग हाताच्या खुणांनीं त्यांनीं भास्कर, पद्मिनी, आणि अनुमावशी ह्यांना बाहेर यावयाला सांगितलें. सर्व माणसें बाहेर पडली तेव्हां मुकुंदराव पद्मिनीला म्हणाले, "पद्मिनी तूं दोन दिवस दिवाकररावांची शुश्रूषा केलीस ती देवाच्या घरीं रुजू आहे. तूं आतां घरीं जा. "

नंतर वैद्यबोवा भास्कराला म्हणाले, " भास्कर, झाली गोष्ट ती वाईट झाली, पण तेथें आपला इलाज नाहीं. तथापि मी असें समजतों कीं, तुझे वडील खरोखरीं पुण्यवान् मनुष्य होते ह्यांत शंका नाहीं. कारण आज कार्तिक शुक्लपक्षांतील एकादशीचा दिवस. ही महाएकादशी आणि शिवाय आजचा वार सोमवार, आणि प्राणोत्क्रमण झालें तें मध्यान्हाला. तुझ्या वडिलांना शुभसमयीं मरण आलें. तो खरा पुण्यवान प्राणी. असो. भास्कर, तूं ह्या गांवचा, तरी नांवालाच ह्या गांवचा. तुझे बहुतेक आयुष्य कैंजळगडावर गेलेलें. तुला ह्या गांवाची कांहीं माहिती नाहीं. मला ह्या गांवाची सारी माहिती आहे. दिवाकररावांच्या और्ध्वदैहिकाला लागणारीं माणसें आणि सामग्री मी गांवांत जाऊन घेऊन येतों. तूं तुझ्या वडिलांच्या जवळ बसून रहा. "

असें बोलून मुकुंदराव घराच्या बाहेर पडले.

दिवाकररावांचें और्ध्वदैहिक कृत्य गांवकऱ्यांच्या साहाय्यानें योग्य रीतीनें पार पडलें.

---

—२—

# और्ध्वदैहिकाचे तेरा दिवस.



भास्कराच्या अशौचस्थितीचे दहा दिवस आणि नंतरचे तीन दिवस पद्मिनी दररोज भास्कराला विरंगुळा पडावा म्हणून त्याच्या भेटीला येत असे. ती आली म्हणजे चारपांच घटका भास्कराशीं बोलत बसे. ह्या प्रसंगी त्यांचे अघळपघळ बोलणें होत असे. पद्मिनीचें सगळें आयुष्य कासेगांवांत गेलेलें असल्याकारणानें आणि तिच्या घरांत तीनच माणसें असल्याकारणाने तिचा जीवनवृत्तान्त बहुतेक एकसुरीच होता. परंतु भास्कर हा शिवाजीचा अनुयायी असल्याकारणाने त्याच्या भाषणांत अनेक गोष्टींची मनोरंजक वर्णनें येत. शिवाजीनें कोणते गड कोणच्या हिकमतीनें घेतले, कोणच्या गडावर कोणकोण अधिकारी आहेत, शिवाजींचें स्वराज्यस्थापनेचे धोरण उचलून धरणारे त्याचे किती अनुयायी आहेत, इत्यादि हकीगती ज्या भास्कर पद्मिनीला सांगे, त्या तिला अतिशय मनोरंजक वाटत. ह्या हकीगती ऐकुन पद्मिनीची नजर फार फाकली. महाराष्ट्राची स्थिति हल्लीं किती विपन्न आहे, मुसलमानी रियासत किती अमानुष आहे, वगैरे गोष्टी तिला कळून तिच्याही अंतःकरणांत देशप्रीतिचा अंकुर फुटला.

पद्मिनी जरी पहिल्या पहिल्याने भास्कराच्या मनाला विरंगुळा पडावा म्हणून त्याच्याकडे येत असे, तरी नंतर ती शिवाजीच्या हकीगती ऐकण्यासाठींही येऊं लागली. भास्कराची निवेदनशैली सुबोध असल्याकारणानें आणि शिवाजीच्या संबंधाने बोलताना भास्कराला स्फुरण चढत असल्याकारणाने, श्रोता आणि वक्ता यांची ती मनोहर जोडी जमत असे. त्याला शिवाजीच्या गोष्टी सांगण्यात जितका आनंद वाटत असे, तितकाच तिला त्या ऐकण्यांत आनंद वाटत असे.

असो. पद्मिनी आणि भास्कर याच्या रोजरोज गाठी पडत असल्याकारणानें त्यांचा एकमेकांशीं दृढ परिचय झाला, आणि तीं दोघे

एकमेकांना आवडूं लागलीं. भास्कराच्या घरीं जाण्याची तिला जितकी उत्कंठा वाटे, तितकीच त्याला तिच्या येण्याची वाटे.

पद्मिनी कायावाचामनें पवित्र आहे असें भास्कराला कळून आलें, आणि भास्कर कायावाचामनें पवित्र असून शूर, पराक्रमी, देशभक्त आणि आनंदीवृत्तीचा आहे, असें पद्मिनीला कळून आलें.

ह्या तेरा दिवसांत एकमेकांना एकमेकासंबंधाची पूर्ण माहिती प्राप्त झाली. त्या दोघांमध्यें आडपडदा असा कांहीं राहिला नाहीं. त्याला फक्त एकच अपवाद होता. आपलें लग्न ग्यानबा नावाच्या एका गृहस्थाशीं व्हावयाचे ठरलें आहे, आणि तें मार्गशीर्ष शुक्लप्रतिपदेलाच व्हावयाचे आहे, ही गोष्ट पद्मिनीनें दुःखदायक म्हणून भास्कराला सांगितली नव्हती. आपल्या मोरेकुटुंबाच्या उत्कर्षाची हानि कां आणि कशी झाली ही गोष्ट लाजिरवाणी म्हणून भास्करानें पद्मिनीला सांगितली नव्हती.

दिवाकरराव कार्तिक शुक्ल एकादशीला मरण पावले होते. या दिवशीं सोमवार होता. और्ध्वदैहिकासंबंधाचा समग्र विधि कार्तिक वद्य अष्टमीला संपला. हे तेरा दिवस भास्करानें कशा रीतीनें घालविलें हें आम्हीं संक्षिप्तपणें वाचकांना निवेदिलें. आता चवदाव्या दिवशी भास्कराच्या घरीं जी हकीगत घडली ती सांगावयाची राहिली आहे. परंतु ह्या चवदा दिवसांत अन्यत्र म्हणजे दातेगड इत्यादि ठिकाणीं ज्या हकीगती घडल्या, त्या सांगणें जरूर आहे. म्हणून आम्ही कासेगांवची हकीगत कांही वेळ बंद ठेवून वाचकांना दातेगडावर घेऊन जातों.

---

## प्रकरण २९ वें.

# बादशाहाचा लेखी हुकूम.



वाचकाना आतां आम्ही दातेगडावरील सदर कचेरींत घेऊन जाणार आहों.

गडकरी आणि त्याचा सेनापति हे दोघेजण, शिवाजीविरुद्ध जी मोहीम करावयाची होती, तिची वाटाघाट करावयाला शनिवारीं तिसऱ्या प्रहरीं सदर-

कचेरींत बसले होते, हे आम्ही वाचकाना प्रकरण तेवीसमध्यें सांगितलें आहे. विजापुरच्या बादशहाकडून लेखी हुकूम येईतोंपर्यंत त्या मोहिमीची पूर्व तयारी कशी करावयाची हें त्या दोघांनीं ठरविलें, आणि ह्या तयारीचा जो भाग सेनापतीकडे होता, तो पार पाडावयाच्या कामाला मी तावड-तोब सुरवात करतों असें म्हणून तो येथून परत आपल्या घरीं आला, हेंही आम्हीं आमच्या वाचकांना त्याच प्रकरणीं सांगितलें आहे.

गडकरी आणि सेनापति ह्या दोघात वर उल्लेखिलेली वाटाघाट झाल्यानंतर तीन दिवसांनीं म्हणजे मंगळवारीं तिसऱ्या प्रहराच्या अगोदर गडकरीसाहेबानीं आपल्या सेनापतीला निरोप पाठवून बोलावून आण-विलें. सेनापती यथास्थानीं बसल्यावर दावूद त्याला म्हणाला, " इलाही-बक्षसाहेब, आपण दोघानीं मोहिमीची पूर्वतयारी म्हणून काहीं गोष्टी करावयाच्या ठरविल्या होत्या. माझ्याकडे पूर्वतयारीचा जो भाग आला होता तो मी कसा सुरू केला आहे हें तुम्हाला सांगतों; मग तुमच्याकडे आलेला भाग तुम्ही कसा सुरू केला आहे हें मला सांगा. "

इलाहीबक्ष म्हणाला, " होय, तुम्ही गेल्या तीन दिवसात काय केलें तें सागा. मग मी काय केलें तें तुम्हाला सागेन. "

यानंतर गडकरी आणि सेनापति ह्या दोघानीं गेल्या तीन दिवसात आपण काय केलें आणि काय काय करावयाचें ठरलें आहे, हें एकमेकांना सांगितलें. मोहिमीची पूर्वतयारी व्हावी तशी लवकर होऊं शकेल असें दोघांच्या मतानें ठरलें. मग गडकरी म्हणाला, " इलाहीबक्षसाहेब, आपल्याकडून जी तयारी व्हावयाची ती उत्तमतऱ्हेनें चालली आहे. माझा हमीदबाळ परत यावयाचा राहिला आहे, इतकाच काय तो आपल्या पूर्वतयारींत उणेपणा आहे. परंतु तो लवकरच येईल असें मला वाटत आहे. परंतु तो नाहीं आला तरी आपलें कांहीं अडेल असें वाटत नाहीं. खुद्द ह्या आपल्या दातेगडाच्या संरक्षणाचें काम आपण तुमचा भाऊ आणि हमीदबाळ ह्याच्याकडे सोपविणार होतों, परंतु हमीदबाळ जरी त्यावेळीं हजर नसला तरी एकटा तुमचा भाऊ ह्या गडाचें संरक्षण करूं शकेल. "

इलाहीबक्ष म्हणाला, " अलबत करूं शकेल. हा गड अत्यंत भक्कम आहे. गडाचे दरवाजे बंद करून घेतले म्हणजे झालें. बाहेरचा हल्ला

ह्या गडावर येणें शक्यच नाहीं. म्हणून मी म्हणतों कीं, तुमचा मुलगा त्यावेळीं येथें हजर नसला तरी काहीं चिंता नाहीं. ''

दावूद म्हणाला, " तुम्ही म्हणता तें खरें आहे. आपल्या मोहिमीच्यावेळीं तो कोठेंही असला तरी हरकत नाहीं. तो ह्या गडांत असला तरी उत्तम, बाहेर कोठेंही असला तरी उत्तमच आहे. तो बाहेरचीं सर्व धोरणें संभाळील. तो शूर आहे, चतुर आहे, धोरणी आहे, प्रसंगवधानी आहे, आणि गोडबोल्या आहे. गडाच्या बाहेर राहूनच तो कदाचित् आपणाला ज्यास्तीं मदत करूं शकेल. सर्व काहीं ठीक आहे. आता उशीर काय तो बादशहाच्या लेखी हुकुमाचा. अझून कसा बरें तो लेखी हुकूम येत नाहीं? एव्हांना तो यावयाला पाहिजे होता. ''

तेव्हां इलाहीबक्ष म्हणाला, गुलाबखान येथून गेले शुक्रवारीं. ते गेल्याला आज " ( बोटें घालून ) " शनिवार, आदित्यवार, सोमवार, आणि आज मंगळवार, आज चवथा दिवस. चार दिवसांत गुलाबखान विजापुरास पोहोंचून तेथून बादशहांचा लेखी हुकूम आपल्याकडे यावयाला काहीं हरकत नाही. ''

तेव्हां गडकरी म्हणाला, " दोन दिवस गुलाबखानाना जावयाला आणि दोन दिवस लेखी हुकूम यावयाला बस्स आहेत. एव्हांना विजापुरचा जासुद यावयाला पाहिजे होता....''

हें दावूदचें वाक्य अर्धवटच उच्चारलें गेलें. कारण, तेथे गडकरीसाहेबांचा खिजमतगार लगबगीने येऊन त्यांना मुजरा करून परवानगीची वाट पहात उभा राहिला. त्याला दावूद म्हणाला, " कायरे अबदुल्ला, काय काम आहे ? ''

अबदुल्ला म्हणाला, " खाविंदांनी माफ करावें. दाराशीं विजापुराहून आलेला एक स्वार उभा आहे. तो खाविंदांची मुलाखत ताबडतोब झाली पाहिजे असें म्हणत आहे. खाविंदांचा हुकूम होईल त्याप्रमाणें हा बंदा करील. ''

अबदुल्लाच्या तोंडचें हे शब्द ऐकतांच गडकरी आणि त्याचा सेनापति हे दोघे एकमेकांकडे सार्थ नजरेनें पाहून हंसले. विजापुराहून येणार

असलेल्या ज्या स्वाराची ते दोघेजण वाट पहात होते, तो हाच स्वार असला पाहिजे, असा त्याचा ग्रह झाला. असो.

अबदुल्लानें सांगितलेली ही वर्दी मिळताच गडकरी त्याला म्हणाला, " त्या स्वाराला एकदम घेऊन ये. "

ह्या हुकमाप्रमाणें अबदुल्ला त्या दिवाणखान्यातून बाहेर पडला. तो त्या विजापुराहून आलेल्या स्वाराला घेऊन आत आला. ह्या स्वारानें गडकऱ्याला तीन वेळ मुजरा करून आणि एक थैली पुढें करून म्हटलें, " ही थैली हुजूरनीं आपणाला द्यावी असें मला सांगितलें आहे. "

असें म्हणून त्या स्वारानें बरोबर आणलेली थैली गडकऱ्याला सादर केली. ती थैली घेऊन गडकऱ्यानें स्वाराला विचारलें, " हुजूरनीं याचा जबाब मागितला आहे काय ? "

स्वारानें उत्तर दिले, " हुजूरनीं ह्याचा जबाब मागितलेला नाहीं. परंतु आपण जर कांहीं जबाब दिला, तर तो घेऊन यावा असा मला हुजुरचा हुकूम आहे. "

त्यावर गडकरी म्हणाला, " आच्छा. आम्ही ही थैली खोलून तींतील पत्र वाचून पाहूं आणि जबाब देऊं. तुमचें नांव काय ? "

स्वारानें उत्तर दिलें " हा बुऱ्हाणअल्ली खाविंदांच्या पायाचा बंदा गुलाम आहे. "

त्यावर गडकरी म्हणाला, " बरें, बुऱ्हाणअल्ली, आम्ही हें हुजूरचें पत्र वाचून त्याला काय जबाब द्यावयाचा तो देऊं. तोंपर्यंत तुम्ही ह्या गडावर राहा. "

असें स्वाराला सांगून गडकरी आबदुल्लाला म्हणाला, " आबदुल्ला, तूं पोतनीससाहेबांना भेटून ह्या स्वाराच्या खाण्यापिण्याची, निजण्याबसण्याची सोय करून द्यावयाला सांग. " नंतर त्या स्वाराकडे पाहून गडकरी त्याला म्हणाला, " तुम्हीं जा आबदुल्लाबरोबर. "

तो स्वार आबदुल्लाबरोबर रवाना होतांच गडकऱ्यानें ती विजापुराहून आलेली थैली खोलली आणि तींतील पत्र साग्र वाचलें. नंतर मंदस्मितपूर्वक तो आपल्या सेनापतीला म्हणाला, " बादशहांचें असें म्हणणें आहे कीं, शिवाजीचा आलीकडे फार उपद्रव होऊं लागला आहे. त्याच्या-

विरुद्ध रोज रोज तकरारी आमच्याकडे येत आहेत. आज हा गड घेतला, उद्या तो गड घेतला, आज ह्या गावावर दरवडा घातला, उद्या त्या गावावर घातला अशा रोज रोज तकरारी आमच्या कानावर येत आहेत. यासाठीं ह्या शिवाजीचें बंड तावडतोब मोडले पाहिजे. तुम्हीं एक महिन्यानंतर शिवाजीवर मोहीम ·· ··ˆ ।ः'· आहा, असें आम्हांला गुलाबखान यानीं सांगितलें. परंतु आमचा असा हुकूम आहे कीं आपण एक महिनादेखील दिरंगाई करूं नये. तावडतोब—म्हणजे पधरा दिवसांत—म्हणजे अमावास्येच्या अगोदरच—शिवाजीवर मोहीम सुरू करावी. आपले सेनापति इलाहीबक्ष हे आपणाप्रमाणेंच शूर आणि पराक्रमी आहेत. तुम्हीं दोघांनीं दोन दिशांनीं शिवाजीचे गड जिंकीत जिंकीत जावें आणि प्रत्येक गडावर एक एक तात्पुरता गडकरी नेमावा. कायम गडकऱ्याची नेमणूक आम्हीं मागाहून करूं. तुमचा दांतेगड मजबूद आहे. तुम्हीं दोघेजण निम्या निम्या सैन्यानिशीं बाहेर पडला, तरी मागें आपल्या गडाचें रक्षण कसें होईल, याची काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. दोनशे शिपायी ह्या गडाचें रक्षण करावयाला पुरे होतील. शिवाजीची दरवडेखोर टोळी तुम्हीं दोघांनीं नेस्तनाबूद केल्याबरोबर तुम्हांला आम्हीं हुजूरच्या सैन्याच्या एका तुकडीचे सेनापति नेमूं आणि इलाहीबक्ष यांना दांतेगडाचे गडकरी नेमूं. इतका मजकूर हुजूरच्या पत्रात असून पुढें ते म्हणतात कीं तुमच्या उपयोगासाठीं तीन हजार तरवारी, शंभर बंदुका आणि एक पोतें मोहोरा आम्हीं पाठवीत आहों. त्या वरंचीच्या वाटेनें येऊन आठदहा दिवसांनीं तुमच्या गडावर येऊन पोंचतील. ह्या गाड्याच्याबरोबर आम्हीं शंभर सशस्त्र शिपाई दिले आहेत. असा मजकूर ह्या हुजूरच्या पत्रांत आहे. हे पहा ते पत्र."

असें म्हणून गडकऱ्यानें ते पत्र आपल्या सेनापतीच्या हातात दिलें. सेनापतीनें तें पत्र साग्र वाचून तें परत गडकरीसाहेबाच्या हातांत दिलें आणि म्हटलें, "शिवाजीचें बंड तावडतोब मोडले पाहिजे असें हुजूरना वाटत आहे, हे ह्या पत्रावरून सिद्ध होत आहे. शिवाय आपण दोघे हे बंड मोडून टाकूं, असा हुजूरना आपणाबद्दल भरंवसा वाटत आहे. आणि आपण युद्धसामग्रीसाठीं किंवा पैशासाठीं अडून बसूं नये म्हणून ते तर-

वारी, बंदुका आणि पैसा पाठवीत आहेत. तसेंच आपण शिवाजीचें बंड मोडलें तर आपणाला ते योग्य बक्षिशीही देणार आहेत. ''

गडकरी म्हणाला, " तर मग आपलें असेंच ठरलें ना ? कीं आपण आजपासून पंधराव्या दिवशी ह्या मोहिमीवर निघावयाचें ? ''

इलाहीबक्ष म्हणाला, " तोंपर्यंत आपण सैन्याची मोजदाद, हत्यारा-पात्यारांची जुळवाजुळव, माणसांची निवड वगैरे गोष्टी करावयाच्या. ''

गडकरी म्हणाला, " होय. आणि हा बेत आपण पट्कर्णी होऊं देऊं नये. तुम्ही आपल्या भावाला आणि दुसऱ्या तुमच्या भरंवशाच्या माणसाना मात्र सांगा. ''

सेनापति म्हणाला, " आलबत आलबत ! बरें आता मी जाऊं ? ''

गडकरी म्हणाला, " मी आपल्या मुलाला आज परत बोलावण्यासाठी आणखी दुसरे स्वार दवडतो. ''

याप्रमाणें गडकरी आणि सेनापति ह्यांचें खलबत होऊन ही बैठक आटोपली. सेनापति आपल्या वाड्याकडे परत यावयासाठीं तेथून उठला.

---

## प्रकरण ३० वें.

# सेनापति आणि त्याची पत्नी.



मागील प्रकरणात सांगितल्याप्रमाणें दातेगडाचा सेनापति इलाहीबक्ष हा गडकऱ्याचा निरोप घेऊन पुढील कामांच्या तजवीजीसाठीं आपल्या स्वताच्या घरीं आला. तो प्रथम आपल्या दिवाणखान्यांत गेला. तेथें दरबारी पोशाख अंगावरून उतरून साधा पेहेराव पेहेरून तो आपल्या पत्नीच्या महालाकडे निघाला. आपणाला मोहिमीवर जाण्याची आणि पराक्रम करून दाखवून कीर्ति संपादण्याची संधि आली आहे व ह्या मोहिमीवरून परत आल्याबरोबर आपण ह्या दातेगडाचा गडकरी होण्याचें निश्चित झालें आहे, हें आनंददायक वर्तमान पत्नीला कळविण्याला तो उत्कंठित झालेला होता. लवकरच तो तिच्या महालांत आला.

इलाहीबक्ष ह्याचें आपल्या बायकोवर प्रेम होतें; तसें तिचेंही त्याच्यावर प्रेम होतें. तीं दोघेजण एकमेकांपासून कोणतीही गोष्ट चोरून ठेवीत नसत.

एका भव्य आणि शृंगारलेल्या दिवाणखान्यामध्यें एका मंचकावर लतीफा ही बसलेली होती. लतीफा ही सुमारें तीस वर्षांची होती. तिचें तारुण्यांतील टवटवीत गुलाबपुष्पाप्रमाणे नगमुभणारें सौंदर्य जरी बरेंच कमी झालें होतें तरीही तिची अद्यापि सुंदर स्त्रियांत गणना करतां आली असती. तिच्या चर्येवर आता एकप्रकारचा प्रौढपणा आलेला असून पूर्वी चंचलपणें चमकणाऱ्या डोळ्यांतही सौम्यपणाची छटा दृग्गोचर होत असे.

तिची मुद्रा पूर्ण स्वाभिमानयुक्त असून तिचा उच्च दर्जा तिच्या मुद्रेवरूनही सहज ओळखतां आला असता. लतीफेचे सर्वच अवयव रेखीव होतें. तिचें भव्य कपाळ, सरळ नासिका, सुंदर काळेभोर डोळे, त्यावर बारीक धनुष्याकृति भिवया आणि लाल ओष्ठद्वय हे सर्व तिच्या गौरवर्ण तेजस्वी मुद्रेंत सौंदर्याची जोड आणीत. पण पूर्वीचा मोहकपणा लतीफेच्या सौंदर्यात आतां फारसा राहिला नव्हता. तिच्या चर्येवर प्रौढपणा आला होता.

लतीफा मंचकावर एका तक्क्याला टेंकून व पाय पलंगाखालीं सोडून बसली होती. तिचा बांधा सडपातळ असून आतां तिनें घेतलेलें सुखासन नैसर्गिकरित्याच मनोहर होतें. ती यावेळीं रेशमानें एका मखमालीच्या तुकड्यावर एक सुंदर देखावा भरीत होती. तो तुकडा दोन हात लांब व दोन हात रुंद होता. त्यावरील बहुतेक देखावा भरून झालेला होता. दाट झाडींत एक सरोवर दाखविलें असून त्या सरोवरांत कमळें व दोनतीन हंसही काढले होते. लतीफा पांढऱ्या रेशमानें एक हंस भरीत होती.

आपली परिचित मुकी लतीफेजवळ बसून तिचें काम लक्षपूर्वक पहात होती. एकादा टाका चुकला तर ती लगेच खुणेनें लतीफेला तसें कळवी. बरोबर काम होत असल्यास उत्तेजनपरमुद्रेनें व कौतुकानें ती लतीफेकडे पाही. त्या पहाण्यानें लतीफेला आनंद वाटून उत्तेजन येई व तिचें काम अधिकच सफाईनें व जलदीनें होऊं लागे.

भरतकाम करीत बसलेल्या ह्या दोन स्त्रियांकडे दृष्टि वळवून इलाहीबक्ष म्हणाला, " लिंबे,–( ह्या लाडक्या नावानें तो तिला प्रेमानें एकांतांत संबोधीत असे )–तुम्हीं हा कसला देखावा करीत आहां ? "

पतीला पाहातांच लतीफा बसल्या जागेवरून झटदिशीं उठून जमीनीवर उभी राहिली आणि चार पावलें त्याच्याकडे चालत गेली. तिची मुकी वस्ताद पलंगावरून उठून तेथेंच जमीनीवर उभी राहून ह्या पतिपत्नींकडे पाहात राहिली.

सेनापतीनें आपल्या पत्नीला प्रेमळस्वरानें आणि मंदस्मितपूर्वक विचारलें, " लिंबे, तुम्हीं हा कसला देखावा करीत आहां ? "

लतीफेनें मंदस्मितांनें अधिक सुंदर दिसणारे नेत्र पतीच्या मुखावर निर्विष्ट करून उत्तर दिलें, " आम्ही तो एका बागेचा देखावा तयार करीत आहों. तें आमचें करमणुकीच्या वेळचें ठरलेलें एक काम आहे. पण आपण ह्या वेळीं इकडे कसे ? "

सेनापति म्हणाला, " तुला मी एक अतिशय आनंदाची बातमी सांगावयासाठीं आलों आहें. पण ही तुझी वस्ताद " (मुलीकडे पाहून) " अशी कितीवेळ उभी राहाणार ? तिला त्या पलीकडच्या पलंगावर भरितकाम करीत बसूं दे आणि आपण ह्या पलंगावर बसून गप्पागोष्टी करूं. "

" होय " असें पतीला उत्तर देऊन लतीफा त्या मुकीजवळ गेली व तिला तिनें हाताच्या खुणांनीं आपलें मनोगत कळविलें. " तूं त्या पलंगावर बसून ह्या झाडाचीं पानें होतील तितकीं भर. मी रिकामी झाले म्हणजे त्या झाडाचीं फुलें भरीन. " याप्रमाणें लतीफेनें त्या मुकीला सांगतांच ती त्या निर्दिष्ट केलेल्या पलंगावर बसली आणि धनीनिनें सांगितलेले काम करूं लागली.

इतकें झाल्यावर लतीफा आपल्या पतीच्या शेजारीं पलंगावर बसली आणि त्याला म्हणाली, " अतिशय आनंदाची बातमी कोणची ती ऐकावयाला मी उत्सुक आहे. सांगा ! "

त्यावर इलाहीबक्ष म्हणाला, " आज मला गडकरीसाहेबानीं मुद्दाम एक हुजऱ्या पाठवून मुलाखतीला बोलाविलें होतें. "

लतीफा,—“ कशासाठीं ? ”

सेनापति म्हणाला, “ ऐक. हल्लीं या मुलखात शिवाजी ह्या नांवाचा एक बंडखोर भारी उपद्रव करीत सुटला आहे. ”

लतीफेने विचारलें, “ शिवाजी हा कोण आहे आणि तो कोणच्या रीतिनें कोणाला उपद्रव करीत असतो ? ”

सेनापतीनें उत्तर दिलें, “ मला तरी त्या शिवाजीची कांहीं तपशीलवार माहिती आहे असें नाहीं. माझी बातमी केवळ ऐकीव आहे. पण जी माहिती आहे ती तुला सांगतों. शिवाजी हा एक सतराआठरा वर्षांचा हिंदू पोरगा आहे. त्याने पाचसातशे गावगुंड आपल्या भोंवतीं गोळा केले आहेत. हीं सर्व पोरें एकजुटीनें गावांवर हल्ले करतात, श्रीमंत लोकाना लुटतात. हे गावगुंड बादशहाच्या गडावर हल्ले करतात, तेथील शिबंदीला आणि गडकऱ्याला हाकलून देऊन किंवा ठार मारून ते गड आपल्या ताब्यात घेतात, आणि तेथें हिंदू गडकरी नेमतात. अशारीतीनें ह्या दरवडेखोर टोळीनें दहा बारा गड घेतले आहेत. भोपाळगड, केंजळगड, जंगली जयगड, गणवंत गड वगैरे दहाबारा गड त्यानीं जिंकून घेतले आहेत. ही आपल्या बादशहाच्या राज्याची हानि होय. ”

लतीफेनें विचारलें, “ ह्या बंडखोरांचा कांहीं बंदोबस्त आपल्या बादशहानीं अझून कांहीं केला नाही काय ? ”

इलाहीबक्ष म्हणाला, “आजपर्यंत आपल्या बादशहानीं त्या बंडखोरांची उपेक्षा केली. घोणीचे दहापाच पाय तुटल्यानें ती कांहीं लंगडी होत नाहीं. त्याप्रमाणे बादशहाच्या राज्यातील दहापांच गड गेल्यानें त्याचें राज्य काहीं कमजोर होतं असें नाहीं. पण तो पुढें कदाचित् ज्यास्तीज्यास्तीच उपद्रव करीत सुटेल म्हणून त्याचा आतांच बंदोबस्त करून टाकावा असें आपल्या बादशहांनीं ठरविलें आहे. ”

लतीफा म्हणाली, “ हा त्याचा विचार फार उत्तम आहे. बरें, पुढें ? ”

इलाहीबक्ष म्हणाला, “ दोनतीन दिवसामागें येथें गुलाबखान म्हणून एक विजापुरच्या दरबारचा सरदार आला होता. ”

लतीफा म्हणाली, “ होय. तो कशासाठीं आला होता ? ”

इलाहीबक्ष म्हणाला, “ शिवाजीचा बंदोबस्त करण्याचें तुम्ही पथ-

करतां काय, असें बादशहानें आपल्या गडकऱ्यांना गुलाबखानाच्या मुखानें विचारलें. आपल्या गडकरीसाहेबांनीं तें काम पथकरलें, पण महिन्याची मुदत मागून घेतली. आज पुन्हा बादशहाकडून एक जासूद आला आहे. ह्या जासुदानें आपल्या गडकरीसाहेबांना एक पत्र आणलें आहे. त्यांत बादशहांनी शिवाजीविरुद्ध आताच्या आत्ताच मोहीम सुरू करा, म्हणून हुकूम केला आहे."

लतीफा म्हणाली, "तुम्ही दोघानी काय बेत ठरविले?"

सेनापति म्हणाला, "बादशहांच्या हुकमाप्रमाणें शिवाजीविरुद्ध आतांच्या आताच मोहीम सुरू करावयाची असें आमचें ठरलें. आताच्या आतांच म्हणजे पंधराच दिवसानीं,—अमावास्येच्या पूर्वी तीन चार दिवस. ह्या मधल्या पंधरा दिवसाच्या अवधींत आम्ही आपल्या सैन्याची आणि हत्यारापात्याराची जुळवाजुळव करणार आहों."

लतीफा म्हणाली, "होय. इतके दिवस तयारीला पाहिजेतच."

सेनापति म्हणाला, "बादशहाना हे शिवाजीचें बंड मोडून टाकण्याची इतकी घाई झाली आहे कीं, त्यानीं आमच्या उपयोगासाठीं तीन हजार तरवारी, शंभर बंदुका आणि एक पोते मोहोरा वरचीच्या वाटेनें आमच्याकडे रवाना देखील करून दिल्या. ह्या गाड्या दहा दिवसानीं आपल्या ह्या गडावर येऊन दाखल होतील. ह्या गाड्याच्याबरोबर शंभर सशस्त्र शिपाई बादशहांनीं दिले आहेत."

लतीफा म्हणाली, "आतां तुम्हाला पराक्रम करावयाची उत्तम संधी आली आहे."

इलाहीबक्ष म्हणाला, "होय; मी या गडावर कैक वर्षे निरुद्योगी बसलों आहे. ह्या गडावर राहण्याचा मला अगदीं कंटाळा येऊन गेला होता, म्हणून मीं येथली नोकरी सोडून विजापुरास जाऊन राहण्याचा निश्चय केला होता. पण आता मला पराक्रम करून कीर्ति मिळविण्याची संधी आहे. हीच आनंदाची बातमी तुला सांगावयासाठीं ह्यावेळीं तुझ्याकडे आलों आहे."

लतीफा म्हणाली, "ही खरोखरीच आनंदाची बातमी होय. बरें, तुम्ही एकटेंच ह्या मोहिमीवर निघणार काय?"

सेनापति म्हणाला, " नाहीं. दीडहजार शिपाई घेऊन खुद्द गडकरी-साहेब गणवंतगड आणि त्याच्या लगतचे दुसरे गड जिंकून घ्यावयाला निघणार आहेत, आणि मी प्रचितगड आणि त्याच्या लगतचे गड जिंकावयाला निघणार आहे. मजबरोबर मी दीडहजार शिपाई घेणार आहे. "

लतीफा म्हणाली, "ह्या मोहिमींत तुम्हाला खास कीर्ति प्राप्त होईल."

सेनापति म्हणाला, " लिंबे, नुस्ती कीर्तीच नाहीं मिळणार, तर मी ह्या दांतेगडाचा गडकरी होईन. जी मानाची जागा इतके दिवस मला पाहिजे होती, ती जागा बादशहा मला बहाल करणार आहेत. "

लतीफा म्हणाली, " आणि दावूदसाहेबांना ? "

सेनापति म्हणाला, " हुजूरच्या फौजेच्या एका तुकडीचे सेनापति आपले दावूदसाहेब केले जातील. पण लिंबे, दावूदसाहेबांना कोणतीही बढतीची जागा मिळेना कां ? मी ह्या दांतेगडाचा गडकरी होणार, इतकें खास ! आहे कीं नाहीं ही आनंदाची खबर ?"

लतीफा म्हणाली, " आलबत आहे, आलबत आहे. तुम्ही ह्या गडाचे गडकरी झाला म्हणजे मीही अनायासें गडकरीण होईन. पण मी असें विचारतें कीं, तुम्ही आणि दावूदभाई दीड-दीड हजार शिपाई घेऊन दोन दिशांनीं मोहिमीवर गेला म्हणजे तुमच्या पाठीमागें ह्या गडाचें रक्षण कोण करील ?"

इलाहीबक्ष म्हणाला, " बंडखोरांची संख्या फार फार म्हटली तरी हजाराच्या वर असणें शक्य नाहीं. ह्या बंडखोरांना आम्हीं दोघांनीं दोन बाजूंनीं गुंतवून ठेविलें, म्हणजे ह्या गडावर हल्ला करावयाला त्यांच्यापैकीं कोणीही येऊं शकणार नाहीं. घटकाभर आपण असें समजलों कीं बंडखोरांनीं ह्या गडावर हल्ला केला, तरी हा गड इतका मजबूद आहे कीं पन्नास हजार सशस्त्र शिपायांनीं जरी ह्याचेवर हल्ला केला, तरी त्यांचे प्रयत्न निष्फळ ठरतील. असो. तरी पण आम्ही ह्या गडाच्या संरक्षणार्थ दोनशें शिपायी खुदाबक्ष आणि हमीदभाई यांच्या हाताखालीं ठेवून जाणार आहों."

लतीफा म्हणाली, " पण हमीदभाई तर येथें नाहींत. "

इलाहीबक्ष म्हणाला, "त्याला परत बोलवावयासाठीं गडकरीसाहेबांनीं दोन जासूद रवाना केले आहेत. मोहिमीच्या अगोदरच तो येथें येऊन

पोहोंचेल. परंतु तो परत नाहीं आला तरी हरकत नाहीं. आणि तो लुडबुडावयाला न आला तर एका अर्थानें ते उत्तमच होईल. कारण तो पोऱ्या हलकट, बढाईखोर, हेकेखोर, पराक्रमशून्य, वात्रट, हिंदू मुलींच्या वाटेस जाणारा, असा आहे. तो न आला तरच बरा. त्याची माझ्या भावाला अडगळच होईल. बापानें त्याला उगीच शेफारून ठेवला आहे झालें. असो. खुदाबक्ष आणि हमीदभाई ह्यांच्या हाताखालीं दोनशें शिपायी ह्या गडाच्या रक्षणार्थ ठेवून आम्हीं गडाच्या बाहेर पडणार आहों. आमच्या पश्चात् ह्या गडाला बिलकूल भीति नाहीं. आम्हीं अमावास्येच्या आत त्या बंडखोर शिवाजीच्या ताब्यांतील सर्व गड जिंकून घेऊन विजयशाली होऊन येऊं. तुला जी ही मी आनंदाची खबर सांगितली ती खुदाबक्ष ह्याला आतां सांगावयाला मी जातों, आणि त्याला मी कांहीं सूचनाही करणार आहे."

इतकें लतीफेला सांगून नंतर इलाहीबक्ष पलीकडच्या पलंगावर बसलेल्या मुकीच्या कामाकडे कांहीं वेळ कुतूहलपूर्वक नजर स्थिरावून म्हणाला, "लिंबे, ह्या मुकीची मला दया येते. बिचारी सुंदर आहे, मोहक आहे, कशीद्यांत आणि भरीतकामांत कुशल आहे, प्रामाणिक आहे, परंतु ती मुकी आणि बहिरी आहे! केवढें मोठें हें दुर्दैव! तूं तिला जें भरतकाम करावयाला सांगितलें आहेस तें करण्यांत ती अगदीं गढून गेली आहे. तिनें इतक्या वेळांत एकदा देखील वर डोकें केलें नाहीं! बरें लिंबे, मी आता जाऊं? संध्याकाळ होत आलीच. पण सूर्याचीं उन्हें अद्यापि आहेत. जातों."

असें म्हणून इलाहीबक्ष तेथून निघून गेला. तो गेल्यावर लतीफा त्या मुकीकडे गेली आणि तिनें ह्या अवधींत जें काम केलें होतें, तें लक्ष्यपूर्वक पाहून तिनें समाधान व्यक्त केलें. मग लतीफेनें खुणांनीं तिला सुचविलें कीं आतां संध्याकाळ होत आली आहे, आतां काम बंद करावें. मुकीला लतीफेचा आशय समजला. तिनें भरीतकामाचें फडकें नीट घडी करून ठेवून दिलें. नंतर रेशीम, सुया, दोरे वगैरे भरीतकामाचीं उपकरणें तिनें नीट व्यवस्थेनें एका पेटींत ठेवून दिलीं. नंतर

एका विशिष्ट रंगाची लड हातात घेऊन ती आपल्या यजमानीण-बाईला दाखवून खुणांनीं म्हणाली, " आपल्या भरीतकामाला पुरण्याइतकें ह्या रंगाचें रेशीम आपल्याजवळ नाहीं. तें त्या गस्तंगिराचेपासून विकत आणलें पाहिजे. "

लतीफेला ह्या मुकीचा अर्थ कळला. तिनें लगेच मुकीला एक सोन्याचें नाणें दिलें, आणि गस्तांगिराकडून त्या विशिष्ट रंगाचें रेशीम विकत आणावयाला जावयाची परवानगी दिली.

ही मुकी तें नाणें घेऊन तेथून निघाली, ती प्रथम आपल्या खोलींत गेली. तेथें तिची वडील बहीण,—जी दुर्दैवानें तिच्याचसारखी मुकी आणि बहिरी होती,—ती तिला दिसली. येथें थोडीशी भाकरी खाऊन ही धाकटी मुकी रेशीम विकत घ्यावयासाठीं गस्तांगिरांकडे जावयाला निघाली.

---

## प्रकरण ३१ वें.

# सैतानहंडा.

दातिगडावर आलेल्या लोकांना तो गड दाखविण्याचा दावूद्भाईचा परिपाठ असे. फार मोठ्या दर्जाचे लोकांना तो गडकरी स्वतः गड दाखवीत असे आणि लहान दर्जाच्या लोकांना गड दाखविण्याच्या कामावर तो आजमल्लाची योजना करीत असे. ह्या कारणामुळें ह्या खिजमतगाराला व्यवस्थितपणें गड दाखविण्याची आणि त्या त्या स्थलांची थोडक्या शब्दांत संगतवारपणें माहिती सांगण्याची हातोटी साधून गेली होती.

आपले दोन गस्तंगीर ह्या आजमल्लाच्या मार्गदर्शकत्वाखालीं गड पहावयाला निघाले, असें आम्ही वाचकांना प्रकरण २२ मध्ये सांगितलें आहे. आतां आजमल्लानें त्यांना गडाचे कोणकोणते भाग दाखविले आणि त्या भागांची माहिती त्यांना दिली, हें आम्ही वाचकांना कळवितों.

दांतगडाचा मुख्य दरवाजा पश्चिमाभिमुख होता. येथून आजमल्लानें सुरवात करून ह्या गस्तंगिराना क्रमानें गडाच्या वायव्य, उत्तर, ईशान्य, पूर्व, आग्नेयी, दक्षिण आणि नैर्ऋत्य ह्या दिशानीं हिंडवून पुन्हा पश्चिमाभिमुख दरवाज्याशीं आणून सोडलें. ही प्रदक्षिणा करीत असता आजमल्लानें वाटेंत लागणाऱ्या गडाच्या भागाचें क्रमशः वर्णन केलें. हें वर्णन आम्हीं वाचकाना आता सादर करतों.

मुख्य दरवाज्यापाशीं दोघा गस्तंगिराना सोयीच्या ठिकाणीं उभें करून आजम.. त्याना म्हणाला, " हा आमच्या गडाचा मुख्य दरवाजा. मावळणाऱ्या सूर्याचें ऊन्ह ह्या दरवाज्यानें आत येऊन खूप लांबपर्यंत जातें. हा दरवाजा खडक फोडून केलेला आहे. तो सहा सात पुरुष उंच आणि दहा कदम रुंद आहे. त्याच्यावरची कमान पहा. त्या कमानीवरचें खोदकाम आणि नक्षीकाम पहा ! कारागिरानें आपली अपूर्व करामत त्या कमानीवर खर्च केलेली आहे. "

त्या दरवाज्यावर आपल्या दोघा गस्तंगिरानीं कौतुकाची दृष्टि स्थिरावून म्हटलें, " हें दरवाज्याचें काम खरोखरीं अप्रतिम आहे ! "

दरवाजा दाखविल्यानंतर आजमल्ल ह्या दोघा गस्तंगिराना घेऊन वायव्य कोपऱ्याकडे निघाला. वाटेमध्यें त्यानें त्याना तटबंदीपाशीं नेलें. ती दाखवून तो त्यांना म्हणाला, " ही पहा भिंत. ती चार पुरुष उंच आहे. ती आंतून आणि बाहेरून अगदीं असल्या चिऱ्यानीं बांधून काढलेली आहे. सगळे चिरे इतके कळाशीनें बसविलेले आहेत कीं, कोणत्याही दोन चिऱ्याच्या साध्यात नुसता खिळा ठोकूं म्हटलें तरी ते शक्य नाहीं ! "

तेव्हा शेरखान म्हणाला, " होय. सगळे चिरे अप्रतीम कळाशीनें बसविलेले आहेत खरें ! "

आजमल्ल म्हणाला, " आणि पुन्हा ही भिंत इतकी जाडी आहे कीं एक मनुष्य तिच्या गर्भात हात पाय ताणून निजूं शकेल. इतर गडाच्या भिंती गडगड्या धोंड्यांच्या किंवा ओबडधोबड धोंड्याच्या बांधलेल्या असतात. त्याचा एक धोंडा निघाला कीं, सारी भिंत आपल्या आपण ढांसळतें ! पण चिऱ्यांच्या बांधलेल्या भिंतींची तशी गोष्ट नसतें. प्रत्येक चिरा वेगळा वेगळा उखळून काढावा लागतो ! "

पलंगखान आणि शेरखान एकदम उद्गारलें, " तुम्हीं म्हणतां तें खरें आहे. ही तुमच्या गडाची तटबंदी फार मजबूद आहे, ह्यांत शंका नाहीं."

ह्यानंतर आजमल्ल ह्या गस्तंगिरांना वायव्य कोपऱ्याकडे घेऊन गेला. येथें कांहीं वेळ थांबून तो म्हणाला, " ह्या पहा झोपड्या. ह्यांत नानाप्रकारचे कारागिर आणि धंदेवाले लोक राहातात. येथें नालबंद, लोहार, शिकलगार, कोष्टी, सुतार, मशालजी, न्हावी, परीट, रंगारी, चाबूकस्वार, गवंडी, पाथरवट, वगैरे लोक राहातात. हे लोक संख्येनें थोडे आहेत खरें; पण ते नियमितपणें काम करणारे असल्याकारणानें आमच्या गडाच्या सर्व गरजा येथल्या येथेंच भागतात. "

शेरखान म्हणाला, " ठीक ! "

नंतर आजमल्ल म्हणाला, "ही पहा येथे दोन टाकीं आहेत. त्यांचें पाणी फार रुचकर आणि पाचक आहे. "

यानंतर आजमल्ल वायव्य कोपरा टाकून गडाच्या पूर्वेकडच्या भागाकडे तोंड वळवून चालूं लागला. वाटेंत त्यानें गडाची पागा आणि पीलखाना आणि गोठे त्या गस्तंगिरांना दाखविलें. तेथून पुढे शिबंदीतील शिपायासाठीं बांधलेल्या झोंपड्या त्यानें दाखविल्या.

नंतर आजमल्लानें ह्या दोघा गस्तंगिराना एक विहीर दाखविली. ती खडकात खोदलेली असून शंभर फूट खोल होती, आणि तिच्या तोंडाचा घेर वीस फूट होता. ही विहीर दाखवून आजमल्ल म्हणाला, " ह्या विहिरींत पाणी महामूर असून ते पिण्यासारखें आहे. ह्या विहिरीची अशी गंमत आहे कीं, कोयनानदींत एका ठराविक जागीं एखादे पान किंवा फूल किंवा पाण्यावर तरंगणारी कोणतीही लहानशी वस्तु टाकिली तर ती ह्या विहिरींत दृष्टीस पडते. मग ह्या विहिरीचा कोयनानदीशीं काय संबंध असेल तो असो ! "

शेरखान म्हणाला, " ह्या गोष्टीची प्रतीति कोणाला आलेली आहे काय ? "

आजमल्ल म्हणाला, " होय. ह्या गडाचा चाळीस वर्षामागे शेख जाफर म्हणून एक गडकरी होता. त्यानें एका ताडपत्राच्या तुकड्यावर 'बिस्मिल्ला निर रहमन् अल्ल रहीम' हीं अक्षरें तापलेल्या दाभणानें कोरवून तो तुकडा स्वता

कोयनानदींत त्या विशिष्ट ठिकाणीं तरंगत सोडला. मग तो ह्या गडावर आला. मग सात दिवसानीं त्यानें ह्या विहिरींत एक इसम उतरविला. त्यानें तो ताडपत्राचा तुकडा वर आणून सर्वांना दाखविला. त्यावरून सर्वांची खात्री झाली."

ही ह्या विहिरीसंबंधाची गोष्ट सांगितल्यावर आजमल्ल ह्या दोघां गस्तांगिराना एक विशिष्ट स्थल बोटानें दाखवून म्हणाला, "शंभरवर्षांमागें हा गड हिंदूंच्या ताब्यांत होता. तेव्हां ह्या ठिकाणीं हिंदूंच्या एका शेपूटवाल्या देवाचें देऊळ होतें. त्या शेपूटवाल्या देवाला हिंदू लोक मारुति म्हणतात. आमच्या बादशहानीं हा गड जिंकून घेतला, तेव्हां ह्या शेपूटवाल्या देवाचें देऊळ त्यानें खणवून काढवून तेथें पाहारेकऱ्यासाठीं एक खोली बांधविली."

तेव्हां शेरखान म्हणाला, "हिंदू काफीरांचा शेपूटवाला देव आदिलशहानीं येथून काढून टाकला हें फार उत्तम केलें; पण त्यांनीं हा गड हिंदू गडकऱ्यापासून कसा मिळविला ? हल्ला करून मिळविला किंवा पैसे देऊन मिळविला, हें तुम्हाला ठाऊक आहे काय ?"

त्यावर आजमल्ल म्हणाला, "हल्ला करून हा गड जिंकून घेणें ही अगदीं अशक्य गोष्ट आहे. कारण, हा गड किती मजबूत आहे आणि किती कठिण टेकडीवर तो बांधलेला आहे, हें तुम्हाला दिसतेंच आहे. पैसे देऊनही हा गड आदिलशहानीं मिळविलेला नाहीं."

शेरखानानें विचारलें, "तर मग त्यानीं हा गड कसा मिळविला ?"

आजमल्लानें उत्तर दिलें, "आदिलशहांचा सेनापति दहाहजार शिपायांचें सैन्य घेऊन आला, आणि ह्या गडाला वेढा दिला. ह्या वेढ्याचा परीघ सातआठ कोश होता असें म्हणतात. ह्या वेढ्यांत गडाच्या सभोंवतालच्या शेंकडो झोपड्या होत्या, आणि कांहीं मोठीं घरेंही होतीं. हा वेढा पांच वर्षें पडला होता. वेढ्यामध्यें अडकलेल्या लोकांची अन्नसामग्री आणि जनावरांचें गवत संपलें. लोकांना उपास पडूं लागले, जनावरें पटापट मरूं लागलीं, तेव्हां विभाकरराव गडकरी शरण आला. त्यानें हा गड आदिलशहाच्या सेनापतीच्या हवालीं केला. सेनापतीनें सर्व

माणसाना जीवदान देऊन गडाच्या बाहेर खुशाल जाऊं दिले. तेव्हापासून हा गड विजापुरच्या राज्यात मोडत आहे. ''

शेरखान म्हणाला, " बरें, आता पुढें पाहूं. "

पुढे ह्या तीघाना एक अंधार कोठडी लागली. किल्ल्याच्या सपाट जमीनीखाली दीडपुरुष खोल उतरून, हीं तीन माणसें त्या खोलींत गेलीं. ती खोली ह्या दोघा गस्तगिराना दाखवून आजमल्ल म्हणाला, " ही खोली दहापंधरा कदम लांब आहे, चारपाच कदम रुंद आहे आणि दीडदोन पुरुष उंच आहे. ह्या खोलींत हवा येण्यासाठीं दोन-तीन भोके आहेत. हा गड हिंदूंच्या ताब्यात होता, तेव्हा ह्या खोलींत ते धान्य साठवीत असत, अशी दंतकथा आहे. मुसलमानाच्या कारकीर्दींत ही खोली रिकामी पडली आहे. आमचे धान्य सांठविण्याच्या वेगळ्या तजवीजी आम्हीं करून घेतल्या आहेत. मशालीच्या प्रकाशाने ही खोली पाहाण्याची तुमची इच्छा आहे काय ? ''

शेरखान म्हणाला, " नाहीं. पुढे चला. ''

मग हीं तीन माणसे त्या अंधेऱ्या खोलीच्या पाह्यऱ्या चढून सपाटीवर आलीं.

पुढें चालत चालत हीं तीन माणसें गडाच्या दक्षिणदिशेकडे येऊं लागलीं. वाटेत त्यांना एक खूब मोठं टाकें लागले. त्याच्या पाण्याचा एक घोंट घेऊन शेरखान म्हणाला, " हें पाणी फार मधुर आणि गार आहे."

तेव्हा आजमल्ल म्हणाला, "आणि शिवाय ते पाचक आहे. गडकरीसाहेब आणि इतर बडे गृहस्थ ह्याच टाक्याचे पाणी पितात. ''

नंतर दहापंधरा लहानमोठे वाडे बोटानीं निर्देशून आजमल्ल म्हणाला, "तो वाडा गडकरीसाहेबांचा. तो सेनापतीसाहेबाचा. तो कारखानीससाहेबाचा. तो पोतनीस साहेबाचा. ती सदरकचेरी. ती मशीद. इ."

ही वाड्याची गणती करीतकरीत आजमल्ल हा गडाच्या नैर्ऋत्य कोपऱ्यातील एका खड्ड्यापाशीं आला. हा कोपरा रद्दी टाकण्यात आला असावा असें दिसत होतें, आणि तेथील खड्डा तोंडाशीं साधारण वाटोळा आणि आतल्या बाजूनें ओबडधोबड होता. त्या खड्ड्याचा तळ ओबडधोबड आणि उंचसखल असून कित्येक ठिकाणीं

तो दीड दोन पुरुष खोल होता, आणि कित्येक ठिकाणीं तो इतका उथळ होता कीं, त्यावर कोणी माणूस उभें राहिलें तर त्याच्या गुडघ्यावरचें शरीर लांबच्या माणसाला दिसलें असतें.

ह्या खड्ड्यापासून सुमारें पंधरा कदमांवर आजमल्ल उभा राहिला आणि आपल्या गस्तगिरांना म्हणाला, " खानसाहेब, येथूनच तो खड्डा पहा. पुढें जाऊं नका. त्यांत रात्रीचे वेळीं कधींकधीं भुतें संचार करतात!"

शेरखान म्हणाला, " ह्या गडाच्या ह्या भागाचा तुम्हाला कांहीं उपयोग होऊं शकत नाहीं ? "

आजमल्ल म्हणाला, " छे छे ! त्याचा कांहीं उपयोग आम्हांला होऊं शकत नाहीं. तो भाग आम्ही रद्दी टाकला आहे. ह्या कोपऱ्याकडे रात्रींच्या वेळीं कोणी मनुष्य येत नाहीं. दिवसास तरी, आपण आतां उभे आहों त्याच्यापुढें कोणी जात नाहीं. हा खड्डा फार भयंकर आहे. त्याला आम्ही 'सैतानाचा हांडा' असें म्हणतो. कारण त्याचें तोंड वाटोळें असून गर्भांत तो खड्डा बऱ्याच ठिकाणीं खोल आहे. विशेषतः अमावास्येच्या रात्रीं आणि आमावास्येच्या अगोदरच्या तीन रात्रीं आणि नंतरच्या तीन रात्रीं असे महिन्याचे सात दिवस ह्या सैतानहंड्यांत भुतें नाचत असतात. "

शेरखानानें विचारलें, " तीं भुतें कोणी तरी पाहिलीं आहेत काय ? तीं नाचताना कांहीं गाणींबिणीं म्हणतात काय ? त्यांचीं रूपें कशीं असतात ? "

तेव्हां आजमल्ल म्हणाला, " ह्या भुतांची संख्या, आकार, पेहेराव, कृति, वगैरेसंबंधानें कांहीं ठरलेलें नाहीं. कधीं दोनच भुतें, कधीं चार भुतें, कधीं आठ, दहा, वीस, पंचवीस, शंभरदेखील असतात. कधीं सगळींच भुतें पुरुष असतात, कधीं सगळींच भुतें बायका असतात, कधीं कांहीं पुरुष आणि कांहीं बायका असतात. कधीं कधीं गळ्यावर पुरुष आणि खालीं बायका असतात तर कधींकधीं गळ्यावर बायका आणि खालीं पुरुष अशा मागमांच्या आकृति असतात. कधीं सगळीं माणसें नागडीं असतात तर कधीं सगळीं माणसें वस्त्रें पेहेरलेलीं असतात. "

शेरखानानें विचारलें, " हा मोठा चमत्कार आहे बोवा !,"

पलंगखान म्हणाला, " गळ्यावर पुरुष आणि खालीं बायका अशीं कांहीं भुतं, आणि गळ्यावर बायका आणि खालीं पुरुष अशीं कांहीं भुतं असतात, हा मोठा विचित्रच प्रकार होय ! "

आजमल्ल म्हणाला, " होय. त्या भुतांना पुरुष म्हणावें किंवा स्त्रिया म्हणावें, हें एक कोडेच आहे. असल्या भुतांना दाढी, मिशा, कल्ले वगैरे असून गळ्याखालीं स्त्रियांचें सर्व अवयव असतात. कांहींचीं मुंडकीं अंबाडे, नथा, कानातील बाळ्या वगैरेंनीं युक्त असून खालीं पुरुषांच्या प्रमाणें त्यांचे अवयव असतात. कधींकधीं हीं उभयलिंगी भुतें अगदीं नग्न असतात, कधींकधीं वस्त्रे पेहेरलेलीं असतात. गळ्याखालीं पुरुषी देह असला तर शेरवान, तुमान, धोतर हीं वस्त्रें पेहेरलेलीं असतात. स्त्रियांचा देह असला तर लुगडीं, चोळ्या, वगैरे पेहेराव असतात."

शेरखानानें विचारलें, " हीं भुते चमत्कारिक असलीं पाहिजेत. तीं तुम्हीं कधीं पाहिलीं आहेत काय ? ह्या गडातील लोकाना तीं भुतें कांहीं उपद्रव करतात काय ? त्याना बकरे, कोंबडे, वगैरेंचा बळी द्यावा लागतो काय ? "

आजमल्लानें उत्तर दिलें, " तीं भुते मी कधीं पाहिलीं नाहींत. गडातील कोणी मनुष्य रात्रींच्यावेळीं इकडे आला, तर त्याला तीन दिवस ताप येतो. कधींकधीं ह्या तापांतून तो मनुष्य बरा होतो, पण बहुतकरून तो मरतो. ह्या भुताना कांहीं बळी द्यावा लागत नाहीं. ह्या गडाचा पहिला मुसलमान गडकरी फकरुद्दीन, ह्याला जो देखावा दिसला तो ऐकावयाची तुम्हाला इच्छा आहे काय ? "

शेरखान आणि पलंगखान दोघेही एकदम उद्गारले, " सांगा ती गोष्ट. ती ऐकावयाची आमची इच्छा आहे. "

तेव्हां आजमल्ल म्हणाला, " ऐका, मी ती गोष्ट तुम्हाला सांगतों. शंभर वर्षांमागें विजापूरच्या बादशहानें हा गड जिंकून घेतला, तेव्हां त्यानें फकरुद्दीन ह्या नांवाच्या एका सरदाराला येथें गडकरी म्हणून नेमिलें. एके दिवशीं रात्रीं, पहारेकरी लोक पहारा करीत आहेत कीं झोंपीं गेलेले आहेत, हें पाहण्यासाठीं तो गडकरी हिंडावयासाठीं निघाला. दुर्दैवानें ती

अमावास्येचीच रात्र होती. तो ह्या खड्ड्यापाशी आला तो त्याला चार धिप्पाड माणसें ह्या खड्ड्यात दिसली. दोन पुरुष होते आणि दोन स्त्रिया होत्या. एका पुरुषाला जी स्त्री पाहिजे होती तिला तो पुरुष नको असून दुसरा पुरुष पाहिजे होता, आणि ह्या दुसऱ्या पुरुषाला ती स्त्री नको होती. ह्यामुळें त्या दोन पुरुषांची आणि त्या दोन स्त्रियांची भाडणें लागलीं. त्या चौघानीं तरवारींनीं एकमेकांचीं डोकीं एकदम तोडली. तीं डोकीं उंच आकाशात गेलीं. तीं खालीं आलीं तीं चमत्कारिक रीतीनें खालीं आलीं. पुरुषाचीं मुंडकीं बायकांच्या धडाला लागलीं, आणि बायकांचीं मुंडकीं पुरुषाच्या धडाना लागलीं. मग हे नथबुचंडेवाले पुरुष आणि दाढीमिशावाल्या बायका मोठमोठ्याने हासूं लागल्या, आणि ह्या खड्ड्यामध्यें नाच खेळूं लागल्या ! "

शेरखानानें विचारलें, " मग फकरुद्दिनाने काय केलें ? "

आजमल्ल म्हणाला," हा देखावा पाहून फकरुद्दीन फार घाबरला. तो धावत धावत आपल्या वाड्यात आला. त्याला बेफाम ताप भरला. रात्रीं घडलेली हकीगत त्यानें लोकाना सांगितली. त्याला औषधोपचार करण्यात आले. पण तो बरा झाला नाहीं. तो त्या तापानें तीन दिवसांत मरण पावला. मग बादशहानीं दुसरा गडकरी नेमला. "

शेरखान उद्गारला, " अरेरे ! बरें, आणखी कोणाला त्या भुताचा नाच दिसला आहे काय ? "

आजमल्लानें उत्तर दिलें, " होय. ज्या माणसाला हा भुताटकीचा प्रकार ठाऊक नाही, तो माणूस चुकून कधीं रात्रींच्या वेळीं ह्या सैतानहंड्याकडे आला, तर त्याला लागलाच ताप भरतो, आणि तो तीन दिवसात मरतो. अशीं पुष्कळ उदाहरणे ह्या गडावर घडलीं आहेत. एकदा एक नास्तिक माणूस 'सब झूट है' असें म्हणून ह्या खड्ड्याकडे मुद्दाम गेला. तो तावडतोब तेथल्या तेथें मरून पडला. त्या दिवसापासून गडकरीसाहेबानीं ह्या खड्ड्याकडे रात्रीं कोणी जाऊं नये म्हणून दवंडी पिटविली; तरीदेखील दर वर्षाला दोन तीन तरी मूर्ख किंवा धाडसी किंवा गैरसावध माणसें रात्रीं ह्या खड्ड्याकडे येतात आणि मरून पडतात. मुसलमानांनीं हा गड जिंकून घेतल्यापासून चारपांचशे लोक अशा प्रकारे

मरण पावलेले आहेत. दहाबारा दिवसांच्या मागे एक धनगर ह्या गडा-वर तूप विकावयाला आलेला होता. त्याला ह्या खड्ड्याची भुताटकी कोणी सांगितली नव्हती. तो रात्रीं इकडे इगकतीला आला, सकाळीं तो मरून पडलेला लोकांना दिसला. ”

शेरखानानें विचारलें, “ हा गड हिंदूंच्या ताब्यात होता तेव्हादेखील असेंच भुताटकीचे प्रकार घडत होते काय ? ”

आजमल्ल म्हणाला, “ तेव्हाच्या हिंदुगडकऱ्यानें इकडे कोणी येऊं नये म्हणून नेहेमी एक पहारेकरी ठेविलेला होता, असें म्हणतात. ”

शेरखानानें विचारलें, “ तुम्हीही असाच एक पाहारेकरी येथें का बसवून ठेवीत नाहीं ? ”

आजमल्लानें उत्तर दिलें, “ ह्या खड्ड्यामध्यें भुताटकी आहे असें ह्या गडाच्या गडकऱ्यांना खात्रीलायक कळेपर्यंत कांहीं माणसें दगावलीं. तें कळल्यानंतर त्यांनीं येथें पाहारेकरी बसविले. पण ते पाहारेकरीही एका महिन्याच्यावर कोणी टिकले नाहींत. ते सगळे मरून पडले. त्यानंतर येथें पहारा करावयाला कोणी इसम मिळेनासा झाला. म्हणून येथें कोणी पहारेकरी नसतो. हिंदू काफीर म्हणजे भुतेंच ! भुतांना भुतें उपद्रव करीत नाहींत. हिंदूंच्या अमदानींत ह्या खड्ड्याजवळ पहारेकरी पहारा करीत, त्यांना कांहींदेखील उपद्रव होत असल्याचें ऐकिवात नाहीं. अग्नीला अग्नि जाळीत नाहीं, तशी भुतांना भुतें उपद्रव करीत नाहींत. ”

तेव्हां शेरखानानें विचारलें “ ह्या सैतानहाड्यांत नेहेमी एकाच प्रकारचा देखावा दिसतो काय ? ”

आजमल्लानें उत्तर दिलें, “ बहुतकरून हाच देखावा दृष्टीस पडतो. पण कधींकधीं वेगळे प्रकारही दृष्टीस पडतात. कधींकधीं दोन अर्धे पुरुष आणि दोन अर्ध्या स्त्रिया दृष्टीस पडतात. कधींकधीं अशा तीन जोड्या दिसतात, कधीं कधीं चार जोड्याही दिसतात. बहुतकरून हीं भुतें सपशेल नागडीं असतात, पण कधींकधीं त्यांच्या अंगांवर वस्त्रें असतात. पुरुषांच्या मुंडक्याखाली धडांना लुगड्याचें किंवा लहंग्याचें नेसणें असतें. स्त्रियांच्या मुंडक्याखालीं धडांना शेरवान, अंगरखे

नुमानी किंवा धोतरें वगैरेंचा पेहराव असतो. कधींकधीं हीं भुतें कुतऱ्याप्रमाणें, डुकरांप्रमाणें, गाढवाप्रमाणें, घोड्याप्रमाणें, गायीप्रमाणें, शेळ्याप्रमाणें ओरडतात. कधींकधीं कावळ्यांप्रमाणें, चिमण्याप्रमाणें, कोकिळांप्रमाणें ओरडतात, कधींकधीं हीं भुतें एकमेकांशीं बोलत असतात, कधींकधीं हीं हंसत असतात, कधींकधी तीं हाताच्या खुणांनीं कोणाला तरी बोलावीत असतात, कधींकधीं तीं अगदीं ठेंगणीं होऊन दिसेनाशीं होतात, आणि कधीं कधीं तीं उंचउंच होत जाऊन त्याचीं डोकीं आकाशाला भिडतात ! एकदां तर असें झालें कीं, ह्या सैतानहांड्यांतून असंख्य भुतें उत्पन्न होऊन ह्या खड्ड्यांतून नाचत नाचत बाहेर आलीं आणि आमच्या गडावरील दोन माणसांना पकडून घेऊन पुन्हा खड्ड्यांत जाऊन अदृश्य झालीं. ह्या प्रसंगीं हीं भुतें अनेक जनावरांचे आणि अनेक पक्ष्यांचे आवाज काढीत होतीं; ह्या प्रसंगीं आमच्या गडावरील सर्व माणसें घाबरून गेलीं होतीं. ह्या प्रसंगानंतर कित्येक दिवसपर्यंत भितरीं माणसें दिवसाम- देखील ह्या बाजूला येईनात. असो. ह्या प्रसंगीं हीं नाहींशीं झालेलीं माणसें पुन्हा आम्हांला जिवंत किंवा मेलेलीं कधींच दृष्टीस पडलीं नाहींत. ती त्या गर्त्तीं जीं नाहींशीं झालीं तीं झालींच ! ''

याप्रमाणें ह्या सैतानहाड्याची भुताटकी आजमल्ल सांगत असता आमचे दोन गस्तगीर तीं स्वस्थपणें ऐकत उभे राहिले होते. असो.

या सैतानहंड्याजवळ आपल्या गस्तगिरांचा बराच वेळ मोडला. यानंतर आजमल्लानें त्यांना तटबंदीवर नेलें. तीं त्यांना दाखविल्यानंतर आजमल्लानें त्यांना पुन्हा सपाटीवर आणलें. तेथील आणखी कांहीं भाग त्यांना दाखविल्यावर तो त्यांना म्हणाला, "हुजूरच्या हुकमा- प्रमाणें मी आपणाला हा गड दाखविला. आतां मला रुखसत देण्याची मेहेरबानी करावी. ''

शेरखानानें त्याच्या हातावर एक पिवळें नाणें ठेविलें, तें घेऊन तो खूष झाला आणि त्यांना सलाम करून आपल्या उद्योगावर गेला.

---

## प्रकरण ३२ वें.

# त्याच दिवसाची मध्यरात्र.



" मेलों ! मेलों ! मेलों ! "—

ही कर्णविदारक आरोळी दातेगडावरील निद्रित लोकाच्या कर्णपथावर येऊन आदळतांच कित्येक लोक खडबडून जागे झाले. ही कोणाची आरोळी आणि कोणत्या दिशेकडून येत आहे, याचा ह्या जागे झालेल्या लोकांना एकदम उलगडा होईना. ते ह्यासंबंधानें विचार करीत आहेत तों पुन्हां "मेलों ! मेलों ! मेलों !" अशी आरोळी उत्पन्न झाली ! ही आरोळीदेखील पहिल्या आरोळीइतकीच कर्णविदारक होती ! पहिल्या आरोळीनें जे लोक जागे झाले नव्हते, त्यांचेपैकीं कांहीं लोक ह्या दुसऱ्या आरोळीनें जागे झाले आणि ही आरोळी कोणाची आणि कोणच्या दिशेकडून आली आहे ह्याचा विचार ते करीत आहेत, तों पुन्हा, "मेलों ! मेलों ! मेलों !" अशी एक आरोळी उत्पन्न झाली ! ही आरोळीदेखील पहिल्या दोन आरोळ्याइतकीच कर्णविदारक होती. ही आरोळी ऐकून गडावरील आतांपर्यंत जागे न झालेले लोक खडबडून उठले ! ह्या तिसऱ्या आरोळीनें गडावर जिकडे तिकडे हालचाली सुरू झाल्या. सर्व लोक आपआपल्या घरांतून, आणि झोंपड्यातून उघड्या मदांगणांत गोळा होऊं लागले. ह्या कोणाच्या आरोळ्या म्हणून लोक एकमेकांना विचारूं लागले. परंतु त्या आरोळ्यांचा उगम कोणालाच ठाऊक नसल्यामुळे कोणाला कांहीं उलगडा करता येईना ! सर्व लोक कावऱ्याबावऱ्या नजरेनें इकडेतिकडे पाहात होते, पण ती काळोखी रात्र असल्याकारणानें कोणाला कांहींच दिसत नव्हतें.

याप्रमाणें हे लोक भीतिग्रस्त होत्साते इकडेतिकडे पाहात आहेत, तों त्यांच्या कानावर कोणी कण्हत असल्याचा ध्वनि आला. हे लोक त्या ध्वनिच्या दिशेनें सावधगिरीनें चालत जाऊं लागलें, तों त्यांना हा कण्हण्याचा ध्वनि अधिकाधिक स्पष्टपणें ऐकूं येऊं लागला.

ह्या लोकांना त्या अंधेरांत जितकें स्पष्ट दिसणें शक्य होतें तितक्या

स्पष्टपणें, एक मनुष्य जमिनीवर उताणा पडून कण्हत आहे, असा देखावा त्यांना दिसला. तेथें ताबडतोब कंदील आणण्यांत आले. ह्या कंदीलाच्या प्रकाशानें लोकाना तेथें एक धिप्पाड आकाराचा पुरुष दिसला. त्याच्या दाढीवरून आणि पेहेरावावरून तो मुसलमान असावा, अशी सर्वांची खात्री झाली. पण तो मुसलमान होता तरी कोण ?

लोक ह्या गोष्टिसंबंधानें तर्कवितर्क करीत आहेत तों कांहीं माणसें म्हणालीं, " आज विजापुराहून एक थैली घेऊन आलेला जो स्वार तोच हा ! '

हा उद्गार उच्चारला गेला त्याच्या पाठोपाठ, " हा तो बुऱ्हाण-अल्लीच ! " असाही उद्गार कांहीं लोकांच्या मुखांतून निघाला.

इतकें होत आहे तों तो मुसलमान कांपऱ्या आवाजानें स्वगत उद्गारला, " गेलीं का तीं भुतें ? "

हा प्रश्न ऐकून एक वृद्ध माणूस त्याला म्हणाला, " अल्लीसाहेब, येथें भुतखेतें कोणी नाहींत ! आम्ही तुमच्याचसारखीं माणसें आहोंत. येथें भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं ! येथें कोणी भुतेंखेतें आलीं तर त्यांना आम्ही पिटाळून लावूं ! मला मंत्र येत आहेत. तुम्हाला काय झालें, कशाची भीति वाटली, वगैरे सर्व कांहीं आम्हाला सांगा. भिऊं नका. "

हे त्या म्हाताऱ्याचे आश्वासनपर शब्द ऐकून तो इसम—तो बुऱ्हाण-अल्लीच होता,—तो म्हणाला, " येथें खरोखर तीं भुतें नाहींत ना ? "

म्हाताऱ्यानें उत्तर दिलें, " अल्लीसाहेब, येथें खरोखर आम्ही सगळीं माणसें आहोंत. येथें कोणीं भुतें नाहींत. तुम्हाला कोठें काय दिसलें तें सांगा. येथें भुतें यावयाचीं नाहींत; कारण, मला भुतांचा मंत्र येतो आहे. "

हें भाषण ऐकून बुऱ्हाणअल्लीचें अंतःकरण आश्वासन पावलें. मग तो शांतस्वरानें म्हणाला, " येथें भुतेंखेतें खरोखरीच नाहीं ना येणार ? "

त्या म्हाताऱ्यानें उत्तर दिलें, " येथें कोणी भुतेंखेतें येणार नाहींत, अशी मी खात्री देतों. आतां आम्हाला सांगा तुम्हाला कोठें काय दिसलें तें ? "

आपल्याभोंवती खरोखरीच माणसें आहेत अशी बुऱ्हाणअल्लीची खात्री झाली. पुष्कळ माणसांत भुतें कधीं येत नाहींत हें त्याला ठाऊक होतें, म्हणून तो शांत झाला आणि जागच्या जागीं तो बसला राहिला. मग तो सर्वांच्या तोंडांकडे नजर फिरवून म्हणाला, " मला रात्रीं इराकतीला लागली, म्हणून मी निजलों होतों त्या जागेवरून उठून, गडाच्या त्या तिकडच्या कोपऱ्याकडे गेलों. तों तेथें खोलात मला चार आकृति दिसल्या. त्या आकृति माणसांच्या नव्हत्या, अशी माझी खात्री आहे. तीं चारी भुतेंच होतीं. कारण, त्या चार आकृतींपैकीं दोन आकृति गळ्याच्या वर पुरुषाच्या होत्या आणि गळ्याच्या खालीं स्त्रियाच्या होत्या. ह्या दोन आकृतींच्या मुंडक्याना लांबच लांब दाढ्या होत्या आणि लांबलांब मिशा होत्या आणि डोक्यांवर दस्तारें ( म्हणजे पागोटीं किंवा मुंडाशीं ) होतीं. ह्या दोन आकृति लुगडीं नेसलेल्या होत्या. दुसऱ्या दोन आकृति गळ्याच्यावर बायकांच्या होत्या. त्यांच्या नाकांत नथा होत्या आणि डोक्याच्या केशांच्या वेण्या त्यांनी घातलेल्या होत्या. गळ्याखालीं ह्या दोन आकृतींचे पेहराव पुरुषाचे होते. त्यांच्या अंगात शेरवान होते आणि पायांत तुमानी होत्या. अशा चमत्कारिक आकृति मला त्या खड्यांत दिसल्या. तीं चार भुतेंच होतीं अशी माझी खात्री आहे. "

भोंवतालच्या मंडळींतील एका इसमानें विचारलें, " बरें, पुढे ! "

तेव्हां बुऱ्हाणअल्ली म्हणाला, " हीं भुतें एकमेकांशीं काहीं बोलत असावींत असें मला वाटलें. तीं मधूनमधून माझ्याकडे पाहात होतीं, मधूनमधून हंसत होतीं आणि मधून मधून हाताच्या खुणांनीं मला आपल्याकडे बोलवीत होतीं. मी हा देखावा पाहून अगदीं गर्भगळित होऊन जागच्या जागीं खिळून टाकल्यासारखा स्वस्थ उभा राहिलों होतों. "

एकानें विचारलें, " असें किती वेळ चाललें होतें ? "

बुऱ्हाणअल्लीनें उत्तर दिलें, " हें दोन तीन घटका चाललें असेल, असें मला वाटतें. पण पुढें जें झालें तें फार विलक्षण होतें ! "

एक श्रोता म्हणाला, " पुढें काय झालें ? "

बुऱ्हाणअल्ली म्हणाला, " मग त्या आकृति अगदीं ठेंगण्या झाल्या, मग लगेच त्या उंचउंच होत गेल्या; शेवटीं त्या इतक्या उंच झाल्या कीं, मला वाटलें कीं त्यांचीं डोकीं आकाशाला जाऊन टेकतील. आणि ह्या उंचउंच होत जाणाऱ्या आकृति हळूंहळूं मजकडेच येऊं लागल्या ! तेव्हां त्या मला पकडावयाला येत आहेत असें समजून मी भीतीनें "मेलों, मेलों, मेलों" अशा आरोळ्या ठोकीत येथपर्यंत आलों आणि बेशुद्ध होऊन येथें पडलों, तों इतक्यांत तुम्ही लोक येथें जमा झालां. "

बुऱ्हाणअल्ली ही हकीगत भोंवतालच्या मंडळींना सांगत असतां तीं खंडशः त्या वर्तुळाच्या अगदीं परिघापर्यंत जाऊन पोंचत होतीं.

ह्या वर्तुळावरचा एक मनुष्य दुसऱ्याला म्हणाला, " अहो तो बुऱ्हाण-अल्ली त्या सैतानहाड्याकडे गेला होता !"

दुसरा माणूस म्हणाला, " त्या सैतानहाड्याची बदनामी त्याला ठाऊक नव्हती. "

पहिला माणूस म्हणाला, " त्याला कोठून ठाऊक असणार ? कालच तो विजापुराहून एक थैली घेऊन या गडावर आला. त्याला त्या सैतान-हाड्याची भुताटकी कोण सांगणार ? "

दुसरा माणूस म्हणाला, " बिचारा मेला नाहीं, म्हणजे झालें. "

पहिला माणूस म्हणाला, " अरे, त्याला मरायला काय धाड भरली आहे ? तो आतां चांगला हुशार झाला आहे.त्याची भीति पार नाहींशी झाली असें दिसतें आहे. पहा तो कसा अवसानांत बोलत आहे ! "

ह्याच सरणीनें ह्या जनसमुदायांतील लोकांचीं एकमेकांशीं बोलणीं चाललीं होतीं.

वर्तुळाच्या परिघावर, दुसऱ्या एका ठिकाणीं दोन इसम बुऱ्हाणअल्लीची टवाळकी करीत होते.

एक इसम जवळच्या इसमास म्हणाला, " ह्या बुऱ्हाणअल्लीला भल-त्याचवेळीं इराकतीला का रे लागली ?"

दुसरा इसम त्याला म्हणाला, " हा हुजूरकडून आलेला जासूद म्हणून पोतनीससाहेबांनीं त्याला कोंबड्याची जाफत दिली. लेकाला फुकटचें कोंबडे खावयाला मिळाले; मग तो कमी कां करील ? त्यानें त्या

कोंबड्यावर यथास्थित हात मारला. त्यामुळें त्याला अजीर्ण झालें आणि भलत्याच वेळीं त्याला इराकतीला लागली. ह्यः ह्यः ह्यः ”

ह्या हंशात त्याच्या जोडीदारानें भर घातली, हें सांगणें नलगे !

ह्याप्रमाणे प्रेक्षक आणि श्रोते एकमेकांत बोलत असता तेथें गडकरी-साहेब, सेनापतिसाहेब आणि इतर बडे अधिकारी आले. त्यांच्या कानीं-हीं बुऱ्हाणअल्लीच्या कर्णविदारक आरोळ्या गेलेल्या होत्या.

हे बडे गृहस्थ ह्या जनसमुदायापाशीं आले, तेव्हा लोकांची बोलणीं बंद पडलीं. लोकांनीं त्यांना वाट करून दिली. ते बुऱ्हाणअल्ली बसला होता तेथपर्यंत जाऊन पोंचले.

गडकरीसाहेब बुऱ्हाणअल्लीला म्हणाले, “ अल्लीसाहेब, तुम्हाला कशाची भीति वाटली तें मला समजलें आहे. तुम्हांला ह्या गडाची माहिती नाहीं आणि कोणी सांगितली नाहीं, म्हणून हा आजचा वाईट प्रसंग घडून आला. तुम्हीं ज्या ओसाड कोपऱ्याकडे गेला होता तिकडे भुताटकीचे प्रकार होतात, म्हणून रात्रीच्या वेळीं ह्या गडावरचे कोणी माणूस तिकडे फिरुक होत नाहीं. असो. झाले ते झालें. आतां तुम्हांला हुशारी वाटत आहेना ? तुम्हांला आतां पायानें चालवेल ना ? ”

“होय, मी आतां बिलकूल हुशार झालों आहे. ” असें म्हणत म्हणत बुऱ्हाणअल्ली उठून उभा राहिला आणि गडकऱ्याबरोबर चालूं लागला. त्याला गडकरी म्हणाले, “ आमच्या गडावरच्या हकीमाला मी तुम्हांला झोंपेचा दवा द्यावयाला सांगतों. त्या दव्यानें तुम्हांला चांगली गाढ झोंप लागेल आणि उद्या सकाळाला तुम्ही पूर्ववत् व्हाल. ”

इतक्यांत तेथें गडावरचा हकीम येऊन उभा राहिला. त्याला गड-कऱ्यांनीं बुऱ्हाणअल्लीच्या निजण्याची सोय वेगळ्या ठिकाणीं करावयाला आणि झोंपेचा दवा द्यावयाला सांगितलें. तेव्हा तो जासूद (बुऱ्हाणअल्ली) त्या हकीमाबरोबर गेला.

मग सेनापतिकडे वळून गडकरी त्याला म्हणाले, “उद्यां सकाळीं सैतान-हांड्याबद्दल इशारत दवंडी पिटवून मी सर्व लोकांना देईन. आणि त्या सैतानहांड्याकडे कोणी जाऊं नये, म्हणून दहा पांच वांसे उभे पुरवून त्याना आडव्या काठ्या बांधवीन. ”

सेनापति म्हणाला, " असें केलें म्हणजे उत्तम होईल. तिकडे कोणी जाणार नाहीं. आज बरेच दिवसांत त्या सैतानहाड्याकडे कोणी माणूस गेलेलें नव्हतें. हा बुऱ्हाणअल्ली येथला राहणारा नव्हे. त्या कोपऱ्यांत भुताटकी आहे हें त्या बिचाऱ्याला ठाउक नव्हतें, म्हणून त्याच्यावर हा आजचा प्रसंग ओढवला. पण तो थोडक्यांतच निभावला ! "

गडकरी म्हणाले, " होय. पुष्कळ माणसें भीतीनें मरण देखील पावलेलीं आहेत. "

इतकें संभाषण झाल्यावर गडकरी, सेनापति, आणि इतर गृहस्थ आपआपल्या घरीं गेले. पटांगणांत जमा झालेले लोकही घरोघर निघून गेले. गडावर लवकरच जिकडेतिकडे शांतता झाली. सर्व लोक पुन्हा निद्रावश झाले.

आमचे दोन गस्तंगीर शेरखान आणि पलंगखान,—जे ह्या गर्दीत आलेले होते,—तेही इतर सर्व लोकांप्रमाणें उरलेल्या रात्रीची विश्रांति घ्यावयासाठीं तेथून चालते झाले.

---

## प्रकरण ३२ वें.

# गस्तंगीर दातेगडांतून बाहेर पडले.



गडावरील हकीमानें बुऱ्हाणअल्लीला झोंपेचा दवा दिल्याकारणानें त्याला अवशिष्ट रात्रीं चांगली झोप लागली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो जागा झाला, तो पूर्णपणें हुशार असा जागा झाला. दिवसाचा टळटळीत प्रकाश आणि गडावर इकडेतिकडे फिरणारीं माणसें पाहताच त्याची भीति पार नाहींशी झाली. इतकेंच नव्हे, तर आधल्या रात्रीं भीतीनें आपली अगदीं गाळण उडाली होती, ही गोष्ट मनांत येऊन त्याला लाजही वाटूं लागली.

असो. बुऱ्हाणअल्ली प्रातःकाळचीं सर्व कर्तव्यें करून आणि यथोचित पोशाख करून गडकरीसाहेबांना सलाम करावयासाठीं त्यांच्या दिवाणखान्यांत गेला.

गडकरी साहेबांनीं त्याच्या तब्येतीसंबंधानें प्रथम चौकशी केली. तेव्हां तो म्हणाला, " खाविंद, मला काल उरलेल्या रात्रीं चांगली झोंप आली. मी आता पूर्णपणे हुशार झालों आहे. आपला जवाब परत विजापुराला घेऊन जावयाला मी सिद्ध आहे. "

तेव्हा गडकरीसाहेब म्हणाले, " हुजूरकडून तुम्ही काल जी थैली आणली तींतील पत्र आम्ही वाचून त्यावर आम्ही जवाब लिहिला आहे. तो थैलींत घालून थैली तयार करून ठेविली आहे. ही ती थैली. "

असें म्हणून गडकरीसाहेबांनीं तयार करून ठेविलेली थैली बुऱ्हाण-अल्लीच्या हातीं दिली. ती त्यानें घेतली. तेव्हा गडकरीसाहेब त्याला म्हणाले, " ही थैली तुम्ही हुजूरना द्या. "

बुऱ्हाणअल्लीनें योग्य शब्दांनीं त्याना उत्तर दिलें. मग त्यानें ती थैली घेऊन आपल्या शेरवानाच्या खिशांत ठेवून दिली. नंतर तो गडकरी साहेबांना मुजरा करून तेथून बाहेर पडला. नंतर अश्वारूढ होऊन तो गडाच्या बाहेर पडून विजापुरच्या वाटेला लागला.

शेरखान आणि पलंगखान ह्या गस्तांगीरांचेंही दातेगडावरील विक्री करण्याचें काम आटोपले, तेव्हां ते तेथून निघावयाच्या तयारीला लागले. गडकरीसाहेब, सेनापतिसाहेब, इतर अधिकारी वगैरेचें त्यांनीं निरोप घेतले. मग ते आपल्या रिकाम्या पडशा आणि कंठाळी घेऊन दाते-गडाच्या दरवाज्याशीं आले. येथे तें कांहीं वेळ दरवानाचा निरोप घ्यावयासाठीं देवडीवर बसले.

ह्यावेळीं त्या देवडीवर आणि जवळपास कोणी मनुष्य नव्हतें. दरवानाला शेरखान म्हणाला, " मीयासाहिब, ह्या गडावर आल्यानें आम्हाला वहोत नफा झाला. आमचा बहुतेक माल ह्या गडावर खपून आमच्या पडशा आणि कंठाळी बहुतेक रिकाम्या होऊन गेल्या आहेत.

दरवान म्हणाला, " तुमचा तीनचारशे रुपयांचा माल ह्या गडावर खपला असेल, नाहीं काय ?"

शेरखान म्हणाला, " त्याहून जास्तीच माल ह्या तुमच्या गडावर खपला. आमचा एकंदर पाचशे बावन्न रुपये, आकरा आणे, दोन पैसे किंमतीचा माल खपला. आमच्या अटकळीच्या बाहेर आमचा माल

खपला. आम्हाला बहोत आनंद होत आहे. अल्ला ह्या गडाच्या लोकांवर खैर मर्जी करो."

दरवान म्हणाला, "खानसाहेबहो, तुम्हाला तुमच्या वचनाची आठवण आहे ना?"

शेरखान म्हणाला, "आलबत आहे. आम्ही हिंदूकाफिराप्रमाणे लबाड लोक नव्हे. आम्ही तुम्हाला रुपयाला एक आणा देऊं, असें कबूल केलेलें होतें ना?"

दरवान म्हणाला, "होय, खानसाहेब."

शेरखान म्हणाला, "आमचा एकंदर माल पांचशें बावन रुपये साडेआकरा आणे किंमतीचा विकला गेला. त्यावर रुपयाला एक आणाप्रमाणें चवतीस रुपये चेरीमेरीचे होतात. आम्ही तुम्हाला बट्ट पसतीस रुपये देतों. त्यात तुमची खुपी आहे ना?"

दरवान आनंदानें म्हणाला, "आलबत आहे. अल्ला तुमचें कल्याण करो."

शेरखानानें आपल्या कमरेच्या कशांतून पसतीस रुपये काढून ते दरवानाच्या हातावर ठेविले. तो फार खूप झाला.

मग शेरखान म्हणाला, "दरवानसाहेब, आपण दोघे खुषींत आहो. आमच्या विजापुरी गुडाखूचा स्वीकार करा. आम्ही येथून थेट विजापुरास जाणार आहों. वाटेत विकावयाला आमच्याजवळ कांहींच माल नाहीं. हा गुडाखूचा संबध डबाच तुम्हाला आम्ही नजर करतों!"

असें म्हणून शेरखानानें आपल्या पडशींतून तो डबा बाहेर काढून दरवानाच्या हातांत दिला. त्यानें त्याचें झाकण काढतांच त्याचा परिमल हवेंत इकडेतिकडे पसरला. दरवान खूप होऊन म्हणाला, "बहोत उमदा! बहोत उमदा! एक चिलीम भरतों!"

असें म्हणून त्यानें त्या गुडाखूची एक चिलीम भरली. वीस पंचवीस झुरके ओढून त्यानें ती शेजारीं जमीनीवर उपडी घातली. नंतर मोठ्या प्रेमानें त्यानें ह्या दोन गस्तंगिरांना निरोप दिला.

हे दोन गस्तंगीर आपआपल्या घोड्यांचे लगाम हातात धरून दाते-

गडाची टेकडी उतरून त्याच्या पायथ्याशीं आले. तेथें ते घोड्यावर बसून त्यानीं आपला मोर्चा गणवंतगडाच्या दिशेनें वळविला.

गणवंतगड नजरेच्या टप्प्यांत आला, तेव्हां ते त्या गडाच्या पायथ्याशीं असलेल्या गऊळवाड्यांतील एका विशिष्ट झोपडीच्या रोखाने चालूं लागले. ह्या वेळीं ते आपल्या घोड्याना सथ चालीवर चालवीत होते. ह्या कारणांमुळे घोड्यांच्या टापाचा फारसा मोठा आवाज होत नव्हता. तथापि, जो मंद आवाज होत होता त्याचा कानोसा लागतांच, त्या झोपडींतून दोन मुलगे त्या झोपडीच्या दाराशीं येऊन शेरखान आणि पलंगखान ह्याच्याकडे पाहात राहिले. ह्या दोन मुलांच्या मुखावर आनंद विलसत होता आणि ते स्वार आपणास केव्हां भेटतील आणि आपण त्याच्याशीं केव्हां बोलूं. अशी उत्कंठा त्याना फार लागलेली होती, असे त्याच्या नजरेवरून सहज व्यक्त होण्याजोगे होतें.

झोपडीच्या दाराशी उभे असलेले हे दोन्ही मुलगे आठरा एकोणीस वर्षांच्या वयाचे होते. ह्या दोघापैकीं एक मुलगा मध्यम उंचीहून किंचित् अधिक उंच होता आणि अंगानें सडपातळ होता; त्यामुळें तो खरोखरी होता त्याहून अधिक उंच दिसत असे. दुसरा मुलगा मध्यम उंचीचा असून अंगानें गुबगुबीत होता. ह्या दोघाही मुलांचीं सर्व गात्रे प्रमाणशुद्ध असून तालमीच्या व्यवसायानें कसलेलीं अशीं दिसत होतीं.

ह्या दोघांचेही चेहेरे ठसठशीत होते. दोघाचेही वरचे ओठ आणि हनुवटी हे मुखाचे भाग अगदीं गुळगुळीत होते. दोघाचेही डोळे विशाळ आणि काळेभोर होते. दोघांच्याही नजरेमध्यें पावित्र्य विलसत होतें. दोघांचेही चेहेरे मोहक होते; परंतु एकाचें तोंड किंचित् लांबोड्या घाटाचें होतें, आणि त्याचे नाक पक्ष्यांचा राजा जो गरुड त्याच्या चोंचींच्या वळणावर होते. त्याच्या सवंगड्याचें तोंड वाटोळ्या घाटाचें होतें आणि त्याचें नाक सरळ आणि लांब होतें. तथापि, त्याला गरुडाच्या चोंचीचें वळण नव्हतें. एकाच्या मुद्रेत मोहकपणाच्या जोडीला करारीपणा दिसत होता; दुसऱ्याच्या मुद्रेंत मोहकपणाच्या जोडीला साधेपणा आणि प्रेमळपणा होता.

ह्या दोघा मुलाचे पेहेराव ह्यावेळीं अगदीं साधे होते. गरुडाच्या चोंचीसारखें ज्याचें नाक होतें, त्यानें अंगांत एक कुडतें आणि पायात एक तंग माडचोळणा घातलेला होता. त्याच्या सवंगड्याच्या अंगांत एक कुडतें असून तो मराठे लोकांच्या रीतीप्रमाणे धोतर नेसला होता.

ह्या दोन मुलापैकीं जो सडपातळ मुलगा, तो मराठ्यांच्या राज्याचा आणि साम्राज्याचा संस्थापक शिवाजी हा होता. दुसरा मुलगा त्याच्या जीवश्चकंठश्च तीन मित्रापैकीं बाजी पासलकर हा होता.

असो. शिवाजी आणि बाजी हे दोघेजण झोपडीच्या दाराशीं उभे राहून शेरखान आणि पलंगखान ह्याच्या आगमनाची मोठ्या उत्कंठेने वाट पाहात होते, असें आम्ही वर म्हटलें आहे. हे दोघे घोडेस्वार झोपडीच्या दारापाशीं आले ते ताडकिनी आपल्या घोड्यावरून उतरले. ते उतरतांच जगोबा नावाचा एक मुलगा झोपडींतून बाहेर आला. त्यानें त्या घोड्यांना झोपडीच्या पिछाडीस असलेल्या पडवींत नेऊन त्याच्या स्वास्थ्याच्या तजवीजी चालविल्या.

ते स्वार जमीनीवर उतरताच शिवाजीने शेरखान आणि पलंगखान ह्याना दोन हातांनीं धरून झोपडींत नेलें. बाजीही ह्या तिघांबरोबर झोपडींत शिरला. झोपडीचें दार लावून घेतल्यावर शिवाजी आणि बाजी हे त्या दोघाना एका सुरांत म्हणाले, "गड्यांनों, तुम्हांला परत यावयाला एक दिवस उशीर लागला!"

शेरखान आणि पलंगखान एकदम उद्गारले, " होय. पण आम्हीं काम पर काम करून आलो आहो!"

पलंगखान म्हणाला, " आम्हांला एक दिवस उशीर झाला खरा पण आम्हीं काम सोळा आणे करून आलों आहों. "

तेव्हा शिवाजी म्हणाला, " अरे तानाजी, आणि अरे एसाजी, तुम्हीं खबरा तरी काय आणल्या आहेत ? "

तेव्हा शेरखान रागाचा खोटा आविर्भाव करून म्हणाला, " हे शिवबा, मी शेरखान आहे बरें कां ? ह्या खोट्या दाढीमिशा काढून टाकावयाच्या अगोदर मला तानाजी म्हणूं नको!"

पलंगखान तसाच रागाचा खोटा बाहाणा करून म्हणाला, " मी हे

तोंडावरचे हिडिस्स डाग धुवून टाकीतोपर्यंत मलाही पलंगखान असेंच म्हणत जा. मी अजून एसाजी झालों नाहीं ! ''

येथें वाचकांना हें सांगितलें पाहिजे कीं तानाजी आणि एसाजी हे शिवाजीचे दोन मित्र अफगाण गस्तंगिरांच्या पेशानें दातेगडावरील भेद आणावयासाठीं गेलेले होते. ह्यासाठीं तानाजीनें खोट्या दाढीमिशा लावून आपली खरी जात आणि खरें वय लपविलें होतें. तो दिसण्यात अस्सल मुसलमानासारखा आणि पंचेचाळीस वर्षांच्या वयाचा झाला होता. एसाजीनें आपल्या तोंडावर एका वनस्पतीच्या मदतीनें हिडिस्स डाग पाडून घेतले असल्यामुळें तोही वयानें पुष्कळ मोठा दिसूं लागला होता आणि पेहेरावावरूनही हिंदू नसून तो मुसलमानासारखा दिसूं लागला होता. देशकार्यासाठीं तानाजी आणि एसाजी ह्यांनीं आपल्या रूपांत मुद्दाम असे फेरबदल ( अर्थात् अल्प कालापुरतेच ) करून घेतले होते.

---

## प्रकरण ३४ वें.

# गस्तंगीर शिवाजीला भेटतात.



शिवाजी आणि बाजी ह्या दोघांना तानाजी आणि एसाजी हे दोघेजण दातेगडावरील कामगिरी उत्तम रीतीनें करून सुखरूप परत येऊन आपणाला भेटले. ह्याबद्दल अतोनात आनंद झाला. तसेंच आपण पथकरलेली कामगिरी शिवाजीला पसंत पडेल अशा रीतीनें ती आपण पार पाडली, म्हणून तानाजी आणि एसाजी ह्यानाही अतोनात आनंद झाला. हे चवघे मित्र एकमेकांसाठीं प्राण देणारे होते. त्या चवघांची ह्या गवळीवाड्यात ह्यावेळीं अशा रीतीनें गांठ पडली; त्यामुळें सर्वांना अतिशय आनंद झाला.

एसाजी आणि तानाजी ह्यांना शिवाजी म्हणाला, '' तुम्ही दोघे सुखरूप आलेले पाहून आम्हाला फार आनंद होत आहे. आम्हाला तपशीलवार हकीगत मागाहून सांगा. पण मला अगोदर इतकें सांगा कीं, तुम्हाला कांहीं महत्त्वाच्या खबरा लागल्या काय ? ''

तेव्हां तानाजी म्हणाला, " होय. आम्ही पुष्कळ खबरा आणल्या आहेत, आणि त्या इतक्या महत्त्वाच्या आहेत कीं, तूं जरी आपली सोन्याची तुला करविलीस आणि निमें सोनें मला व निमें ह्या एसाजीला दिलेंस, तरी त्या खबरांची किंमत होणार नाहीं. आम्ही तोंडें धुऊन आणि मराठ्यांचे पोशाख करून येतों आणि नंतर तुला सगळी हकीगत सांगतों. "

थोडक्याच वेळांत तानाजी आणि एसाजी आपलीं तोंडें धुऊन आणि मराठी पोशाख करून शिवाजी बसला होता तेथें आले. तेथें बसतात तों त्यांचे पुढें दुधाचे कटोरे बत्ताशाने आणून ठेविले. दूध पिऊन ताजेतवाने झाल्यावर तानाजी आणि एसाजी हे दोघेजण दातेगडावरून आणलेल्या खबरा सांगावयाला सिद्ध होऊन बसले. या बैठकींत शिवाजी, तानाजी, एसाजी, आणि बाजी हे चवघेजण असून बत्ताशा,—ज्यानें नवागतांना दुधाचे कटोरे आणून दिले होते,—तो, असे एकंदर पांच असामी होते. ह्यांपैकीं पहिले चवघे सतरा आठरा वर्षांच्या वयाचे होते. बत्ताशा हा मात्र त्यांच्याहून थोडासा मोठा होता. तो स्वभावानें विनोदी असून ह्या चवघाच्या प्रेमाचा आणि भरंवशाचा होता.

शिवाजीने विचारलें, " तानाजी आणि एसाजी, तुम्हीं आतां ताजेतवाने झाला आहां. तुम्हीं दातेगडासंबंधाच्या काय काय खबरा आणल्या आहेत, सांगा पाहूं ? "

तानाजी म्हणाला, " आबा, आम्हीं पुष्कळ खबरा आणल्या आहेत. पण त्या कोणच्या सरणीनें सांगाव्या, हें आम्हाला अगोदर सांग. "

शिवाजीनें विचारलें, " तुझें म्हणणें मला नीट समजलें नाहीं. "

तानाजी म्हणाला, " आम्हीं तुझा निरोप घेऊन गेल्यापासून तों आज तुला येथें येऊन भेटेतोंपर्यंत आम्हाला ज्या ज्या क्रमानें ज्या ज्या खबरा लागल्या त्या त्या क्रमाने त्या त्या खबरा तुला सांगणें ही एक सरणी, आणि तूं आम्हाला प्रश्न विचारावे आणि आम्हीं तुला उत्तरें द्यावीं, ही दुसरी सरणी. तर कोणच्या सरणीने आम्ही तुला त्या खबरा सांगाव्या, तें आम्हाला सांग. "

तेव्हां शिवाजी म्हणाला, " मी तुम्हाला माहिती विचारतों ती मला द्या. माझे प्रश्न विचारणें संपलें म्हणजे उरलेली माहिती तुम्ही दुसऱ्या सरणीनें मला द्या. "

तानाजी म्हणाला, " ठीक. विचार आतां तुझे प्रश्न. "

शिवाजी म्हणाला, " तुम्हीं दातेगडाचा सर्व मुलूख पाहिलेला आहे. त्या मुलखांत हिंदूंची वस्ती अधिक आहे कीं मुसलमानांची वसती अधिक आहे ? हिंदूलोकांच्या मनात मुसलमानी अमलाबद्दल बेदिली आहे कीं खुषदिली आहे ? हिंदूंच्या राज्यांत आपणाला अधिक सुख प्राप्त होईल असे त्यांना वाटत आहे काय ? "

तानाजी म्हणाला, " खुद्द दातेगडावर मुसल्मानांची वसति अधिक आहे आणि सगळे अधिकारी मुसलमान आहेत. त्या गडाच्या ताब्यांतील मुलखांत मुसलमान लोक रुपायांत चार आणे आहेत. आम्ही दोघे जण मुसलमानी पेशांत त्या मुलखांत हिंडत असल्याकारणानें हिंदू लोक मोकळ्या मनानें आम्हाशीं बोलत नसत; पण ते मुसलमानी राज्याला कंटाळले आहेत, असें आम्हांला दिसून आलें. हिंदूंचें राज्य स्थापन झाल्यास ते सुखी होतील. हे मुसलमान लोक हिंदूंच्या धर्मावर कर लादतात, ही हिंदूंना अत्यंत चीड आणणारी गोष्ट वाटते. कोणी मुसलमानानें हिंदूचा कांहीं गुन्हा केला तर त्या मुसलमानाचा त्या हिंदूचें नुकसान करण्याचा इरादा नव्हता, ह्या सबबीवर तो मुसलमान सुटून जातो. आणि कोणा हिंदूच्या हातून एकाद्या मुसलमानाचा काहीं चुकून गुन्हा झाला, तर त्या हिंदूला जबरदस्त सजा देण्यांत येते. त्या दातेगडाच्या मुलखात असा एकही दिवस जात नाहीं कीं, ज्यांत एकादी गाय चवाठ्यावर कापली जात नाहीं, किंवा कोणा हिंदूचे जानवे तोडलें जात नाही, किंवा एकादें देऊळ भ्रष्ट केलें जात नाहीं, किंवा कोणा ब्राह्मणाच्या तोंडात मास कोंबलें जात नाहीं, किंवा एकादी स्त्री कोणा मुसलमानाच्या कामविकाराला बळी पडत नाहीं ! हिंदूचें स्वराज्य स्थापन झालें, तर सर्व लोकांना, हिंदूंना आणि मुसलमानांना, सारखेंच सुख प्राप्त होईल. "

शिवाजीनें विचारलें, "दातेगड आपणाला हस्तगत करून घेणें शक्य ाहे काय ? तो गड कितपत मजबूत आहे ?"

एसाजीनें उत्तर दिलें, " तो गड इतका मजबूद आहे की, त्याच्या टबंदीवर दहा हजार हत्तींनीं टकरा मारल्या तरी ती भंगावयाजोगी ाहीं. त्या गडावर उघड हल्ला करून तो गड जिंकून घेणें, ही अशक्य ोष्ट आहे. आपण केजळगडाच्या माथ्यावर वराती टाकून तो गड वेशलों तसा हा दातेगड आपणाला प्रवेशतां येणार नाहीं. कारण, ह्या ातेगडाची तटबंदी सर्व ठिकाणीं चार पुरुष उंच आहे. आणि हा गड या टेकडीवर बांधला आहे, तिच्या पायथ्यापासून तों तटबंदीच्या ाथ्यापर्यंत दहामाडांचे अंतर आहे. शिवाय, तटबंदीची भिंत ात आठ कदम रुंदीची आहे. ह्या सर्व कारणांनीं वरातींच्या सहाय्यानें ड घेणें अशक्य गोष्ट आहे. लाचाला वश होणारीं माणसें आपणांला टण्याचा संभव नाहीं. त्या गडावर फंदफितुरीही आपणाला करतां ईल, असें आम्हांला वाटत नाहीं. "

हें उत्तर ऐकून शिवाजी कांहीं वेळ चिंताग्रस्त मुद्रेनें स्वस्थ बसून ाहिला. मग त्याने पुन्हा एक प्रश्न विचारला, " बरें, पण दातेगडाचा डकरी आणि त्या गडावरील अधिकारी, ह्यांच्यांत बेबनाव तरी आहे ाय ? तसा गडकऱ्याशीं कोणा अधिकाऱ्याचा बेबनाव असला, तर ापणाला तो गड मिळवितां येईल. "

त्यावर तानाजी म्हणाला, " आबा, खुद्द गडकरी आणि त्याचा नापति ह्या दोघांत बेबनाव असल्याचा आम्हाला संशय आला. आज ावूदभाई गडकरी आहे. ही गडकऱ्याची जागा आपणाला मिळावी शी इलाहीबक्ष ह्याची इच्छा होती. पण आदिलशहाने गडकऱ्याच्या ागेचा मान दावूदला दिला आणि इलाहीबक्ष याला त्याच्याच हाता- ालीं सेनापतीची जागा दिली. ह्या कारणामुळें गडकरी गर्विष्ठ झाला ाहे आणि सेनापति असंतुष्ट झाला आहे. पण आबा, त्या दोघांत सा थोडासा कर्कशपणा असला, तरी ते दोघे हिंदूंच्या विरुद्ध एक- ठाने झटतील अशी आमची खात्री आहे. "

हें वर्णन ऐकून शिवाजी पुन्हां चिंताग्रस्त होऊन बसला. त्यानें ह्या-वेळीं आपली पाठ भिंतीला टेकली होती, पाय लांब पसरले होते, आणि डोळे मिटून तो ध्यानस्थासारखा बसून राहिला होता. अशा स्थितींत कांहीं वेळ बसल्यावर शिवाजीनें डोळे उघडले आणि तानाजी आणि एसाजी ह्यांचे मुखावर खिन्नतेची मुद्रा करून म्हटलें, "तुमच्या सर्व वर्णनावरून मला तो गड जिंकून घेण्याची कांहीं आशा वाटत नाहीं."

तेव्हां तानाजी त्याला धीर देण्याच्या स्वरानें म्हणाला, "आबा, तूं असा हातपाय गाळूं नको. आजपर्यंत आपण पुष्कळ गड जिंकून घेतले, तसा हाही गड आपण जिंकून घेऊं अशी माझी खात्री आहे."

शिवाजी म्हणाला, "पण तुम्ही सांगतां आहा त्यावरून तो गड आपणांस जिंकून घेतां येणार नाहीं असें मला वाटतें. पण तो गड आपण जिंकून घेऊं शकूं असें तूं म्हणतोस, तें कशाच्या जोरावर !"

तानाजीनें उत्तर केलें, "त्या गडावर हल्ला करून तो गड जिंकून घेणें जरी अशक्य असलें, तरी त्या गडांतील सैन्याला कांहीं तरी युक्तीनें गडाच्या बाहेर आणून त्यांना ठेचून काढणे हें शक्य आहे. गडांतील माणसें जर गडांत राहिलीं नाहींत, आणि गडाचे दरवाजे त्यांनीच जर सताड उघडे टाकले, तर त्या गडांत शिरावयाला आपणाला कोण हरकत करणार ?"

शिवाजीनें विचारलें, "पण गडांतील सैन्य बाहेर यावें कसें आणि आपणाला उघडे दरवाजे असलेला गड प्रवेश करावयाला मिळावा कसा?"

तानाजीनें उत्तर दिलें, "आम्हीं ती सर्व योजना करून ठेविली आहे. इतका वेळपर्यंत आम्हीं तुला गडाची स्थिति जशी आज आहे तशी वर्णन करून सांगितली, पण ती स्थिति बदलण्यासाठीं आम्हीं काय युक्त्या केल्या आहेत तें तुला आम्हीं अद्यापि सांगितलेलें नाहीं. तूं प्रश्न विचारलेस त्यांचीं आम्हीं उत्तरें दिलीं. आतां आम्ही काय काय केलें ते तुला सांगतों, ऐक."

शिवाजी म्हणाला, "सांगा."

---

## प्रकरण ३५ वें.

# दातेगडावरच्या गुप्त बातम्या.



वर सांगितल्याप्रमाणे तानाजी आणि एसाजी ह्यांनीं दातेगड शिवाजीला जिंकतां यावा म्हणून ज्या युक्त्या केल्या होत्या, त्या ऐकून घ्यावयाला शिवाजी आणि बाजी उत्सुक झाले होते. म्हणून शिवाजीनें त्या दोघां नवागतांना विचारलें, " तुम्हीं काय काय युक्त्या केल्या त्या सांगा. "

तेव्हा तानाजी म्हणाला, " दातेगडांतील सर्व सैन्य,— निदान बहुतेक सैन्य,—त्या गडाच्या बाहेर पडावें, यासाठीं आम्ही गडकरी आणि त्याचा सेनापति ह्यांच्याशीं तशाच धोरणानें बोललों. शिवाजीजवळ फार तर पाचसातशें शिपायी असून ते त्याच्या गडांवर वाटलेले आहेत, शिवाजीचे गड अशक्त आहेत, त्या गडांचे गडकरी त्याच्याचसारखे मूर्ख पोरगे आहेत, त्या गडांवर मुसलमानी सैन्यानें हल्ले केले तर एका दिवसांत एकएक गड सहज जिंकून घेतां येईल, यासाठीं गडकऱ्यानें आणि त्याच्या सेनापतीनें आपल्या सैन्याचे दोन भाग करून, एका भागानें उत्तरेकडचे गड जिंकावयाला निघावे आणि दुसऱ्या भागानें दक्षिणेकडचे गड जिंकावयाला निघावें, खुद्द दातेगड मजबूत असल्याकारणानें त्याचेवर हल्ला येण्याची मुळींच भीति नाहीं, असें आम्हीं त्या दोघांच्या मनांत भरवून दिले. आमची योजना गडकऱ्याला आणि त्याच्या सेनापतीला पटली. त्यांनीं तसेंच करावयाचा बेत ठरविला. आम्हीं गडावर होतों त्याचवेळीं बुऱ्हाणअल्ली ह्या नांवाचा एक जासूद बादशहाचे पत्र गडकऱ्याला घेऊन आला होता. त्या पत्रांत देखील बादशहानें हींच योजना गडकऱ्याला सुचविली होती. म्हणून गडकरी आणि सेनापति शिबंदीचे दोन भाग करून मऱ्हाठ्यांच्या ताब्यांतील गड जिंकावयाला लवकरच रवाना होणार आहेत. गडाच्या बाहेर तीं सैन्यें आलीं कीं आपण त्यांना ठेचून काढूं. मग गडांत सैन्य नाहीं असें झाल्याबरोबर आपण त्या गडांत प्रवेश करूं आणि त्या गडावर मऱ्हाठ्यांचें निशाण उभारूं. "

शिवाजीनें विचारलें, " बु-हाणअलीनें आणलेल्या पत्रांतलि मजकूर तुम्हाला कसा समजला ? आणि गडकऱ्यानें आणि त्याच्या सेनापतीनें निम्मे निम्में सैन्य घेऊन दातेगडाच्या बाहेर पडावयाचा बेत केला, हें तुम्हाला कसें समजलें ? "

तेव्हां तानाजी म्हणाला, " तेच सागतों. त्या दातेगडावर आपले दोन स्त्रीहेर आहेत, हें तुला ठाऊक आहेना ? "

शिवाजी म्हणाला, " होय. त्या हेरबायकाकडून तुम्हाला ही हकीगत कळली काय ? त्या बायकाचा तुम्हाला चांगला उपयोग झाला काय ? "

एसाजी म्हणाला, " होय, पुष्कळ झाला. "

शिवाजी म्हणाला, " तो कसा काय ? "

एसाजी म्हणाला, " त्या दोन स्त्रिया भिमाबाई आणि मुक्ताबाई ह्या होत्या, हें तुला माहीत आहेना ? "

शिवाजी म्हणाला, " होय. त्या दोन्ही स्त्रिया मला माहीत आहेत. भीमाबाई ही जंगली जयगडावर नारबाच्या संग्रहीं असतां मन्मथाच्या सौंदर्याला लुब्ध झाली, पुढे तिला उपरति झाली, पुढे ती योगिनीप्रमाणें राहूं लागली आणि नंतर देशकार्य करून आपल्या पापांचें क्षालन करावयाला सिद्ध झाली. मग ती दातेगडावर हेरांचें काम करावयाला गेली हें मला ठाऊक आहे. दुसरी स्त्री नांदेडची मुक्ताबाई तावरे. ती केंजळगडाच्या गडकऱ्याचा मुलगा पुंडरीक ह्याची लहानपणची दायी होती; तीही दातेगडावर हेर म्हणून गेली होती, हेंही मला ठाऊक आहे. पण पुढें त्यांनीं काम कसें चालविलें आणि त्यांना त्या कामीं यश कितपत आलें, तें मला अद्यापि कळलें नाहीं. "

तानाजी म्हणाला, " त्या दोन स्त्रिया दातेगडावर जावयाला निघाल्या तेव्हां मीच त्यांची रवानगी करून दिली. त्यावेळीं तूं केंजळगडावर होतास. भिमाबाई ही उत्तम कशीदा काढते, आणि शिवाय तिला रेशमाचें आणि कलाबतूचें भरतकामही उत्तम करतां येतें. मुक्ताबाईला बरोबर घेऊन भीमाबाई दातेगडावर गेली. तिनें आपले कशीदे गडावरच्या स्त्रियांना दाखविले. सेनापतीची बायको लतीफा हिला कशीद्याचा नाद

असल्याकारणानें, तिनें तिला आपणाला कशीदा शिकविण्याच्या कामावर ठेवून घेतलें. ती सदासर्वदा लतीफेच्या जवळ असतेच म्हणून तिचा स्वयंपाक करण्यासाठी लतीफेने मुक्ताबाईलाही ठेवून घेतली. ह्या दोघी बायांनीं आपण मराठे जातीच्या आहो आणि बहिणी आहो, असे लतीफेला सांगितलें. पण ह्या भिमाबाई आणि मुक्ताबाई यांनीं गंमत काय केली आहे ! त्या दोघीजणी मुक्या आणि बहिऱ्या म्हणून आपणाला म्हणवीत आहेत. त्यांचा सर्व व्यवहार खुणांनीं चालतो. त्या बहिऱ्या आहेत असा सर्वांचा समज असल्याकारणानें, त्याच्यादेखत हावा तो मनुष्य हावें ते बिनदिक्कत बोलतों. सेनापति इलाहीबक्ष आणि त्याची बायको लतीफा ह्याचे सर्व बेत, सर्व संभाषणें, सर्व मते, भीमाबाईला अनायासेच ऐकावयाला सापडतात. ती बहिरी आहे या समजुतीवर तिच्या देखत बोलावयाला सेनापति कचरत नाहीं. सेनापतीच्या ज्या मसलती त्या सर्व तो आपल्या पत्नीला सांगतो आणि त्या मसलती भिमीला ऐकावयाला मिळतात. भीमाबाई आणि मुक्ताबाई ह्या दोघी एकमेकींशी खुणांनींच बोलतात आणि त्या आपल्या मुद्रांवर उत्कृष्ट प्रकारें नियंत्रण घालावयाला शिकलेल्या आहेत. ह्या भीमाबाईकडून आम्हाला पुष्कळ माहिती मिळाली."

शिवाजी म्हणाला, "उत्तम. पण तुम्हाला बोलावयाला जागा कशी सापडली ?"

तानाजी म्हणाला, "तें सर्व मी क्रमानें सांगतों. आम्हीं त्या गडावर गेलो त्याच्या दुसऱ्या दिवशीं दुपारच्या सुमारास आम्हीं एका झाडाच्या छायेंत आमचे विकावयाचे जिन्नस मांडून बसलों. तेथें ती भीमाबाई मज कडे कांहीं रंगांच्या रेशमाच्या लडी विकत घ्यावयाच्या मिषानें आली. शेरखान आणि पलंगखान हे खरोखरीं कोण आहेत हे गडावरील इतर लोकांस ठाऊक नसलें, तरी भीमाबाई आणि मुक्ताबाई यांना ठाऊक होते. भीमाबाई आमच्याकडे रेशमाच्या लडी विकत घ्यावयाचा बाहाणा करून मजकडे आली. तिनें आपल्याबरोबर कांहीं वस्तु आणल्या होत्या. त्या वस्तूंच्या रंगाचे दोरे तिला पाहिजे असल्याचा बहाणा करून तिनें आपलें मनोगत मला कळविलें. ती ह्या गडाकडे रवाना व्हावयाच्या

समयीं आमची जी सांकेतिक भाषा ठरलेली होती, त्या भाषेंत तिने मला त्या गडाचें सामर्थ्य जाणविले. तिनें पंधरा वस्तु आणल्या होत्या त्यांत एक पांढरा वाल होता. त्यावरून मी समजलों की, त्या गडावर शंभर बंदुका आहेत. एक तांबडी गुंज तिच्या वस्तूंत होती. त्यावरून त्या गडावर एक वर्षाची अन्नसामुग्री आहे, असे मला कळून आलें. दोन गहूं जे तिनें दाखविले त्यावरून तेथें दोनशे घोडेस्वार आहेत, असें मला कळलें. तीन मसुराच्या डाळिंब्यावरून तीन मोठ्या तोफा त्या गडावर आहेत व पांच हरभऱ्याच्या डाळिंब्यावरून पाच लहान तोफा त्या गडावर आहेत, असें मला समजलें. तसेंच तीन उडदांच्या दाण्यांवरून तीन हजार शिपायी शिबंदींत आहेत असें मला कळलें. आम्ही ह्या सांकेतिक भाषेंत बोलत असतां आमच्याकडे जे जाणारे येणारे लोक पाहात होते, त्यांना कांहीं संशय येण्याचें कारण नव्हतें. मी तिला पांढऱ्या वालाच्या रंगाची एक लड दिली, तांबड्या गुंजेच्या रंगाची एक लड दिली. दोन गव्हाच्या रंगाच्या, तीन मसुराच्या डाळिंब्याच्या रंगांच्या, पाच हरभऱ्याच्या रंगाच्या, व तीन उडिदाच्या रंगाच्या लडी मी भीमाबाईला विकत दिल्या. त्या पंधरा पदार्थांवरून मला तिचें मनोगत समजलें, आणि इतर लोकांना त्या मुकीचा व्यवहार अगदीं साधा आणि सरळ असा वाटला. आम्ही कांहीं सांकेतिक भाषा बोलत आहों, असा कोणाला संशय देखील येण्याचा संभव नव्हता."

शिवाजी म्हणाला, "शाबास तुमची ! बरें पुढें ?"

तानाजी म्हणाला, "संध्याकाळी पुन्हा भीमाबाई मजकडे आली. ह्याही वेळी तिनें कांहीं लडी विकत घेतल्या, पण एका चिठ्ठीवर तिनें कांहीं शब्द घरून लिहून आणले होते, ती चिठ्ठी तिनें मला जाणाऱ्यायेणाऱ्या माणसांना न कळेल अशा सावधगिरीनें दिली, तसेंच एक गांठोडेंही तिनें मला दिलें."

शिवाजीनें विचारलें, "त्या चिठ्ठींत काय लिहिलें होतें आणि त्या गाठोड्यांत काय होतें ?"

एसाजी म्हणाला, "त्या चिठ्ठींत भिमाबाईनें आम्हाला मसलती करावयासाठीं मध्यरात्रीं सैतानहांड्याकडे बोलाविलें होतें, आणि तेथें त्या गांठोड्यांतील लहंगे पेहेरण्यास सांगितलें होतें."

शिवाजीनें विचारलें, " सैतानहांडा तो काय आहे ? "

तेव्हां एसाजी म्हणाला, " दातेगडाच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांत एक मोठा थोरला डोंगरांत खड्डा आहे. त्याचें तोंड हांड्यासारखें असून तो गर्भांत विस्तीर्ण आहे. तेथें भुताटकीचे प्रकार होतात अशी गडावरील सर्व लोकांची समजूत आहे, म्हणून त्याला 'सैतानहांडा' असें नांव मिळालेलें आहे. रात्रींच्या वेळीं त्या बाजूकडे कोणी माणूस फिरुक होत नाहीं. ह्या सैतानहांड्याचा आम्हीं उपयोग करून घेतला. "

नंतर तानाजी आणि एसाजी यांना गड दाखवितेवेळीं आजमल्लानें त्यांना जी त्या खड्ड्यांतील देखाव्यांची हकीगत सांगितली होती, ती त्यांनीं शिवाजीला सांगितली. नंतर त्या सैतानहांड्यासंबंधाच्या भुताटकीच्या प्रकाराचा फायदा घेऊन आपण चौघांनीं भुतांची कशी बतावणी केली, हेंही सांगितलें. आम्हीं दोघे दाढीमिशावाले आणि लहंगे पेहेरलेले पुरुष, आणि भिमाबाई आणि मुक्ताबाई ह्या दोन वेण्या घातलेल्या आणि मणगटांत बांगड्या घातलेल्या आणि मर्दानी पोशाखांत असलेल्या बायका, अशीं चार भुतें त्या खड्ड्यात पुष्कळवेळ बोलत होतों. येथे आमच्या बोलण्यांत कांहीं व्यत्यय येण्याची मुळींच शक्यता नव्हती. भुताटकीच्या दंतकथेला अनुसरून आमचा देखावा झाला होता. "

शिवाजी म्हणाला, " शाबास ! उत्तम ! दैवच तुम्हाला अनुकूल झालें असें म्हटलें पाहिजे. त्या सैतानहांड्यांत खरोखरींचीं भुतें असोत किंवा नसोत. परंतु ह्या भ्रमाचा तुम्ही उपयोग करून घेतला, इतकी गोष्ट खरी. त्या दोन स्त्रिया आणि तुम्हीं दोघे पुरुष अशा चवघांनीं भुतांच्या भूमिका करून आपला कार्यभाग साधून घेतला, यांत शंका नाहीं. बरें, पण त्या दोन स्त्रियांनीं तुम्हाला त्या सैतानहांड्यांत काय काय माहिती सांगितली ? "

तानाजी म्हणाला, " त्यांनीं आम्हाला तेथें पुष्कळ महत्त्वाच्या बातम्या सांगितल्या. "

शिवाजीनें विचारलें, " त्या कोणकोणत्या ? "

ह्या शिवाजीच्या प्रश्नाला तानाजी आणि एसाजी ह्यांनीं तपशीलवार

उत्तर दिलें. इलाहीबक्ष ह्यानें आपल्या पत्नीला जें जें सांगितलें होतें, ते तें मुक्या भीमाबाईने ऐकिलें होते. ही इत्थंभूत हकीगत भीमाबाईने सैतानहांड्यात तानाजी आणि एसाजी ह्याना सांगितली होती. ती त्यानीं आता शिवाजीला कळविली. ह्यावरून शिवाजीला ज्या ज्या गोष्टी कळणे जरूर होतें, त्या त्या सर्व गोष्टी कळल्या. गणवंतगड आणि त्याच्या लगतचे इतर गड जिंकावयाला गडकरी जाणार, प्रचितगड आणि त्याच्या लगतचे इतर गड जिंकावयाला इलाहीबक्ष जाणार, त्या दोघांच्या जवळ दीड दीड हजार शिपायांचे सैन्य असणार, ते दोघेजण ह्या मोहिमीसाठीं गडाच्या बाहेर असतां खुद्द गडामध्ये दोनशें शिपायी हमीदभाई आणि खुदाबक्ष ह्याच्या हुकमतींत असणार, विजापुराहून तीन हजार तरवारी, शंभर बंदुका व एक पोतेभर मोहोरा शंभर सशस्त्र शिपायांच्या संरक्षणाखालीं वरंचीच्या वाटेनें दातेगडाकडे येणार आहेत, आणि इतक्या सर्व गोष्टी आठदहा दिवसांच्या आंतच व्हावयाच्या आहेत, वगैरे सर्व गोष्टींचा तपशील शिवाजीला समजला.

तेंव्हां तानाजी आणि एसाजी ह्यांना शिवाजी म्हणाला, " गड्यांनो, तुम्हीं फार फार मूल्यवान् माहिती आणली आहे. तुम्हीं धाडस करून दातेगडावर गेला आणि ही माहिती आणिली, ह्याबद्दल तुमची तारीफ करणें जरूर आहे. ह्या माहितीच्या जोरावर मी दातेगड जिंकून घेईन अशी माझी खात्री आहे. तसेंच भीमाबाई आणि मुक्ताबाई यांचीही कामगिरी प्रशंसनीय आहे. "

तेंव्हां तानाजी म्हणाला, " आबा, एवढ्यावरच त्या दोघी स्त्रियांची धूर्तता आणि कर्तबगारी संपली असें समजूं नको. त्या दोघींनीं सावधगिरीची म्हणून एक बाबत आम्हांला सांगून ठेविली आहे. "

शिवाजीनें विचारलें, " ती कोणची ? "

तानाजीनें उत्तर दिले, "त्या दोघी स्त्रियांनीं आम्हांला बजावून ठेविलें आहे कीं, कार्तिक वद्य त्रयोदशीला म्हणजे गुरुवारीं दावूदभाई आणि इलाहीबक्ष हे स्वाऱ्यावर निघणार आहेत. ह्या त्यांच्या बेतांत जर कांहीं बदल झाला, तर आम्ही एक जळकें लांकूड धसाला तांबडें रेशीम गुंडाळून तीन बोरींच्या रोखानें गडाच्या तटावरून भिरकावून देऊं. जर तोच

बेत कायम असला, तर पांढरें रेशीम धसाला आडकावून लांकूड भिरकावूं."

तेव्हां शिवाजी म्हणाला, "दोघी स्त्रिया खरोखरी धूर्त आणि धोरणी आहेत. भीमाबाई आणि मुक्ताबाई ह्यांनीं हे हेराचें काम उत्तम केलें आहे. भीमाबाईनें पूर्वी केलेल्या पापांचे पूर्ण क्षालन झालें असें मी समजतों. देशाच्या उद्धारासाठीं त्या दोघींनीं आपला जीव इतक्या धोक्यांत घालून घेतला, हे त्यांना खरोखरीं फार श्रेयस्कर आहे. त्या दोघंजिणींची सुटका मी लवकरच्च करीन अशी माझी खात्री आहे."

तानाजी म्हणाला, "आबा, मुक्ताबाई आणि भीमाबाई यांनीं आम्हाला गडावरील गुप्त बातम्या त्या सैतानहांड्यांत सांगितल्या, व दातेगड जिंकून घेण्याच्या कामीं उपयोगी पडेल अशी माहिती आपणाला मिळाली, हें उत्तम झालें. पण त्या दिवशी एक भारी गमतीची गोष्ट घडली. सुखांत पर्यवसान झालें, म्हणून मी ती गमतीची गोष्ट म्हणतों. नाहींतर खरोखरी ती दुःखाची गोष्ट घडली, असें मी म्हटलें असतें."

शिवाजीनें आणि बाजीनें एकदम विचारलें "ती कोणची!"

तेव्हां तानाजी म्हणाला, "सांगतों. ऐका. ज्या दिवशीं आम्ही पठाण गस्तंगिरांच्या वेषांत दातेगडावर गेलों, त्याच दिवशीं त्या गडावर विजापुरच्या बादशहाकडून एक थैली घेऊन एक बुऱ्हाणअल्ली ह्या नावाचा जासूद दावूदभाईकडे आला होता. तो रात्रीच्या वसतीला गडावरच होता. त्याला सैतानहांड्याची बदनामी ठाऊक नव्हती. तो रात्रीं सैतानहाड्याकडे इराकतीला गेला. त्याचवेळीं कर्मधर्मसंयोगानें मी, हा एसाजी, भीमाबाई आणि मुक्ताबाई अशीं चार माणसें सैतानहांड्यांत खलबतें करीत होतों. बुऱ्हाणअल्लीला पुरुषवेषांत बायका आणि बायकीवेषांत पुरुष पाहून भीति वाटली. 'मेलों, मेलों, मेलो' अशा आरोळ्या ठोकीत तेथून तो पळाला, आणि शेवटीं बेशुद्ध होऊन एके ठिकाणीं पडला. त्याचे भोंवतीं गडांतील सर्व लोक गोळा झाले. त्यांनीं त्याला औषधोपचार करून शुद्धीवर आणलें. एव्हांना सैतानहांड्यांतील आमचें संभाषण संपलें होतें. आम्हीं कोणाच्या लक्ष्यांत न येतां त्या सैतानहांड्यांतून बाहेर पडलों.

भीमाबाई आणि मुक्ताबाई आपल्या घरीं गेल्या. मी आणि एसाजी असे दोघेजण आपले वेष पालटून, पुरुषींवेष धारण करून, नंतर बुऱ्हाण-अल्लीच्या भोंवतीं जमलेल्या गर्दीत मिसळलों, आणि बुऱ्हाणअल्लीच्या दुर्दैवी प्रसंगासंबंधाने हळहळीचे उद्गार इतर माणसाप्रमाणें काढीत राहिलों ! ''

शिवाजीने विचारलें, " बुऱ्हाणअल्ली बचावला ना ? ''

तानाजी म्हणाला, " होय, तो बचावला. तो भीतीनें मेला असता तर आम्हाला खरोखरीं दुःख झालें असतें. ''

शिवाजी म्हणाला, " तो बिचारा बचावला हें उत्तम झालें. ''

तानाजी म्हणाला, " आम्हीं गडावरील भेद आणावयाची कामगिरी पथकरून तिकडे गेलों होतों, आणि उपयुक्त माहिती आणली ही आमची कामगिरी उत्तम आहे कीं नाहीं ? ''

शिवाजी म्हणाला, " आलबत उत्तम आहे. आता पुढचे बेत तात-डीनें केले पाहिजेत. ''

तानाजी म्हणाला, " आबा, आम्हीं केलेली कामगिरी तुला पसंत पडली, हें पाहून आम्हाला फार आनंद होत आहे. तें असो. आतां पुढचे बेत लवकर केले पाहिजेत. कारण, मुसलमानांचे बेत हाणून पाडावयाला आपणाला अगदीं थोडा, म्हणजे पंधरा दिवसांचाच, अवधि काय तो शिल्लक आहे. ''

शिवाजी म्हणाला, " होय. आपणाला विचार करावयाला आणि सर्व गोष्टींची सिद्धता करावयाला अगदीं थोडा अवकाश आहे. आपण त्या उद्योगाला आतांपासून लागलेंच पाहिजे. ''

शिवाजीचे तेथें असलेले सर्व सवंगडी पुढचे बेत करावयाला सिद्ध झाले. त्यांचे बेत काय ठरले, तें कथाप्रसंगानें योग्यवेळीं वाचकाना कळून येईलच.

---

## प्रकरण ३६ वें.

# हमीदभाईचा पुढचा प्रवास.



हमीदभाई आणि त्याचे दोस्त ह्यांच्या हालचालींकडे आपण आतां वळूं.

शिवाजीचें मनुष्यबल आणि शस्त्रास्त्रबल किती आहे, हिंदू लोकांच्या मनांत मुसलमानी रियासतीसंबंधाने कितपत खुषदिली किंवा बेदिली आहे, वगैरेसंबंधानें माहिती काढण्यासाठीं हमीद आपल्या बारा दोस्ताना घेऊन दातेगडावरून निघाला, त्याचदिवशीं म्हणजे शनिवारीं पद्मिनीच्या अभिलाषाचें त्यानें पातक केल्यामुळें त्याचे चार दोस्त मरण पावले. आदित्यवारीं विपडीगांवच्या वसूंना उपद्रव दिल्यावरून त्याचे आणखी दोन दोस्त मरण पावले. त्याचदिवशीं शेवंतीचा अभिलाष केल्यामुळें हमीदचे आणखी दोन दोस्त मरण पावले. त्याच्याजवळ आतां फक्त चार दोस्त शिलक राहिले. ह्या चवघांच्या मदतीने त्यानें आता बापाच्या आज्ञेप्रमाणें शिवाजीच्यासंबंधानें माहिती मिळवावयाची असा निश्चय केला.

ह्या निश्चयाला अनुसरून तो आपल्या दोस्तासह मुलूख पहात पहात हिंडत असतां आणि भोजन, विश्रांति, वगैरेसाठीं जागोजाग मुक्काम करीत चालला असतां शनिवारच्या दिवशीं,—म्हणजे तो दातेगडावरून निघाला त्याच्याच पुढच्या शनिवारीं,—त्याला एका रानांत एका निर्जन ठिकाणीं कांहीं अंतरावर एक विस्तीर्ण देवालय दिसलें.

हें देऊळ शंकराचें होतें. तें फार जुनाट बांधणीचें होतें. हें देऊळ पहावें या उद्देशानें हमीद आणि त्याचे उरलेले चार दोस्त त्या देवळाकडे जावयाला निघाले. हें देऊळ निर्जनप्रदेशात होतें आणि ह्या विशिष्टसमयीं त्या देवळांत कोणी मनुष्य नव्हतें.

हमीद आणि त्याचे दोस्त ह्या देवळापुढें आले. दरवाज्याचीं दोन्ही पानें मोडून नाहींशीं झालेलीं होतीं. चवकट मात्र शाबूत होती. ही मुसलमानमंडळी घोड्यांवरून उतरली. त्यांनीं आपआपले घोडे झाडांना बांधले. मग ते देवळात शिरले. ह्या देवळांत सभामंडपाच्या

घुमटाच्या केंद्रस्थदगडाला एक कोयंडा असून त्याला एक लोखंडाची सांखळी लोंबत होती, आणि ह्या सांखळीला एक मोठी घंटा टांगलेली असून, तिच्यासभोंवतीं त्याच सांखळीला चार पांच लहान लहान घंटा टांगलेल्या होत्या.

ही सांखळी पाहून हमीदचा एक दोस्त अबदेअल्ली म्हणाला, "किती मूर्ख हे हिंदू लोक तरी ? देवाच्या दगडाच्या मूर्तीपुढे ह्या घंटा कशाला पाहिजेत ? "

दुसरा एक इसम तय्यबअल्ली म्हणाला, "अरे अबद्या, तूं बिलकूल गध्धा आहेस. इतक्या घंटा कशाला पाहिजेत म्हणून तूं विचारतोस. कशाला तें तुला कळत नाहीं ? मी सांगतों. "

अबदेअल्ली म्हणाला, "सांग पाहूं. "

तय्यबअल्ली म्हणाला, "ह्या हिंदूकाफीरांचे देव दगडाचे असतात. अर्थात् ते देव बहिरे असतात. आपण त्या बहिऱ्या देवाच्या दर्शनाला आलों, अशी त्या देवापाशीं आपली हजीरी लावण्यासाठीं ह्या घंटा ते वडवितात. आम्ही आलो आहों असें दगडाच्या बहिऱ्या देवाला ऐकूं आलें नाहीं, तरी जवळच्या माणसाना तें कळावें असा त्यांचा उद्देश. "

हें स्पष्टीकरण ऐकून सर्व मंडळी खो खो करून हंसली !

अबदेअल्ली म्हणाला, "तुझें म्हणणें बरोबर आहे. "

हीं बोलणीं होत असतां अबदेअल्ली त्या घांटेच्या सांखळीपाशीं येऊन ठेपला होता. त्याच्या पाठोपाठ तय्यबअल्लीही येत होता. अबदेअल्लीनें मोठ्या घांटेचा लोढणा तिच्या बाजूवर हापटावयाला हात घातला. त्याच्या हातांत तो लोढणा न यावा आणि घांट प्रथम वाजविण्याचा मान आपणाकडे यावा, म्हणून तय्यबअल्लीने घांटेच्या सांखळीला हात घालून ती आपणांकडे ओढली. अबदेअल्लीनें ती घांट आपणांकडे यावी, तय्यबअल्लीकडे जाऊं नये, म्हणून घांटेची सांखळी धरून आपणाकडे ओढली. तय्यबअल्लीने सांखळी आपणाकडे ओढावी, अबदेअल्लीने आपणाकडे ओढावी, अशी झटापट सुरूं झाली. केंद्रस्थ-कोयंड्याला जोराजोराचे धक्के बसले. सभामंडप जीर्ण झालेला असल्या-कारणानें तो केंद्रस्थ धोंडा स्वस्थानापासून निसटला, त्याच्या शेजारचे

घोडेही स्थानभ्रष्ट झाले, आणि तो सगळा घुमटचा घुमटच ढासळला! त्या घुमटाखालीं घंटेच्या सांखळीला हासडे मारीत असलेले ते दोघे मुसलमान, अबदेअल्ली आणि तय्यबअल्ली, चिरडले जाऊन त्यांची चटणी उडाली.

हा प्रकार होत आहे तों त्या देवळापुढून कांहीं अंतरावरून जात असलेल्या कांहीं हिंदू प्रवाशाना तो दुरून दिसला. देवळाच्या सभामंडपाचा घुमट एकदम का कोसळला म्हणून ते हिंदू प्रवासी त्या देवळाकडे लगबगीनें येऊं लागले. आपल्या दोन दोस्तांची ही वाट लागलेली पाहून आणि हिंदू प्रवासी या देवळाकडेच येत असलेले पाहून, हमीदभाई आणि त्याचे उरलेले दोन दोस्त त्या देवळांतून बाहेर पडले, आणि आपआपल्या घोड्यांवर आरूढ होऊन आणि त्या घोड्यांना टाचलून ते वायुवेगानें तेथून पळत सुटले! त्यांनीं पूर्वीं ठरल्याप्रमाणें गणवंतगडाची वाट धरली!

हे तीन घोडेस्वार इतक्या वेगानें त्या देवळापासून पळत सुटले कीं, हिंदू मुशाफर देवळापाशीं येतात तो, ते तीन मुसलमान त्यांच्या नजरेच्या टप्प्याच्या बाहेर गेले देखील!

हमीदभाई जो दातेगडाहून बारा दोस्तानिशीं निघाला, त्याच्या बारा दोस्तांपैकीं आतापर्यंत दहा दोस्त वात्रटपणामुळें किंवा पापाचरणामुळें मरण पावले. हमीदजवळ आतां दोनच दोस्त काय ते शिल्लक राहिले होते.

ह्या शिल्लक राहिलेल्या दोन दोस्तांसह हमीद गणवंतगडाच्या दिशेनें तेथून पळत सुटला!

पाठलाग होण्याची भीति टळल्यानंतर हे मुसलमान गडी संथ वेगानें वाट चालूं लागले.

त्यानंतर तीनचार दिवस हमीदभाई आणि त्याचे शिल्लक राहिलेले दोन दोस्त, या गांवाहून त्या गांवाला जात जात आणि वाटेंत कोणी मुसलमान मित्र भेटले, तर त्यांच्या जाफती खात खात, गणवंतगडाच्या रोखानें चालले होते. एके दिवशीं तिसऱ्या प्रहरानंतर ते प्रवास करीत असतां हमीद म्हणाला, " दोस्तांनो, आपण दातेगडावरून जी माहिती मिळवावयासाठीं निघालों, ती मिळविण्याच्या कामीं आतांपर्यंत आपल्या

हातून कांहींच प्रयत्न करण्यांत आलेला नाहीं. यासाठीं आपण आतां त्या कामाला लागलें पाहिजे, असें मला वाटतें. आपण परत दातेगडावर गेलों, आणि आपण कायकाय माहिती गोळा केली असें बाबांनीं आपणाला विचारलें, म्हणजे आपणाला कांहीं थोडीतरी माहिती देतां आली पाहिजे. ''

त्यावर सय्यदबिला म्हणाला, ''होय, हमिदसाहेब, तुम्हीं म्हणतां तें खरें आहे. आतांपर्यंत ह्या बाबतींत आपण कांहीं केलें नाहीं. पण आपण ह्या समोरच्या गणवंतगडाच्या मुलखांत गेलों, म्हणजे आपणाला जी माहिती पाहिजे आहे ती मिळवूं लागूं. आतापर्यंत आपण कांहीं केलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर आपले चार दोस्त मरण पावले, आणि चार बेपत्ता झाले. आतां आपण तिघेजण शिल्लक राहिलों आहों, तेव्हां गडकरीसाहेबांना जी माहिती पाहिजे आहे ती मिळविण्याचा आपण प्रयत्न करूं. ''

हमीद म्हणाला, '' तूं म्हणतोस तसेंच केले पाहिजे. तोच गणवंतगड असला पाहिजे असें मला वाटतें. आपण एकदोन घटकांच्या आंत तेथें जाऊन पोहोचूं. ''

यानंतर हे तीघे असामी संथवेगानें मार्गक्रमण करतां करतां त्याना रस्त्याच्या उजव्या बाजूस असलेलें एक देऊळ दिसलें. एका मोठ्या उंबराच्या झाडाखालीं एक दीडपुरुष उंचीचें खपरेल होतें. ह्या देवळाच्या दोन बाजूंस आणि पाठीकडे भिंती होत्या, आणि वर खपरेल होतें. हें शीतळादेवीचें देऊळ होतें. त्यांत सुमारें पन्नास साठ लहानमोठे धोंडे उतरणीच्या रूपानें मांडलेले होते. तेणेंकरून ते सर्व धोंडे एकदम दृष्टीस पडण्याजोगे होते.

ह्या उंबराच्या झाडाखालीं कांहीं वेळ उभे राहून थोडासा विसांवा घ्यावा, ह्या उद्देशानें आपले तीन प्रवासी त्या झाडाच्या दिशेनें चालूं लागले.

ह्या [illegible] फोडलेल्या नारळाचें एक अर्धुक तेथें त्या धोंड्यापुढें होतें. दुसरें अर्धुक प्रसाद म्हणून भक्तानें नेलें होतें.

सय्यदबिलाला नारळाचें अर्धुक दिसतांच तो घोड्यावरून उतरला. त्याच्या पाठोपाठ सय्यदशबीर उतरला. दोघांनीं तें अर्धुक फोडलें

आणि त्याच्या खोबऱ्याचे तीन भाग करून, त्यांतील एक त्यांनीं हमीदला दिला आणि दोन भाग आपण खाल्ले. तीघांनींही तें खोबरें गोड म्हणून त्याची फार वाखाणणी केली.

मग सय्यदबिला आपल्या दोस्तांना म्हणाला, " हें हिंदूकाफिराचें देऊळ दिसतें आहे. पण ह्यांत घडाविलेली मूर्ति एकही नसून हे नुसते धोंडेच माडले आहेत ! "

सय्यदशबीर म्हणाला, " हे हिंदू लोक बिलकूल गद्धे होत ! कोठला तरी एक धोंडा घेतात, त्याला शेंदूर फासतात आणि त्याला देव म्हणून भजूं लागतात.ह्यापैकीं कांहीं धोंड्यांना तर शेंदूर देखील फासलेला नाहीं."

हमीद म्हणाला, " हिंदू लोक कशाची नाहीं पूजा करीत ! त्यांचे देव दगडाचे असतात, लाकडाचे असतात, धातूचे असतात; ते झाडांना भजतात, नद्यांना भजतात, डोंगराला भजतात; ते लोक गायीला देव मानतात, घोड्याला देव मानतात, बैलाला देव मानतात, गाढवाला देव मानतात, सापाला देव मानतात. हे हिंदू लोक बिलकूल गद्धे होत. त्या सगळ्यांना आपल्या पवित्र धर्माची दीक्षा दिली पाहिजे ! "

याप्रमाणें ह्या तिघां मुसलमानांनीं हिंदूंची, हिंदूंच्या देवांची, हिंदूंच्या धर्माची पोटभर टवाळकी केल्यावर सय्यदबिला म्हणाला, " हे धोंडे कसले आहेत ते पाहातों. "

असें म्हणून त्यानें देवळांतील एक धोंडा हातांत घेतला. तो सर्व बाजूंनीं पाहून, त्यानें तो तुच्छतेनें दूर फेकून दिला. सय्यदशबीर यालाही तशीच खोडकरपणाची लहर येऊन त्यानेंही देवळांतील एक धोंडा उचलून घेतला व तो सर्व बाजूंनीं निरखून दूर भिरकावून दिला. सय्यदबिलानें आणखी एक धोंडा उचलून घेऊन तोही दूर भिरकावून दिला. देवळांतील धोंडे उचलून ते दूर भिरकावून देण्याचा त्या दोघांनीं सपाटा चालविला. परंतु अशा रीतीनें त्यांनीं निम्मे धोंडे भिरकावून दिले असतील तोंच त्या धोंड्यांत वसति करून राहिलेल्या नाग आणि नागिणीच्या जोडप्याला उपद्रव होऊन तीं दोन्ही जनावरें फुस्दिशी फूत्कार करून बाहेर आलीं. त्यांनीं सय्यदबिला आणि सय्यदशबीर

त्यांच्या शरीरावर अनेक ठिकाणीं दंश केले. हे नाग अति जहर असल्याकारणानें ते दोघे मुसलमान क्षणात गतप्राण झाले !

हमीद, जो हा प्रकार पहात होता,—त्याच्याकडे हे नाग धांवून जाऊं लागले. तेव्हा आतां एकटा हमीद विद्युल्लतेच्या वेगानें निघाला,तो गणवंतगडाच्या पायथ्याकडे जाऊं लागला. त्या दोन्ही नागांनीं सय्यदविला आणि सय्यदशर्वार ह्याच्या घोड्याना शंभर ठिकाणीं दंश करून त्यांनाही क्षणार्धांत गतप्राण करून सोडलें.

आता एकटा राहिलेला हमीद गणवंतगडाकडे जावयाला निघाला. वाटेंत त्याला कांहीं अडचणी आल्या नाहींत. तो जिवाच्या भीतीनें भरधाव घोडा सोडून निघाला ! लवकरच तो गणवंतगडाच्या पायथ्याशीं आला आणि तेथील गऊळवाड्यातील एका विशिष्ट झोपडीच्या रोखानें निघाला.

ह्या झोपडींत त्याचें स्वागत कसें काय झालें, ते पुढच्या प्रकरणीं आम्हीं वाचकाना निवेदूं.

---

## प्रकरण ३७ वें.

# हमीदभाई आणि बत्ताशा.



झोपडींत बसलेल्या मराठे देशभक्ताना हमीद याची मूर्ति स्पष्टपणे दिसत होती. त्याचीं सर्व गात्रे घामानें निथळत होतीं, त्याचे सर्व कपडे घामानें बहुतेक भिजून चिंब झाले होते आणि त्याचा घोडाही घामानें निथळत होता. स्वार आणि त्यानें आरोहिलेलें जनावर हीं दोघें अतिशय दमलेलीं होतीं.

ह्या स्वाराला झोपडीकडे येताना पाहताच त्याला तानाजी आणि एसाजी ह्यांनीं तत्काळ ओळखिलें. कारण गस्तांगिराच्या वेशानें ते जेव्हां दातेगडावर गेले होते, तेव्हां दावूदभाई गडकरी ह्याच्याजवळ हमीद बसलेलाच होता. हमीदला मात्र तानाजी आणि एसाजी ह्यांची ह्यावेळीं

पंचेचाळीस वर्षांचा मुसलमान दिसत असून, एसाजी तोंडावरील हिडिस डागांच्या योगानें आणि निबरपणामुळें फारच पालटलेला असा तीस वर्षांच्या वयाचा तो दिसत होता.

असी. झोपडीकडे हमीदला येताना पाहून तानाजीनें त्याला तत्काळ ओळखून शिवाजीला म्हटलें, " आबा, हा दातेगडाच्या गडकऱ्याचाच मुलगा ! इकडे कशाला बरें येत आहे ? "

एसाजीनेंही हमीदला ओळखून म्हटलें, " होय, हा हमीदच ! आपल्या तावडींत बरी शिकार सांपडली आहे ! "

शिवाजी म्हणाला, " तो जर दातेगडाच्या गडकऱ्याचा मुलगा असला तर त्याला अडकावून ठेवला पाहिजे. आपण जी मोहीम सुरू करणार आहों, तीत जर आपली फसगत झाली, तर ह्या हमीदच्या जोरावर दुसऱ्या पुष्कळ गोष्टी आपणाला साधतां येतील. "

नंतर बत्ताशाकडे वळून शिवाजी त्याला म्हणाला, " बत्ताशा, तूं हें काम कर. हमीदशीं गोड गोड बोलून त्याला फसवून गडावर घेऊन ये. त्याला आसारमहालात आपण कोंडून ठेवूं. जगोबा, पांडोबा, बाळोबा, ह्यांना घे आपल्या मदतीला. आम्हीं गडावर जाऊन बाकीची कामगिरी करतों. "

बत्ताशानें म्हटलें, " हें काम माझ्याकडे लागलें. काम असें करतों कीं यंवरे यंव ! तुम्ही बाकीचे लोक जा गडावर. "

तेव्हां शिवाजी, तानाजी, एसाजी, बाजी वगैरे लोक झोपडीच्या मागल्या दारानें बाहेर पडले. ह्याच समयीं हमीद पुढच्या दरवाजाशीं येऊन ठेपला. ही मंडळी हमीदच्या दृष्टीस पडली नाहींत.

हमीद झोपडीच्या दाराशीं येताच बत्ताशा बाहेर आला आणि त्यानें लवून हमीदला मुजरा केला. त्याचा हमीदनें स्वीकार केला, तेव्हां बत्ताशा त्याला म्हणाला, " खाविंदाना काय पाहिजे आहे ? ह्या बंद्या सेवकाच्या हातून कोणती सेवा घ्यावयाची खाविंदाची इच्छा आहे ? "

हमीद ह्या नम्रपणाच्या विनंतीनें खूष होऊन म्हणाला, " मला तुझ्या ह्या झोपडींत एक दिवस उतरावयाला जागा देशील काय ? पण तुम्ही हिंदू काफी......तुम्ही हिंदू लोक आम्हां मुसलमानांचा विटाळ आपल्या

घरांना होऊं देत नाहीं, असें मी ऐकिलें आहे. तूं कोण हिंदूच आहेस ना ?"

बत्ताशा म्हणाला, "होय खाविंद, मी हिंदू आहे. मी जातीचा मराठा. मी गवळ्याचा धंदा करतों. खाविंदांनीं माझ्या गरीबाऊ झोपडींत प्रवेश केला असतां तिला विटाळ होईल, असें मी समजत नाहीं. माझी झोपडी पवित्र झाली असें मी समजेन. खाविंदांनीं घोड्यावरून उतरून माझ्या झोपडींत येण्याची मेहेरबानी करावी."

हमीद घोड्यावरून उतरतो आहे तोंच जगोबा तेथें हजर झाला. तो घोड्याचा लगाम हातांत धरून जाऊं लागला, तेव्हां बत्ताशा हमीदला म्हणाला, "हा जगोबा माझाच माणूस आहे. हा जगोबा खाविंदांच्या घोड्याच्या स्वास्थ्याच्या सर्व तजवीजी करील."

असें म्हणून बत्ताशा झोपडींत शिरतांना म्हणाला, "खाविंदांनीं माझ्याबरोबर यावें."

बत्ताशा झोपडींत शिरला आणि घाईघाईनें त्यानें एक घोंगडी जमिनीवर आंथरली. मग हमीदकडे नम्रपणाची नजर करून तो त्याला म्हणाला, "खाविंदांनीं ह्या माझ्या गरीबाऊ झोपडींतील ह्या गरीबाऊ घोंगडीवर बसण्याची मेहेरबानी करावी."

हमीद त्या घोंगडीवर बसला. कांहीं वेळ बसून स्वस्थ झाल्यावर तो बत्ताशाला म्हणाला, "भल्या माणसा, तूं मला ओळखतोस काय ?"

बत्ताशा म्हणाला, "खाविंद, मी आपणाला पूर्वीं कधीं पाहिलेलें नव्हतें. आपलें नांव गांव मला कांहीं ठाऊक नाहीं. परंतु माझ्या मनांत कांहीं तर्क आला आहे. परंतु खात्री नाहीं."

हमीदनें विचारलें, "तुझा तर्क काय आहे ?"

बत्ताशा म्हणाला, "आपल्या चेहेऱ्याची रुबाबदारी, आपल्या शरीराची गोंडस घडण, आपल्या वर्तनाचा सभ्यपणा, आपल्या आवाजीची खुमारी, आपल्या भाषणसरणीची रसिकता, आपल्या नजरेवरून व्यक्त होणारी आपल्या अंतःकरणाची पवित्रता, मजसारख्या यःकश्चित् हिंदूशीं बोलतांना आपण दाखवीत आहां ती मेहेरबानी, ह्या आणि अशाच दुसऱ्या गोष्टींवरून मला असें वाटतें कीं आपण...आपण..."

हमीद खुषींत येऊन म्हणाला, " बोल, बोल भिऊं नको, बोल. "

बत्ताशा म्हणाला, " आपण विजापुरच्या दरबारच्या मानकऱ्याचे किंवा कोणा बड्या अधिकाऱ्याच्या चिरंजीवाच्यापेक्षां वरच्या प्रतीचे गृहस्थ असावेत, असें मला वाटतें. कदाचित् आपण विजापुरच्या बादशहाचे चिरंजीवही असाल. "

हमीदच्या अभिमानाला ह्या बत्ताशाच्या तर्कानें गुदगुल्या होत होत्या. आपण कोणी तरी बडे गृहस्थ आहों असें बत्ताशाला वाटत आहे हें फार चांगलें आहे, असें हमीदला अंतर्यामीं वाटत होतें. बत्ताशाचा आपल्या संबंधाचा हा ग्रह कायम रहावा, अशी हमीदची इच्छा होती. म्हणून बत्ताशानें केलेला हा तर्क ऐकून हमीद नुसता हंसला, पण कांहीं बोलला नाहीं. तेव्हां बत्ताशा म्हणाला, " खाविंदांनीं माझा तर्क खरा असल्यास तसें मला कळविण्याची मेहेरबानी करावी. हा बत्ताशा खाविदांचा बंदा गुलाम आहे. माझ्या हातून अविचाराचें कांहीं कृत्य होईल, अशी खाविंदांनीं शंका बाळगूं नये. पुष्कळ बडे गृहस्थ, आपला खरा दर्जा प्रकट होऊं न देतां, साध्या माणसांप्रमाणें प्रवास करीत असतात. ते सामान्य लोकांत मिळूनमिसळून रयतेची स्थिति जाणूम घेत असतात. ह्या बड्या लोकांचा बडा दर्जा रयतेला कळला, तर कोणी खरी स्थिति मनमोकळें करून बोलून दाखवीत नाहींत. "

हमीद म्हणाला, " मी कोण आहें हें समजून घेऊन तुला काय करावयाचें आहे ? तूं कोण आहेस, तुझा उद्योगधंदा काय आहे, तुझीं माणसें कोण कोण आहेत, वगैरे ऐकावयाची माझी इच्छा आहे. "

तेव्हां बत्ताशा म्हणाला, " माझें नांव बत्ताशा. मी जातीचा मराठा. माझें लग्न झालेलें नाहीं. मला आईबाप, भाऊबहीण, वगैरे कोणी नाहीं. मी गवळ्याचा धंदा करतो. मी प्रामाणिक गवळी आहे, अशी ह्या गणवंतगडाचे गडकरी मंदारराव ह्यांची खात्री असल्याकारणानें, माझाच रतीब त्यांच्या घरांत चालूं आहे. दुसरे पुष्कळ लोक गवळ्याचा धंदा करतात; पण त्यांच्याकडून दूध न घेतां, गडकरीसाहेब माझ्याचकडून दूध घेतात. "

हमीदनें विचारलें, " तुझ्या किती म्हशी आहेत, त्यांचें दूध किती

निघते, त्यापैकीं तूं किती स्वतःसाठीं ठेवून घेतोस आणि किती दूध गडकऱ्याच्या घरीं घालतोस ? ”

बत्ताशा म्हणाला, “ माझ्या दोन म्हशी आहेत, त्याचें रोज दूध सोळा शेर निघतें. मी स्वतःसाठीं दोन शेर दूध ठेवून घेतों आणि चवदा शेर दूध गडकरीसाहेबांकडे घालतों. ”

हमीदनें विचारलें, “ तर मग गडकरीसाहेबाच्या कुटुंबातील माणसांची आणि तुझी चांगली ओळख असेल ? ”

बत्ताशानें उत्तर दिलें, “ अलबत आहे. ”

हमीदनें विचारलें, “ तूं रोज गणवंतगडावर जातोस काय ? ”

बत्ताशा म्हणाला, “ होय खाविंद. मी रोज गडावर जातों. ”

हमीदनें विचारलें, “ तूं जर दररोज गडावर जातोस, तर तुझ्या ओळखीचे पुष्कळ लोक तेथें असतील ?”

बत्ताशानें उत्तर दिलें, “ होय खाविंद, सर्व लोकांत माझें जाणें आहे, सर्व लोकांत माझी चहा आहे, सर्व माणसें हरएक कामांत माझी सल्लामसलत विचारतात, प्रसंगविशेषीं गडकरीसाहेब देखील माझी सल्ला घेतात.”

जी माहिती मिळविण्यासाठीं हमीद दातेगडावरून निघाला होता ती माहिती ह्या बत्ताशाकडून मिळण्याचा संभव आहे, हे पाहून हमीदला अतिशय आनंद झाला. त्यानें बत्ताशाला पुष्कळ माहिती विचारून घेतली. शिवाजी हा कोण आहे, त्याचे अनुयायी कोण कोण आहेत, त्याचें सैन्य किती आहे, त्याच्याजवळ दारूगोळा वगैरे लढाईचा सरंजाम किती आहे, त्यानें जिंकून घेतलेले गड कितपत मजबूत आहेत, त्याची चटणी उडवावयाला किती सैन्य विजापूरच्या बादशहाला त्याच्याविरुद्ध पाठवावें लागेल, शिवाजीच्या अनुयायांत कोणकोण लोक लांचाला, मानाला, अधिकाराला वगैरे भुलण्याजोगे आहेत, वगैरे अनेक प्रश्न हमीदनें बत्ताशाला विचारले. त्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें बत्ताशानें तपशीलपणें हमीदला दिलीं. तीं ऐकून हमीदला फार आनंद झाला. कारण बत्ताशानें शिवाजीची, त्याच्या दोस्तांची, त्याच्या अनुयायांची, त्याच्या सैन्याची, त्यानें जिंकून घेतलेल्या गडांची खूब निंदा आणि टवाळकी केली. त्या काळच्या मुसल-

मान लोकांना शिवाजीची कोणी निंदा किंवा टवाळकी केलेली फार गोड वाटत असे.

अशा रीतीने हमीदला खूप करण्यांत आणि खुषींत ठेवण्यांत बत्ताशाचा कांही उद्देश होता काय ? होय होता. शिवाजीनें बत्ताशावर जे काम सोपविलें होतें, ते साधावयासाठीं हमीदला खूप ठेवणें जरूर होतें. हें जें कार्य शिवाजीसाठीं बत्ताशाला साधावयाचें होतें, त्या कार्याचा उपक्रम करावयासाठीं तो म्हणाला, " शिवाजीच्या ताब्यातील हा गणवंतगड इतका अशक्त आहे, तरी त्या गडाचा गडकरी तो गड मजबूत करण्याची कांहींदेखील तजवीज करीत नाहीं. तो गडकरी आपल्या सुंदर बायकोच्या सहवासांत आपला सारा दिवस घालवितो. त्या गडकऱ्याला सुंदर पोरी पहावयाला फार आवडतात. त्यानें आपल्या बायकोच्या तैनातीला ज्या दासी टेविल्या आहेत, त्या साऱ्या स्वर्गीच्या पऱ्याच आहेत ! त्या दासींमध्यें एक दासी तर इतकी सुंदर आहे कीं, तिला खाविंदांनीं पाहिलें तर खाविंदांना तहानभुकेचा विसरच पडेल ! "

हमीदने विचारले, " इतकी सुंदर ती पोरगी आहे काय ? "

बत्ताशानें उत्तर दिले, " होय खाविंद ! "

हमीदनें विचारलें, " तिचें नाव काय ? तिचें वय काय ? तिला लग्न करावयाचें नाहीं कीं लग्न झालेले आहे ? तिचे आईबाप कोण आहेत ? ती कोणच्या जातीची आहे ? "

त्यावर बत्ताशाने उत्तर दिलें, " तिचें नांव ज्युलिया. ती जातीची मुसलमान. गुलामांच्या व्यापाऱ्यापासून गडकऱ्यांनीं तिला विकत घेतलें. तिला आईबाप कोणी नाहींत. 'मी श्रीमंत मुसलमानाशींच लग्न करीन' असा तिचा हट्ट आहे. ती श्रीमंत मुसलमानाची राख देखील होऊन रहावयाला तयार आहे. "

हमीदनें विचारले, " ती माझ्या नजरेस पडेल काय ? "

बत्ताशा म्हणाला, " आलबत पडेल. तिला गणवंतगडावर हावैतिकडे हिंडावयाची परवानगी आहे; पण तिला गडाच्या बाहेर पडावयाची परवानगी नाहीं. "

हमीदनें विचारलें, " ज्युलिया जर गडाच्या बाहेर पडूं शकत नाहीं, तर ती माझ्या दृष्टीस कशी पडावी ? "

बत्ताशा म्हणाला, " त्यात कांहीं कठिण नाहीं. गणवंतगडावर माझा सर्व ठिकाणीं प्रवेश होतो. मला सर्व लोक ओळखतात. खाविंदांनीं मजबरोबर गडावर येण्याची मेहेरबानी केली, तर आजच्या आज खाविंदांना ती सुंदर ज्युलिया पहावयाला मिळेल. "

हमीदनें आशाळभूतपणानें विचारलें, " ती कशी ! "

---

## प्रकरण ३८ वें.

# हमीदभाई आसारमहालांत कैदी.



"ज्युलिया आपणाला कशी पहावयाला मिळेल ?" असा प्रश्न हमीदनें विचारला, तेव्हां त्याला बत्ताशा म्हणाला, " गणवंतगडावर आसारमहाल ह्या नांवाचा एक विस्तीर्ण महाल आहे. त्या महालांत बिछायत नेहेमीं सज्ज असते. त्या महालांत सकाळीं आणि संध्याकाळीं ताजें पाणी भरण्याचें काम माझेकडे असतें. त्या महालाची रोज झाडलोट करण्याचेंही काम माझ्याचकडे असतें. "

हमीदनें विचारलें, " हा महाल त्या सुंदर दासीला निजावयासाठीं राखून ठेविलेला असतो कीं काय ? "

बत्ताशा म्हणाला, " छेः छेः ! त्या दासीला कोण तो महाल निजावयाला देणार ! त्या महालाचा काय उपयोग करण्यांत येतो तें मी खाविंदांना सांगतों. ह्या गडाचे गडकरी मंदारराव हे शिवाजीचे नोकर. तो शिवाजी ह्या गडावर जेव्हां येतो, तेव्हां त्याला आणि त्याच्या दोस्तांना बसावयासाठीं आणि निजावयासाठीं हा आसारमहाल सदा सज्ज ठेवावा लागतो. ते लोक केव्हां इकडे येतील त्याचा नेम नसतो, म्हणून हा आसार महाल नेहेमीं सज्ज ठेवावा लागतो. "

हमीदनें विचारलें, " बरें, पण त्या महालाचा तुला काय उपयोग करून घेतां येण्याजोगा आहे ! "

तेव्हां बत्ताशा म्हणाला, " शिवाजी ह्यावेळीं भोपाळगडावर आहे, आणि तो आणखी एक महिना इकडे यावयाचा नाहीं. त्या महालांत जर खाविंद मजबरोबर आले, तर तेथें ज्युलियाला मी आज किंवा उद्या आणूं शकेन. "

हमीदनें विचारलें, " आजच्या आज ती सुंदरी माझ्या दृष्टीस पडणार नाहीं काय ? "

बत्ताशा म्हणाला, "मी तसा प्रयत्न करीन आणि आजच ज्युलियाला खाविंदांच्या भेटीस आणीन; पण नच जमलें तर उद्या, किंवा परवा तरी खास आणीन. "

हमीदनें विचारलें, " तोंपर्यंत मी तेथेंच राहावयाचें काय ? आणि तोंपर्यंत माझ्या जेवणाखाण्याची तजवीज कशी होऊं शकेल ? "

बत्ताशा म्हणाला, " हें तर अगदीं सोपें आहे. मी मंदाररावांच्या घरीं दूध घालतों. ह्याबद्दल मला दर महिन्याला रोख पगार मिळून शिवाय सकाळसंध्याकाळ एक भोजनाचें ताट मिळतें. हें ताट मी खाविंदांना पोंचवीत जाईन. "

हमीद म्हणाला, " तुझी युक्ती सोळाआणे आहे. तूं जर ज्यूलियाची आणि माझी भेट करून दिलीस, तर मी तुला शंभर मोहोरा बक्षीस देईन आणि तूं म्हणशील त्या गांवीं तुला रहावयाला एक टुमदार घर विकत घेऊन देईन. तुला लग्न करावयाची इच्छा असल्यास, आणखी शंभर मोहोरा मी तुला बक्षीस देईन. "

बत्ताशा म्हणाला, " खाविंदांनीं मला जी बक्षीसी देऊं केली आहे, तींत माझा संतोष आहे. मला ज्यास्ती कांहीं नको. "

हमीद म्हणाला, "तर मला केव्हां तूं ह्या गडावर घेऊन जाशील ? पण बत्ताशा, ह्या सर्व गोष्टी अत्यन्त गुप्तपणानें झाल्या पाहिजेत, बरें का ! "

तेव्हां बत्ताशा म्हणाला, " खाविंद, हें आपण न बजावतां मी केलेंच असतें. कारण, आपण हल्लीं अज्ञातप्रवासी ह्या नात्यानें हिंडत आहां, हें मी जाणून आहें. आपला मागमूस ह्या गडावर कोणालाही मी लागूं देणार नाहीं. सर्व गोष्टी अशा मानभगिरीनें करतों कीं, खाविंद

माझी पाठ थोपटतील. आसारमहालांत खाविंदांना निदान एक महिना गुप्तपणें राहावयास सापडेल !"

हमीद म्हणाला, "बेश ! तर मला तिकडे केव्हां नेतोस ?"

बत्ताशानें उत्तर दिलें, "खाविंदाची इच्छा असल्यास आत्तांच्या आतांच मजबरोबर यावें."

हमीद म्हणाला, "हा मी तयार आहे." असे म्हणून हमीद उठून उभा राहिला, आणि म्हणाला, "पण येथे माझा घोडा आहे, त्याची व्यवस्था कशी करशील ?"

तेव्हा बत्ताशा म्हणाला, "ह्या झोपडींत माझे जगोबा, पांडोबा आणि सदोबा असे तीन दोस्त असून आम्ही वसतीला येथें असतों. आम्ही खाविंदांच्या घोड्याची उत्तम व्यवस्था ठेवूं, अशी खाविंदांनीं खात्री बाळगावी."

हमीद म्हणाला, "बत्ताशा, तुझें जेवण तू मला दिल्यावर तूं काय जेवशील ?"

बत्ताशा म्हणाला, "आम्ही चवघेजण ह्या झोपडींत भाकऱ्या करून खाऊं. खाविंदांनीं चलावें माझ्याबरोबर. मी खाविंदांना आसार-महालांत नेऊन पोंचवितों, आणि आपणाला जेवणाचें ताट आणून देतों. मग मी जाऊन ज्युलियाला आपल्या भेटीला घेऊन येतों."

हमीद म्हणाला, "ठीक, चल."

नंतर हमीदला बरोबर घेऊन बत्ताशा गणदंतगडाची वाट चढूं लागला. ते मुख्य दरवाजातून गडांत शिरले. दरवानांना शिवाजीनें आगाऊ सूचना देऊन ठेविलेली असल्याकारणानें त्यांनीं बत्ताशाच्या बरोबर येणाऱ्या ह्या नवागताला हटकलें नाहीं.

बत्ताशा आणि हमीद हे दोघेजण आसारमहालांत प्रविष्ट झाले. ह्या महालातील पंचधावनाच्या आणि निजण्याबसण्याच्या सर्व सोयी बत्ताशानें हमीदला दाखवून दिल्या. नंतर तो भोजनाचें ताट आणावयासाठीं त्या महालांतून बाहेर पडला. ताट आणून दिल्यावर हमीदचें भोजन झालें. ते झाल्यावर हमीद बत्ताशाला म्हणाला, "बत्ताशा, आजच्या आज जर तूं मजकडे त्या [illegible] आणून

भेटविलेंस, तर मी तुला शंभराच्याबद्दल दोनशे मोहोरा बक्षीस देईन! कसेंही करून आजच जुलियाला घेऊन ये."

बत्ताशा म्हणाला, "होय खाविंद, मी ज्यूलियाला घेऊन येतों. ती आजच येईल असें करतों. पण ती आज नाहीं आली, तर उद्या तरी तिला येथें खास आणीन, अशी खाविंदाची खात्री असावी."

हमीद म्हणाला. "बत्ताशा, उद्याची गोष्ट बोलूंच नकोस. तुला मी तीनशे मोहोरा बक्षीस देईन."

बत्ताशा म्हणाला. "खाविंदानीं मला तीनशे मोहोरा दिल्या तर तीन पिढ्यांना त्या पुरतील. मी ज्युलियाला आतांच घेऊन येतों."

असें हमीदला उत्तर देऊन बत्ताशा आसारमहालांतून बाहेर पडला. बाहेर पडल्यावर त्यानें त्या महालाला बाहेरून कडी घातली, हे सांगणें नकोच!

आसारमहालाच्या दाराला बाहेरच्या बाजूनें कडी लावून आणि पहारेकऱ्याला जागरूक राहाण्याविषयीं ताकीद देऊन, बत्ताशा शिवाजीकडे आला. शिवाजी, तानाजी. एसाजी आणि बाजी हे चवघेजण गडाच्या पायथ्याशीं असलेल्या गउळवाड्याच्या झोपडींतून अगोदरच गडावर आले होते, हे आम्ही वाचकांना मागेच कळविलें आहे.

बत्ताशा शिवाजीला म्हणाला, "आबा. तुझ्या सांगण्याप्रमाणें मी हमीदला गडावर आणून आसारमहालात कोंडून ठेविलें आहे."

शिवाजी म्हणाला, "शाबास, बत्ताशा, शाबास, तूं लोकाना फसविण्याच्या कामांत फार पटाईत आहेस. पण तूं ह्या हमीदला कोणची युक्ति करून फसवून आणलेंस?"

बत्ताशा म्हणाला, "आबा, प्रथम हमीदनें तुझ्यासंबंधानें, तुझ्या दोस्तांसंबंधानें, तुझ्या अनुयायांसंबंधानें, तुझ्या गडासंबंधानें चौकशी केली. मी त्याला असे चकविलें कीं ज्याचे नांव ते! तानाजी आणि एसाजी हे दोघे दातेगडावर गेले. तेव्हां त्यांनीं ज्या धोरणानें तुझ्यासंबंधानें गडकरीवगैरेना माहिती सांगितली, त्याच धोरणानें मी हमीदला माहिती सांगितली. दातेगड हा अजिंक्य किल्ला आहे, त्याच्यावर हल्ला

करून तो जिंकून घेणें आपणाला अशक्य, म्हणून त्या गडांतील सैन्याला गडाच्या बाहेर ओढणें इष्ट आहे. त्या सैन्यानें आपणां मराठ्यांच्या गडांवर हल्ले करावे, आणि आपण त्या सैन्याची चटणी उडवून द्यावी, म्हणून मी हमीदशीं त्या धोरणाने बोललों. मी त्याला शिवाजीचे किल्ले अशक्त आहेत, त्याचें सैन्य थोडें आणि नादान आहे, त्याच्याजवळ युद्धसामग्री कीती आहे इत्यादि माहिती सांगितली. आपल्या गडावर हल्ला करावयासाठीं दावूदनें सैन्यानिशीं बाहेर यावें, या धोरणानें मी बोलत होतों. यदाकदाचित् हमीदला जर आपण पकडूं शकलों नाहीं आणि तो जर आपल्या तावडींत सांपडला नाहीं तर तो आपल्या बापाचें मन आपणा मऱ्हाठ्यांच्या गडावर हल्ला करावयाला वळवील, आणि आपलें काम अनायासेंच साधेल !"

शिवाजीनें विचारलें, " हें तूं केलेंस, तें योग्य केलेंस. पण ज्याअर्थी हमीद आपल्या तावडींत सांपडला आहे, त्याअर्थी हमीद आपल्या बापाचें मन वळवावयाला जाईल, ही गोष्ट आंता दूरच आहे. पण तूं त्याला कसें जाळ्यांत पकडलेंस, तें सांग."

बत्ताशा म्हणाला, " मी हमीदला बोलण्याचा ओघ मुद्दाम वळवून असें सांगितलें कीं, तूं जर गणवंतगडावर आलास तर तुला ज्युलिया नांवाची एक सुंदर पोरगी मिळवून देईन ! "

शिवाजी म्हणाला, " आणि अशा थापबाजीवर हमीद तुझ्या जाळ्यांत अडकला ! "

बत्ताशा म्हणाला, " होय. बरें आबा, तुझ्या इच्छेप्रमाणें हमीदला मी गिरफदार करून आणलें. आतां पुढें काय ! "

शिवाजी म्हणाला, " ज्यूलिया आज तुला भेटावयाला येईल, उद्या येईल, अशा हमीदला थापा देऊन त्याला झुलवीत ठेवावयाचें आहे. किती दिवस म्हणून नाहीं विचारलेंस ! "

बत्ताशानें विचारलें, " किती दिवस ! "

शिवाजी म्हणाला, " आपण दातेगडावर जी मोहिम करणार आहों, तिचा कांहीं तरी निकाल लागेपर्यंत आपण हमीदला आडकावून ठेवूं.

आपण दातेगड जिंकून घेऊं शकलों, तर हमीदला आपण सोडून देऊं; अर्थात् 'हिंदूंना उपद्रव मी करणार नाहीं' अशी त्याला कसम खावयाला लावून मगच सोडून देऊं. बरें, दातेगडाची मोहीम फसली,तर ह्या हमीदचें बुजगावणें पुढें करून आपणाला कांहीं सवलती मिळवितां येतील. "

बत्ताशा म्हणाला, " होय. यासाठीं आपण हमीदला सध्यां झुलवीत ठेवणें जरूर आहे. "

शिवाजी म्हणाला, " पण हमीद जोंपर्यंत आपल्या अटकेंत आहे, तोंपर्यंत त्याला त्याच्या दर्जाप्रमाणें वागविलें पाहिजे. त्याच्या खाण्या-पिण्याच्या, निजण्याबसण्याच्या, नमाज पढण्याच्या वगैरे सर्व सोयी आपण उत्तम प्रकारें करून दिल्या पाहिजेत. मी मंदाररावांना सांगून ठेवतों. "

बत्ताशानें विचारलें, " आबा, आतां हमीदकडे मला जाण्याचें कांहीं कारण आहे काय ? "

शिवाजी म्हणाला, " कांहीं नाहीं, हमीदला जेवण वगैरे पोंचावि-ण्याच्या कामावर मी जगोबाची नेमणूक करतों. बत्ताशाला शिवाजीनें कांहीं कामगिरीवर पाठविलेलें आहे, तो दोनतीन दिवसांत येईल, ज्युलिया आजारी आहे, ती लवकरच बरी होईल, अशासारख्या कांहीं तरी लोणकढ्या थापा देऊन हमीदला पंधरा वीस दिवस झुलवीत ठेव-ण्याची कामगिरी जगोबा उत्तम रीतिनें करील. "

बत्ताशा म्हणाला, " आबा, ही तुमची योजना उत्तम आहे. बरें पण आबा, हमीदचा घोडा आतां गडाच्या पायथ्याशीं आपल्या झोपडींत बांधलेला आहे. त्या घोड्याचें काय करावयाचें ? "

शिवाजी म्हणाला, " त्या घोड्याला गडावर आणून आपल्या पागें-मध्यें बांधून ठेवावयाचा हुकूम मी पागनीसांना देववितों. "

बत्ताशा म्हणाला, " ठीक, उत्तम ! "

याप्रमाणें बोलणें झाल्यावर शिवाजी, बत्ताशा वगैरे लोक आपआपल्या कामासाठीं निघून गेले.

---

## प्रकरण ३९ वें.

# विजापुरच्या गाड्या.



विजापुरच्या बादशहाकडून दातेगडाच्या गडकऱ्याला पैसा आणि युद्धसामग्री वरंचीच्या वाटेनें यावयाची होती, हें आमच्या वाचकाना ठाऊक आहे. ही सामग्री आणि हा पैसा बैलगाड्यावर लादलेला होता. ह्या गाड्या विजापुराहून कार्तिक वद्य चतुर्थीस मंगळवारीं सशस्त्र शिपायाच्या बंदोबस्ताखालीं निघाल्या. त्या गाड्या चारपाच दिवस सुरक्षितपणें वाट चालून, वरंची मार्गे टाकून, दातेगडाला दोन दिवसांनीं पोचावयाच्या होत्या. ह्या गाड्यानी कार्तिक कृष्ण अष्टमीच्या शनिवारीं एका ठिकाणीं दुपारीं मुक्काम केला होता. शिपायाचीं आणि गाडीवानांचीं जेवणें आटोपलेलीं होतीं, आणि पुन्हा प्रवासाला निघावयाची त्यांची तयारी चाललेली होती. गाडीवान लोक आपल्या गाड्यांना बैल जुंपीत होते, शिपायी लोक आपआपले डगले आणि हत्यारें अंगावर चढवीत होते, अशासमयीं ह्या तळाकडे एक स्वार येत असलेला सर्वांना दिसला.

हा स्वार वर्णानें काळा आणि अंगानें धिप्पाड असून, तो ज्या घोड्यावर बसला होता, तो त्या स्वाराचा भार सहन करण्याइतका मजबूत दिसत होता.

ह्या स्वारापाशीं तरवार भाला, आणि तीरकामठा हीं हत्यारें यथास्थान लटकलेलीं होतीं.

हा स्वार ह्या तळापासून दहाबारा कदमावर आला, तेव्हा त्यानें जवळच्या शिपायाला सलाम केला, आणि सभ्य स्वरानें म्हटलें, "मीयासाहेब, मला तुमच्या नायकाशीं कांहीं बोलावयाचें आहे. त्याला तुम्ही मजकडे पाठवून देण्याची मेहेरबानी कराल काय? किंवा त्याच्याकडे मला घेऊन जाण्याची मेहेरबानी कराल काय?"

शिपायानें त्याला उत्तर दिलें, "आमचे नायक सय्यद करीम हे आहेत. त्याना मी तुमचा निरोप सांगतों."

असे म्हणून तो शिपायी काहीं अंतरावर बसलेल्या आपल्या नायका-

कडे गेला, आणि त्यानें त्याला त्या स्वाराचा निरोप सांगितला. तेव्हां सय्यद करिम उठून या स्वाराकडे आला.

सय्यद करीमला पाहातांच आपल्या स्वारानें त्याला सलाम केला आणि सभ्यपणाच्या मुद्रेने म्हटलें, "हजरतसाहेब, मला तुमच्याशीं कांहीं बोलावयाचें आहे. तुम्ही त्या दगडापाशीं येण्याची मेहेरबानी कराल काय? आपलें बोलणें कोणी ऐकूं नये, असें आहे."

सय्यद करीम जिज्ञासेच्या आणि साशंकपणाच्या मुद्रेनें ह्या स्वाराकडे पाहून म्हणाला, "तुम्ही कोण आणि कोणाकडून आलेले आहां आणि माझ्याशी तुमचें काय काम आहे, हें मला अगोदर सांगा. तुम्ही कांहीं दगा करणार नाहीं कशावरून?"

तेव्हां तो स्वार सभ्यपणाच्या मुद्रेनें म्हणाला, "हजरतसाहेब, आपलीं माणसें शंभर सवाशें असून तीं सगळीं सशस्त्र आहेत. मी कांहीं दगा केला, तर तुम्ही माझी एका क्षणांत चटणी उडवून देणार नाहीं काय?"

नायकाने उत्तर दिलें, "खरी गोष्ट."

स्वार म्हणाला "तर तुम्ही त्या फत्तराकडे येण्याची कृपा करावी."

"चल, हा मी येतां," असें त्या स्वाराला उत्तर देऊन सय्यद करीम त्या स्वारानें बोटानें निर्दिष्ट केलेल्या फत्तराकडे गेला. स्वारही घोड्यावरून उतरून आणि घोड्याचा लगाम हातांत धरून त्या फत्तराकडे गेला. मग तो त्या नायकाला म्हणाला, "हजरतसाहेब, हा माझा भाला मी ह्या जमीनींत खोचून ठेवतों, आणि तुम्हाला काय सांगावयाचें तें सांगावयाला सुरवात करतों."

असें म्हणून त्या स्वारानें आपल्या भाल्याची काठी हातांत धरून त्याचें पोलादी पातें जोरानें खच्चादिशीं जमीनींत खुपसलें. तें सुमारें वीतभर जमीनींत घुसलें आणि भाला ताठ उभा राहिला. त्या भाल्याची काठी बोटानें निर्देशून हा स्वार म्हणाला, "हजरतसाहेब, ह्या काठीकडे लक्ष देऊन पहा!"

सय्यदकरीमला ह्या प्रकाराचा कांहीं उलगडा होईना. तो जिज्ञासेनें स्वाराच्या भाल्याच्या काठीकडे दृष्टि लावून पहात राहिला, तों इतक्यांत सूं सूं करीत एक तीर आला. तो त्या भाल्याच्या काठींत अंगुळभर शिरून

त्या काठीशीं काटकोनांत राहिला. ह्या तीराचें पोलादी टोक दाभणाप्रमाणें बारीक आणि निमुळतें होतें.

हा आकस्मात् आलेला तीर पाहून सय्यदकरीम आश्चर्यानें थक्क झाला! तो तीर ज्या दिशेकडून आला होता त्या दिशेकडे त्यानें दृष्टि वळविली, परंतु त्याला लांबवर कोणी तीरंदाज दिसला नाहीं. तेव्हां तो ह्या स्वाराला म्हणाला, " भल्या माणसा, हा तीर ह्या भाल्याच्या काठींत घुसला, तो सोडला कोणी, कां सोडला, आणि तूं मला काय सांगणार आहेस,आणि ह्या तीरंदाजीच्या प्रदर्शनाचा अर्थ काय ? "

स्वारानें उत्तर दिलें, " हजरतसाहेब, जरा सबूर करा ! पुन्हां त्याच काठीकडे दृष्टि करून पहा ! "

ह्या भाषणानंतर आठदहा क्षण गेले असतील नसतील, तोंच दुसरा तीर अगदीं उलट दिशेनें सूं सूं करीत आला. तो खच्चदिशीं त्या काठीला वेधून एक अंगूळभर काठीच्या पुढें आला. हा तीर पहिल्या तीराच्या वर चार बोटें काठींत घुसला होता! ह्याही तीराचें पोलादी टोंक दाभणाप्रमाणें बारीक आणि अणकुचीदार होतें.

सय्यद करीमनें तो तीर कोणच्या दिशेनें आला होता, हें पाहण्यासांठीं त्या दिशेकडे नजर वळविली. परंतु त्याला तीरंदाज दिसला नाहीं. तो आश्चर्यचकित मुद्रेनें त्या स्वाराकडे पाहून म्हणाला, "हा काय प्रकार आहे, आणि हें तीरंदाजीचें प्रदर्शन कशासाठीं ? "

तो स्वार म्हणाला, " आणखी कांहीं क्षण धीर धरण्याची मेहेरबानी करा. "

यानंतर आणखी आठदहा क्षण गेले. तेव्हां पुन्हा एक तीर पहिल्या तीराच्या दिशेनें येऊन त्या काठींत घुसला. तो दुसऱ्या तीराच्या वर चार बोटें काठींत घुसला. आणखी कांहीं क्षणांनीं आणखी एक तीर येऊन काठींत घुसला. अशा रीतीनें एकंदर आठ तीर काठीकडे आले आणि ते भाल्याच्या दस्त्यापर्यंत त्या काठींत घुसले!

हा चमत्कार पाहून सय्यद करीम त्या स्वाराला म्हणाला, " हें तीरंदाजीचें प्रदर्शन कशासाठीं ? "

तेव्हां तो स्वार म्हणाला, " हजरतसाहेब, मी काय सांगतों तें लक्ष्य-

पूर्वक ऐका. तुमच्या समक्ष हे आठ तीर ह्या माझ्या भाल्याच्या काठींत येऊन घुसलेले तुम्हीं पाहिले! हे तीर सोडणारे तीरंदाजहि तुम्हाला दिसले नाहींत. हे तीरंदाज बिंदुवेधी आहेत अशी तुमची खात्री झाली आहे कीं नाहीं, हजरतसाहेब?"

सय्यदकरीमनें उत्तर दिलें, "होय, ते बिंदुवेधी आहेत अशी माझी खात्री झाली आहे. परंतु हें तीरंदाजीचें प्रदर्शन माझेपुढें कशासाठीं तुम्ही करीत आहां?"

तो स्वार म्हणाला, "हजरतसाहेब, ऐका! हे जे आठ बिंदुवेधी तीरंदाज तुमच्या प्रतीतीस ह्या आठ बाणांवरून आले, त्यांच्या इतकेच कुशल तीरंदाज आपल्या सभोंवार पसरलेले आहेत. त्यांची संख्या एक हजार आहे! माझी तुम्हाला एक विनंती आहे. ती तुम्हीं मान्य केली, तर तुम्हाला आम्हीं कांहीं इजा करणार नाहीं. ती तुम्हीं मान्य केली नाहीं, तर एका क्षणात हे हजार तीरंदाज तीर मारतील! ते तुम्हा लोकांच्या छातींत, गळ्यात, पाठींत, मानेंत, तोंडांत, पोटांत, घुसतील आणि तेथेंच अडकून राहतील. मी शाबूत राहीन. तुम्हा सवाशेदिडशे माणसांपैकीं एकही माणूस परत विजापुराला जाऊं शकणार नाहीं, किंवा पुढें दातेगडालाही जाऊन पोंचूं शकणार नाहीं! माझी विनंती तुम्ही मान्य करता काय? बोला."

हें त्या माणसाचें धमकदारीचें भाषण ऐकून सय्यद करीम घाबरला, फार घाबरला. तो नवखा स्वार त्याच्याकडे गंभीर मुद्रेनें पहात होता.

सर्व गोष्टींचा विचार करून आणि बलाबलाची तुलना करून सय्यद करीम म्हणाला, "तुमची काय विनंती,—किंवा आज्ञा,—आहे, ती सांगा."

तेव्हां हा स्वार म्हणाला, "माझी दुसरी कांहीं विनंती नाहीं. माझी विनंती एवढीच आहे कीं, तुम्ही ह्या गाड्या आंतील सर्व सामानासह आम्हीं सांगतो तिकडे घेऊन याव्या. गाड्यांतील सर्व सामान आम्ही उतरून घेऊं, आणि नंतर तुम्हाला हावें तिकडे जाण्याला परवानगी देऊं. परंतु तुम्हा सर्वांना आठ दिवस आमच्या अटकेंत राहावें लागेल. ह्या आठ दिवसांत तुमच्या खाण्यापिण्याची, निजण्याबसण्याची उत्तम तजवीज

आमच्याकडून होईल. आमची विनंती तुम्हाला कबूल असली, तर सांगा. कबूल नसली, तर तसेंही सांगा. म्हणजे एका क्षणाच्या आंत माझे हजार बिंदुवेधी तिरंदाज आपलें कौशल्य तुम्हाला दाखवितील!"

तो स्वार हे शब्द बोलत होता त्या अवकाशांत आणखी आठ तीर सूं सूं करीत त्या भाल्याच्या काठींत घुसले होते. सय्यद करीम फार घाबरून गेला होता. तो ह्या स्वाराला म्हणाला, "तुमची विनंति आम्ही मान्य करतों. तुम्ही सांगाल तिकडे ह्या गाड्या आम्ही नेऊन येतों. हुकूम द्या."

तेव्हां हा स्वार म्हणाला, "ह्या गाड्या भोपाळगडाकडे चालवावयाचा कूम सोडा."

सय्यदकरीमच्या गाड्या आणि त्याचे शिपायी प्रवास पुन्हा सुरू करावयास सिद्ध होऊन त्याच्या हुकमाचीच वाट पहात होते. नायकाने भोपाळगडाकडे जावयाचा हुकूम सोडला. तो ऐकताच सगळे शिपायी आणि सगले गाडीवाले आश्चर्यचकित झाले, परंतु कोणी ह्या हुकमाला हरकत घेतली नाहीं. स्वार आणि आपला नायक ह्यांच्या दरम्यान काय संभाषण झाले, आणि त्या नायकाने प्रवासाचें गंतव्य कां बदललें, ह्याची कोणालाही काहींही कल्पना नव्हती! तसेंच भाल्यावर तीरंदाजी कोणी केली आणि का केली, हेंही कोणालाच कळलेलें नव्हतें. परंतु ही चवकशी न करतां सर्वांनीं नायकाच्या हुकमाप्रमाणें भोपाळगडाकडे जावयाला तोंडें वळविलीं!

गाड्या आणि शिपायी रवाना झालेले पाहून तो स्वार सय्यदकरीमला म्हणाला, "चला, हजरत, आपणही त्यांच्याबरोबर जावयाला लागूं!"

असें म्हणून त्या स्वारानें जमीनीवर उभा खुपसून ठेविलेला आपला भाला उपसून काढला, आणि त्याच्या दांड्यात रुतून बसलेले सगळे तीर थोडथोडे हालवून ओढून काढले. मग ते तीर त्यानें सय्यदकरीम याला पहावयासाठीं त्याच्या हातांत दिले. सय्यदकरीम यानें ते तीर पाहिले, आणि त्यांची कारागिरी वाखाणून म्हटलें, "हे तीर गुळगुळीत, चकचकीत आणि निमुळते आहेत. त्यांचीं टोकें इतकीं अणकुचीदार आहेत कीं तीं झाडाच्या बुंध्यांतसुद्धा सहज शिरतील."

तेव्हा तो स्वार म्हणाला, " आलबत खिरतील. हा पहा चमत्कार!"

असें म्हणून त्या स्वारानें एक तीर मुठींत धरून तो जवळच्या झाडाच्या बुंध्यांत खचदिशीं मारला, तो त्या बुंध्यात चार बोटें खोल जाऊन रुतून बसला! हें पाहून सयदकरीमनें विचारलें, " हीं बाणांचीं टोकें करणारा शिकलगार कोण ? "

स्वारानें उत्तर दिलें, " कोंडणीच्या पांडोबा शिकलगारानें हीं टोंकें केलेलीं आहेत ! माझ्या एक हजार शिपायांपैकीं प्रत्येकाच्या भात्यात असलीं दहा दहा टोकें आहेत ! तुमच्या ह्या शिपायांपैकीं प्रत्येकाच्या अंगात तीस तीस जरी खुपसलीं तरी पुष्कळ टोंकें त्यांच्यापाशीं शिल्लक राहतील ! "

सय्यदकरीम मनांत फार भ्यालेला होता. त्यानें स्वाराला कांहीं उत्तर दिलें नाहीं. तो टाग टाकून आपल्या घोड्यावर आरूढ झाला. तो स्वारही आपल्या घोड्यावर आरूढ झाला.

सय्यदकरीम याच्या गाड्या आणि शिपायी एव्हांना कांहीं अंतरावर गेले होते. त्याना ह्या दोघांनी तेव्हाच गांठलें.

वाट चालूं लागल्यावर करीमनें विचारलें, " तुम्ही कोण आहां ! तुमचें नाव काय ? हे हजार बिंदुवेधी तिरंदाज तुम्ही कशासाठीं गोळा केलें आहेत, आणि तुमचा उद्देश काय ? "

तेव्हा आपल्या स्वारानें उत्तर दिलें, " माझें नांव भरमानाक. माझ्या हजार शिपायांच्या दोन तुकड्या असून त्यांचे नायक हरनाक आणि शिवनाक ह्या नावाचे आहेत. आम्ही सगळे लोक जातीचे महार आहों. आम्ही सर्व लोक शिवाजी महाराजांचे अनुयायी आहों. त्यांच्या हुकमानेंच आम्ही ह्या तुमच्या हत्याराच्या गाड्या पकडून भोपाळगडावर नेत आहोंत ! "

सय्यदकरीमनें तुच्छतेच्या मुद्रेनें विचारलें, " आमच्या मुसलमानाच्या राज्यात जो चोऱ्या करतो, जो गडावर दरवडे घालतो, जो ठिकठिकाणीं लुटालूट करतो, त्याच शिवाजीचे तुम्ही नोकर आहां काय ? "

भरमानाकानें उत्तर दिलें, " सय्यद करीमसाहेब, तुम्ही मुसलमान

लोक आमच्या शिवाजीमहाराजांना चोर. आणि लुटारू आणि दरवडेखोर असें म्हणून त्यांना शिव्या देत असतां, पण आमचे महाराज चोर नाहींत, लुटारू नाहींत, दरवडेखोर नाहींत. तुम्ही मुसलमान लोकच चोर, लुटारू आणि दरवडेखोर आहां!"

सय्यदकरीमनें आश्चर्यानें विचारलें "आम्ही मुसलमान लोक चोर, लुटारू, आणि दरवडेखोर आहों असें कसें म्हणतां तुम्ही भरमानाक? आम्ही तर येथचे राजे आहों!"

भरमानाकनें उत्तर दिलें, "तुम्ही मुसलमान परदेशी परधर्मी लोक आमच्या देशांत घुसून आमच्यावर जुलमाचें राज्य करीत आहां. आमचे देश तुम्ही दरवडे घालून लुटून घेतले आहेत, आमच्या जामिनी किं तुम्ही लुटून घेतले आहेत. आणि तुम्ही आम्हाला जुलमी आणि अन्यायी आणि सैतानी रियासतीनें भरडून काढीत आहा. आमच्या देशांत तुम्ही मुसलमान चोर घुसला आहां. आमच्या देशांत घुसुन तुम्ही आमच्या धर्मावर झजियासारखे कर लादीत आहा. आम्हां हिंदूंना तुम्ही बाटवीत आहां. आम्हां हिंदूलोकांच्या देवांचीं देवळें फोडींत आहा. आम्हां हिंदूंना पवित्र अशा ज्या गायी, त्या तुम्ही कापून खात आहां. आम्हा हिंदूंच्या बायका, मुली, सुना याना पकडून नेऊन त्यांना त्यांच्या इच्छेविरुद्ध जनानखान्यात घालीत आहा. आम्हा हिंदूंना न्याय मिळत नाहीं. आमच्या ह्या हिंदूंच्या हिंदुस्तानांत हिंदूंना सुखानें भाकरी खातां येत नाहीं, अशी आम्हा हिंदूंची तुम्ही मुसलमानांनीं हीनदीन दशा करुन सोडली आहे. कोणाही हिंदुविरुद्ध कोणाही मुसंड्यानें कांहींही गुन्हा केला, तरी तो मुसंडा बेगुन्हा म्हणून सुटून जातो. तुमच्या मुसलमानांच्या राज्यात हिंदू रयतेला सुख नाहीं, शांति नाहीं, सोयी नाहींत, न्याय नाहीं, आम्हां हिंदूंच्या गुणांना कांहीं किंमत नाहीं अशी जर हिंदूंची दुर्दशा आहे, आणि स्वराज्य स्थापून ह्या दुर्दशेचा शिवाजी अंत करावयाला झटत आहे, तर त्या शिवाजीला तुम्ही चोर, लुटारू आणि दरवडेखोर म्हणतां काय! ह्या हिंदुस्थानांत हिंदूंच्या साहाय्यानें, हिंदूंच्या सुखासाठीं, हिंदूंचें स्वराज्य स्थापावयाला शिवाजी झटत आहे! त्याला तुम्ही चोर आणि लुटारू आणि दरवडेखोर म्हणतां! आणि

तुम्हीं परदेशी परधर्मी लोक आमच्या देशांत घुसून आम्हांला गांजीत आहां, छळीत आहां, पीडीत आहां, बाटवीत आहां, नाडीत आहां, लुटीत आहां, ते तुम्ही साधू आणि साव काय ! धिक्कार असो तुमच्या न्यायबुद्धीला ! धिक्कार असो तुमच्या माणुसकीला आणि धिक्कार असो तुमच्या धर्माला ! ”

हे आवेशयुक्त भाषण भरमानाक करीत असतां सय्यदकरीम तें मुकाट्यानें ऐकत होता. तें भाषण संपलें, तेव्हां तो भरमानाकाला म्हणाला, “ भरमानाक, तुम्हीं वर्णीत आहां तशी हिंदूंची दुर्दशा आहे ही खरी गोष्ट आहे. ह्या तुमच्या वर्णनात कांहीं असत्य नाहीं किंवा कांहीं अतिशयोक्ति नाहीं. आणि हें मी बोलत आहे तें स्वानुभवावरून बोलत आहे. ”

भरमानाकनें विचारलें, “ म्हणजे काय ! तुम्ही हिंदूंना बाटविण्याचें, हिंदूंची देवळें फोडण्याचें, हिंदूंच्या बायकामुली पळवून नेण्याचें, हिंदूंची गमतीखातर कत्तल करण्याचें, हिंदूंचीं घरें लुटण्याचें, गायी कापून खाण्याचें, अशासारखीं पापें स्वतः केलीं आहेत काय ! आणि हल्लीं तीं पापें तुम्हीं करीत असतां काय ! आणि तीं पापें करणाऱ्या लोकांना तुम्हीं साहाय्य करीत असतां काय ! ”

त्यावर सय्यद करीम म्हणाला, “ नाहीं, भरमानाक, तसें कांहीं मी केलें नाहीं आणि करीतही नाहीं. परंतु ह्या मुसलमानांच्या सैतानी वर्तनाचा मला स्वतःला अनुभव आलेला आहे. माझी हकीगत तुम्ही ऐकली तर तुम्हाला फार दुःख होईल. तुमची इच्छा असली तर सांगतो. ”

भरमानाक म्हणाला, “ सांगा. ”

---

## प्रकरण ४० वें.

# सय्यदकरीमचें पूर्ववृत्त.



भरमानाकानें सय्यदकरीमचें पूर्ववृत्त जाणावयाची इच्छा दर्शविल्यावरून सय्यदकरीमनें तें सांगावयाला सुरवात केली. तो म्हणाला, “ भरमा-

नाक, ऐका. मी पूर्वीचा हिंदू होतों. मीं जातीचा मराठा होतों, आणि केंजळगडावर नवाबसाहेबांचा खासगकिडचा चाबूकस्वार होतों. ह्या नोकरीवर मला जे पैसे मिळत असत, त्याचेवर माझी बायको, आणि एक मुलगी ह्यांची मीं चांगली गुजराण करूं शकत असे. माझी बायको उद्योगी असून ती गडावरील शिपायाच्या मुलांचे कपडे शिवून देत असे, आणि ह्या कामीं माझी मुलगी तिला मदत करीत असे. माझे चाबुकस्वारीचे पैसे आणि.माझ्या बायकोचे शिलाईचें पैसे, ह्यावर आम्ही आपला गरीबाऊ संसार नीट करून चार पैसे बाळगून होतों. आम्ही गडावरील श्रीमंत हिंदू कुटुंबांत मोडत असूं. आम्ही केंजळगडावर आठ दहा वर्षें सुखानें आणि समाधानानें होतों. परंतु पुढे आमच्या दुर्दैवाला सुरवात झाली ! माझी बायको सुंदर होती. तिच्यावर नबाबाची पापी नजर गेली. त्यानें तिला कांहीं निमित्ताने आपल्याकडे बोलावून नेली. ती गेली. तिच्यापुढें तो भलभलत्या गोष्टी काढूं लागला. ती रागावली. तो तिच्यावर बळजबरी करावयासाठीं तिच्याकडे धावून गेला. तिनें त्याला ढकलून दिलें. तो जमिनीवर उताणा आदळला. परंतु तो पुन्हा उठून तिला पकडूं लागला. त्याच्यात आणि तिच्यांत झोंबाझोंबी सुरू झाली. तिनें त्याच्या तोंडावर बुक्की मारली, ती त्याच्या नाकावर बसून त्याच्या नाकांतून रक्त वाहूं लागलें. तो रागावला. त्याने आपल्या नोकरांना बोलाविलें. त्यांनीं नबाबाच्या हुकमाने तिला पकडून कैदेत ठेविलें. काजीपुढें खटला गेला, तेव्हां काजीनें माझ्या बायकोवर सात गुन्हे लादले ! व्याभिचाराचा हेतु धरून ती स्त्री नबाबाकडे गेली, परंतु नबाबसाहेब पवित्र आचरणाचे होते, त्यांनीं तिला झिडकारले, म्हणून तिनें रागानें त्यांच्या नाकावर बुक्की मारली अशा, नबाबसाहेबांचे खिजमतगार ह्यानीं, नबाबाच्या बाजूनें साक्षी दिल्या. माझी बायको व्यभिचारिणी ठरली. तिने मारामारी केली हा तिच्यावर दुसरा गुन्हा शाबीत झाला. ती बिगरपरवाना नबाबाच्या वाड्यांत शिरली, हा तिच्यावर तिसरा गुन्हा शाबीत झाला. ती काळी चंद्रकळा नेसून गेली होती हा चवथा गुन्हा, तिनें नाकांत नथ घातली होती हा पांचवा गुन्हा, तिनें कुंकूं लावलें होतें हा सहावा गुन्हा, तिनें हातात बांगड्या भरल्या होत्या हा सातवा गुन्हा ! आणि हे सात गुन्हे साक्षीदारांच्या जबान्यांवरूनच पूर्णपणें शाबीत झाले, आणि तिचें डोकें उडवि-

ण्यात यावें, अशी काजीसाहेबांनीं सजा फर्माविली. ती शिक्षा अमलांत आणली गेली ! माझी बायको छिनाल ठरली ! केंजळगडावर माझी छी थू झाली !

परंतु इतक्यावरच माझी हकीगत संपत नाहीं. माझी मुलगी चंद्रा ही देखील आपल्या आईप्रमाणें सुंदर होती ! तिच्यावर केंजळगडाच्या गोलंदाजाची पापी नजर गेली ! तिनें आपल्याकडे यावें असा निरोप त्यानें पाठविला. परंतु आपलें पावित्र्य राखण्यासाठीं तिनें गडाच्या तटावरून उडी टाकून आत्महत्या केली ! आत्महत्या करणें, हा गुन्हा [illegible] ठरविला. आणि आत्महत्या करून घेणाऱ्या मुलीचा मी बाप, म्हणून मलाही काजीसाहेबांनीं गुन्हेगार ठरविलें आणि मला बाटवून मुसलमान केलें पाहिजे, अशी काजीसाहेबांनीं सजा फर्माविली ! माझें घरदार जप्त करण्यात आलें ! माझ्या तोंडांत गाईचें मांस कोंबऱ्यांत आलें ! मला कुराण हातांत देऊन, कसम खावयाला लावून, आणि माझें नांव सय्यदकरीम असें जाहीर करण्यांत येऊन, मला गडावरून हाकलून देण्यांत आलें ! माझें पूर्वीचें नांव सिताराम देशमुख असें होतें. मी पोटासाठीं भटकत भटकत विजापुरास गेलों. तेथें मी मुसलमान आहे असें सांगून सैन्यांत नोकरी मिळविली. माझा पूर्वीचा इतिहास मी विजापुरास कोणाला कळूं दिला नाहीं. ही हकीगत घडली ती दीड दोन वर्षांच्या आतली आहे. नाइलाज म्हणून मी पोटासाठीं ही नोकरी करीत आहे ! मला परत हिंदुधर्मांत यावेंसें वाटतें ! मी गुप्तपणें खंडोबाची पूजा करतों, मी गुप्तपणें मराठेजातीचीं सर्व व्रतें करतों, एकादशी, शिवरात्र वगैरे उपवास मी पाळतों, पण अगदीं गुप्तपणें. मी मशीदींत जातों, मुसलमान लोकांप्रमाणें बाह्यात्कारें सर्व हावभाव आणि हालचाली करतों, पण मनांत खंडोबाचें ध्यान करतों ! मी कधीं कोणा मुसलमानाच्या घरीं जेवावयाला जात नाहीं, पण मुसलमानांपासून अगदीं अलग राहाणें मला शक्य होत नाहीं. प्रसंग विशेषीं मला मुसलमानाच्या हातचें खाणें खावें लागतें, आणि पेयें प्यावीं लागतात. माझा नाइलाज होतो. मी धर्मभ्रष्ट आहें, मी पापी आहें, मी पतित आहे ! काय करावें तें मला सुचत नाहीं ! पोटाची खळी भरून काढावयासाठीं मी मुसलमानी राज्यांत नोकरी करीत आहें ! मला बायको नाहीं, मुलगा किंवा मुलगी नाहीं, मला कोणी नातलगमाणसें

नाहींत ! मी जगांत एकटा प्राणी आहें. मी कोणावर प्रेम करीन तर मला माणूस नाहीं. मजवर प्रेम करणारेंही कोणी माणूस ह्या जगांत नाहीं ! मला मरण आलें, तर दोन अश्रु ढाळील असे कोणी या जगांत नाहीं !"

याप्रमाणें सय्यदकरीम बोलत असतां प्रथम प्रथम भरमानाकाच्या मनांत लबाडीचा संशय आला. पण त्याची हकीगत जशजशी तपशीलवार होत चालली, तसतसा भरमानाकाच्या मनांतील संशय निरस्त होत चालला, आणि सय्यदकरीम खरें बोलत आहे, अशी त्याची खात्री होत चालली. आणि त्याच्या भाषणाच्या शेवटीं शेवटीं तर त्याच्याविषयीं त्याला दया वाटूं लागली ! तथापि, त्याच्या हकीगतींतील गोष्टींचा पडताळा पाहणें जरूर आहे, असें त्याचें मत झालें. ह्या मताच्या धोरणानें तो सय्यदकरीमला म्हणाला, " सय्यदकरीमसाहेब, तुम्ही केंजळगडावर चाबूकस्वार होता, तेव्हां त्या गडावर आणखी कोणी चाबूकस्वार होते काय ! "

सय्यदकरीमनें उत्तर दिलें, " होते, चारपांच चाबूकस्वार होते. ते सगळे मराठेजातीचे होते. परंतु ते अम्रेखवलीचे आणि जांभूळवाडीचे राहाणारे होते. ते रोज आमच्या गडावर कामासाठीं येत असत. ते रात्रीच्या वसतीला आपआपल्या गांवीं जात असत. ह्या चाबूकस्वारापैकीं सदोबा पाटील अम्रेखवलीचा माझा माउसभाऊ होता आणि तुकाराम सातपुते हा जांभूळवाडीचा राहाणारा असून तो माझा साडू होता. गडावर येणारे इतर चाबूकस्वार सगळे माझ्या ओळखीचे होते, परंतु माझ्या कुटुंबावर आपत्ति कोळली आणि मला बाटवून केंजळगडावरून हाकून लावण्यांत आलें, तेव्हांपासून मी माझ्या जुन्या नातलगाकडे किंवा मित्रांकडे मुळींच गेलों नाहीं. त्या माणसांपैकीं सदोबा पाटील आणि तुकाराम सातपुते हे विजापुरास भिन्नभिन्नवेळीं आलेले होते. ते मला रस्त्यांत दिसलें होते. मी त्यांना ओळखिलें, परंतु माझें दाढीमिशांनीं रूपांतर झालेलें असल्याकारणानें, त्यांनीं मला बिलकूल ओळखिलें नाहीं. मी बाटून पतित झालों, म्हणून मी त्यांना ओळख दिली नाहीं. हें लाजीरवाणें तोंड

त्यांना कसें दाखवावें ? ह्या कारणामुळे मी आज जगांत एकटा पडल्या-सारखा झालों आहे !"

सय्यदकरीमनें जें आपलें पूर्ववृत्त सांगितलें त्याचा पडताळा पाहण्याचीं साधनें त्याच्याचकडून आपणाला मिळालीं म्हणून भरमानाकाला समाधान वाटलें. आणि त्याला जुलमानें बाटविण्यांत आलेले असल्या-कारणानें त्याला पंक्तिपावन करून घेण्यावद्दल शिवाजीला विनंति करावी असें त्यानें मनांत ठरविलें. दातेगडाची मोहीम समाप्त झाल्यावर सय्यदकरीम ह्याचें पूर्ववृत्त खगवून पहावें, व ते खरें ठरल्यास त्याच्या पतित-परावर्तनाचा विधि घडवून आणावा, असें भरमानाकानें मनांत ठरविलें. मग तो सय्यदकरीमला म्हणाला, " हजरतसाहेब, तुम्हाला परत आपल्या जातींत मामील व्हावयाची इच्छा आहे काय ! "

सय्यदकरीमनें उत्तर दिलें, " अलबत आहे. पण हें घडावें कसें !

त्यावर भरमानाक म्हणाला, " त्यांत काय कठिण आहे ! आमच्या शिवाजीमहाराजांनीं बाटून मुसलमान झालेल्या शेकडों हिंदूंना ब्राम्हणां-कडून प्रायश्चित्त देववून परत हिंदूधर्मांत घेवविलें आहे. आमचे शिवाजी-महाराज मोठे महात्मे आहेत ! मुसलमानलोकांनीं ज्या हिंदूंना जुलमानें, किंवा फसवून, किंवा पेचांत पकडून, किंवा पैशाचा, अधिकाराचा, मानाचा लोभ दाखवून, किंवा गुन्ह्याला सजा म्हणून, बाटविलेलें असेल, अशा सर्व हिंदूंना आमच्या महाराजांनीं ब्राह्मणाकडून परत हिंदूधर्मांत घेवविलें आहे! तसेंच, देशाचें हित साधण्यासाठीं जे कोणी बुद्धिःपुरस्सर मुसलमान झालेले, अशाही बाटलेल्या लोकांना आमच्या महाराजांनीं परत हिंदूधर्मांत घेवविलें आहे!

आज गणवंतगडाचा मंदारराव म्हणून जो हिंदू मराठा गडकरी आहे तो देशाच्या कल्याणासाठीं बुद्धिपुरस्सर बाटला होता, त्याला आमच्या शिवाजीमहाराजांनीं ब्राह्मणांकडून प्रायश्चित्त देववून, त्याला परत मराठे-जातींत पंक्तिपावन करून घेतलें आहे. मी तुम्हांला अशा जातीचीं शेकडों उदाहरणें दाखवून देईन. म्हणून मी म्हणतों कीं, तुमचा प्रस्ताव त्यांच्या कानावर तुम्हीं घातला, आणि इच्छा दर्शविली, तर तुमच्यासंबंधानें ते चवकशी करवितील, आणि तुम्हीं सांगत आहां तशी खरी हकीगत आहे असें त्यांना आढळून आलें, तर ते अवश्य तुम्हांला परत हिंदूधर्मांत

आणि मराठेजातींत परत घेववितील. परंतु आठदहा दिवस आमच्या महाराजांना फार काम आहे. नंतर ते तुमच्या कामाकडे वळतील."

सय्यदकरीम म्हणाला, "मी एक महिनाभर देखील थांबेन ! मला त्यांनीं परत हिंदूधर्मांत घेवविलें, तर मी त्याचे उपकार मानीन आणि त्यांच्या हिंदभूमीच्या महाकार्यांत अनुयायी होईन !"

सय्यदकरीम आणि भरमानाक ह्यांचें हें संभाषण चाललें असतां, सूर्यास्ताचा समय येऊन ठेपला होता. सोयीच्या ठिकाणीं मुक्काम करून आणि विश्रांति घेऊन, पहाटेच्या समयीं पुन्हा प्रवास सुरूं करावा, असें ठरलें.

गाड्या थांबल्या. गाडीवानांनीं आपआपल्या बैलांच्या तजवीजी करून भाकऱ्या भाजावयासाठीं चुली पेटविल्या. मुसलमान शिपायांनींही आपल्या चुली पेटविल्या. भरमानाकाचे विंदुवेधी महार तिरंदाज कांहीं अंतरावर उतरले. त्यांनींही आपल्या चुली पेटविल्या. भरमानाक आपल्या महार मंडळींत जेवला, हें सांगणें नलगे.

ह्या महार तीरंदाजांनीं आळीपाळीनें ह्या विजापुरच्या गाड्यांवर नजर ठेविली होती, हे सांगण्याची कांहीं जरूरी नाहीं.

पहाटेस ठरलेल्या समयीं ह्या गाड्यांचा भरमानाक आणि सय्यदकरीम ह्यांच्या हुकमानें भोपाळगडाचा प्रवास सुरूं करण्यांत आला. संध्याकाळपर्यंत ही मंडळी भोपाळगडास जाऊन पोंचली.

तेथें पोंचतांच त्या गडाचा गडकरी सोनाजी बिन निळोबा समर्थ, ह्याच्या हवाली त्या गाड्यांवरील सर्व हत्यारें आणि पैसा करून, भरमानाकानें ते गाडीवाले आणि त्याच्याबरोबरचे विजापुराहून आलेले शिपायी, यांना बंदोबस्ताच्या ठिकाणीं अटकेंत ठेवण्याविषयीं विनंति केली. गडकऱ्यानें तसें केल्यावर भरमानाक, हरनाक, आणि शिवनाक हे आपल्या कामगिरीची सफलता शिवाजीला कळवावयासाठीं कांसेगांवाकडे निघाले;—कारण तिथेंच यावयास शिवाजीनें त्यांना सांगितलें होतें—आणि भरमानाकाचे विंदुवेधी तिरंदाज गणवंतगडाकडे निघाले.

---

हा लेख भास्करानें तीन वेळ लक्ष्यपूर्वक वाचला. पहिलें वाचन समाप्त झालें तेव्हां तो स्वगत उद्गारला, "विभाकररावहो, तुम्ही माझे पणजे आणि मी तुमचा पणतू. मी तुम्हाला पाहिलेलें नाहीं, परंतु तुमच्या मनाला किती ताप होत असेल ह्याची मला कल्पना करतां येतें. आपल्या हातून दातेगड गमावला, आपल्या कुटुंबाची आपण अतिशय मोठी हानि केली असें शल्य तुमच्या मनाला सतत टोचीत होतें, हें ह्या तुमच्या पत्रावरून स्पष्ट दिसत आहे. पण ही हानि तुम्ही केली म्हणून मी तुम्हाला यत्किंचित् दोष देत नाहीं. यवनीसैन्यानें तुमच्या गडाला पांच वर्षें वेढा दिला असतां तुम्ही टिकाव धरून राहिला, ह्याबद्दल मी उलट तुमची तारीफ करतों. हा तुमचा पराक्रम स्तुत्य होय. दातेगड हातचा न जाऊं देण्याबद्दल तुम्ही इमानानें शिकस्तीचा प्रयत्न केला हेंच श्रेयस्कर होय. यत्न हेंच पुण्य होय. यत्नाचें फळ हें सुख होय. यत्न केल्याबद्दल तुम्हाला पुण्य लागलें हें कोणीहि नाकबूल करणार नाहीं. तुमच्याहातून दातेगड गमावला, ह्याबद्दल कोणीहि तुम्हाला दोष देणार नाहीं. तुमचा आशीर्वाद मला असावा. मी तुमच्या उपदेशाप्रमाणें आतांपर्यंत चालत आलों आहे आणि पुढेंहि चालत राहीन. तुमचा आत्मा शांत असो!"

त्या लेखाचें दुसरें वाचन भास्करनें समाप्त केल्यावर त्याच्या मनांत दुसऱ्या सरणीचे विचार आले. तो स्वगत उद्गारला, "विभाकरराव हो, ह्या तुमच्या लेखावरून तुमची ह्या मायभूमीविषयींची भक्ति किती स्पष्ट होत आहे! ही हिंदभूमि परदेशी, परधर्मी लोकांच्या ताब्यांत आहे ह्याबद्दल तुमचें अंतःकरण तिळतिळ तुटत होतें, तिचा उद्धार व्हावा अशी तुमची उत्कट इच्छा होती, हें ह्या तुमच्या लेखावरून उघड होत आहे. कुटुंबाची जी हानि तुमच्याहातून झाली, ती तुमच्या अंतःकरणाला जितकी जाचत होती, त्याहून अधिक ह्या आपल्या हिंदभूमीची पारतंत्र्याची स्थिति जाचत होती, ह्यांत शंका नाहीं!"

पणजोबांच्या लेखाच्या तिसऱ्या वाचनानें भास्करचे विचार वेगळ्या सरणीनें वाहूं लागले. तो स्वगत म्हणाला, "विभाकरराव हो, तुमच्यापासून आम्हाला जरी कांहीं द्रव्यप्राप्ति झाली नाहीं, तरी तुम्ही केलेला बोध हाच कोट्यवधि मोहोरांपेक्षा अधिक मूल्यवान् आहे असें, मी समजतों. हा बोध जर तुमच्या संततीच्या आचरणांत उतरला, तर त्यायोगें

तुम्हाला समाधान वाटणार नाहीं काय ? हिंदभूमीच्या उद्धारासाठीं आपण प्रयत्न करावा, दीन आणि अनाथांचा आपण यथाशक्ति परामर्ष घ्यावा, सन्मार्गानें चालावें, इत्यादि बोधवाक्यें मूल्यवान् आहेत. ही मूल्यवान् वाक्यें ज्याच्या हृदयात खोल ठसलीं आहेत, त्याला पैशाची कमतरता कधींच जाचक होणार नाहीं. मला जर पैसा मिळाला तर तो मी अनाथांच्या उपयोगाला लावीन आणि देशकार्यांत खर्च करीन ! ”

ह्या लेखाचें तिसरें वाचन आणि त्या वाचनानें मनात उद्भवलेले विचार सर्व बाजूंनीं घोळल्यावर भास्कराच्या मनात तो लेख चवथ्यादा वाचावा असा विचार आला. त्यानें तें मृत्युपत्र आणखी एकदा वाचले. त्यांतील तीन वाक्याचें त्याने विशेषप्रकारें मनन केले. तीं तीन वाक्ये पुढें दिल्याप्रमाणें होतीं:—

१ रहातें घर विकूं नको.

२ ते आहे तसें राख.

३ चाधया पहा.

. ह्या तीन वाक्याकडे भास्करचें लक्ष विशेषप्रकारें खेचलें गेलें. तो मनात म्हणाला, “ पहिल्या व दुसऱ्या वाक्यावरून, हें घर मोरेकुटुंबातच राहिलें पाहिजे अशी विभाकररावाची इच्छा होती, इतकेंच नव्हे, तर घराच्या मांड-णींत काहीं फेरफार केले जाऊं नयेत अशीहि त्याची इच्छा होती, असें स्पष्ट दिसतें.” राहातें घर विकूं नको. तुजला कितीही अडचणी आल्या, तरी घर विकूं नको, असें विभाकररावाचें आग्रहाचें सांगणें आहे. ‘चाधया पहा’ ह्या तिसऱ्या वाक्याचा अर्थ मात्र बराच घोटाळ्याचा दिसतो. आणि जर कांहीं डबोलें असलें, तर तें ह्याच वाक्याचा खरा अर्थ कळल्यास हातीं येण्याजोगें आहे. ह्या वाक्याचा एक उत्तान अर्थ घेऊन माझ्या आजोबानीं चांधयाच्या विटाच्या थरांत शोध केला, पण त्याना काहीं मिळालें नाहीं. माझ्या वडिलांनीं दुसरा उत्तान अर्थ घेऊन चाधयाची प्रत्येक वीट फोडून पाहिली, पण त्यांनाही कांहीं मिळालें नाहीं. तर ‘ चांधया पहा ’ ह्याचा आणखी काय बरें अर्थ होऊं शकेल ! ‘ चांधया पहा ’ ह्याचा लाक्षणिक अर्थ कांहीं तरी असला पाहिजे.

चांधईची भिंत जमीनीपाशीं दहा, पंधरा, वीस, हात विस्ताराची असते. त्याप्रमाणें संसाराचा विस्तार आरंभीं मोठा असला, तरी उत्तर वयामध्यें तो आकुंचित करीत आणावा आणि चांधयांच्या भिंती वर जशा एका बिंदूंत समाप्त होतात, त्याप्रमाणें स्वर्गाकडे धोरण ठेवून आपण संसारांतून अंग काढून घ्यावें, असाही उपदेश त्या वाक्यांतून निघेल. हा उपदेश मूल्यवान आहे ह्यांत शंका नाहीं.

दुसरा अर्थ असा निघेल कीं, स्वर्गप्राप्तीसाठीं आपण अनेकविध यत्न करावे; परंतु म्हतारपणीं चांधईच्या भिंतीच्या वरच्या अग्राप्रमाणें आपल्या सर्व यत्नाची परिणति आत्मचिंतनांत एकाग्र करावी. हाही उपदेश मूल्यवान आहे.

त्या वाक्याचा आणखी असाही अर्थ होईल कीं, आपणाला जें करावें असें वाटत असेल त्याचेंबद्दल अनेक लोकांचे विचार ऐकून घ्यावें; परंतु शेवटीं जे करणें तें आपल्या एकट्याच्या एकाग्र विचारानें जें योग्य ठरेल तेंच करावें.

'चांधया पहा' ह्या वाक्याचा आणखी असाही एक लाक्षणिक अर्थ निघूं शकेल कीं, घराला जशा दोन बाजूंस दोन चांधया असतात तशा आयुष्याच्या दोन चांधया बाल्य आणि वार्धक्य ह्या होत. बाल्यांत मनुष्य निष्पाप असतो तसा तूं निष्पाप् अस. आणि बाल्याप्रमाणें वार्धक्यांत तूं परावलंबी होशील, दुसऱ्याची तुला मदत लागेल, म्हणून तूं कोणालाही तोडूं नकोस. न जाणों, तो तुझ्या उपयोगास येऊं शकेल.

'चांधया पहा' ह्या एका वाक्याचे अनेक लाक्षणिक अर्थ शक्य आहेत. पण, त्यांपैकीं कोणचा अर्थ घेऊन मी वागावें अशी विभाकररावाची इच्छा असेल? त्यांनीं आपली सूचना फार संदिग्ध रीतीनें केली आहे. मी कोणच्या सरणीनें वागावें ह्यासंबंधानें कांहीं उलगडा होत नाहीं. ह्या तीन वाक्यांव्यातिरिक्त जीं इतर् वाक्यें त्या लेखांत आहेत, तीं स्पष्ट अर्थाचीं असून त्यांतील बोध मूल्यवान् आहे. त्या बोधाप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करावा हें उत्तम. आतां त्या मृत्युपत्राची जास्ती चिकित्सा करीत बसूं नये हा उत्तम मार्ग होय."

येणेंप्रमाणें स्वगतविचार शेवटाला आले, तेव्हां भास्करनें आतां

पुढें काय करावयाचें, ह्या संबंधाचा विचार चालविला. तो म्हणाला, "आतां प्रथम कैंजळगडावर मामाकडे जावें किंवा प्रथम शिवाजी असेल तेथें त्याला भेटावें आणि नंतर तो सांगेल तेथें जावें ! "

भास्करनें प्रथम शिवाजीलाच भेटावें असें ठरविलें आणि उद्यांच येथून निघावें असेंही त्यांनें ठरविलें.

इतकें ठरल्यावर भास्करनें तें मृत्युपत्र पुन्हा एकदां वाचलें. मग तें परत नळकंड्यात घालून, तें नळकंडें त्यानें घरांत बंदोबस्ताच्या जागीं ठेवून दिलें.

तें नळकंड बंदोबस्ताच्या जागीं ठेवून दिल्यावर भास्कर स्वगत म्हणाला, " मी कासेगांवाला यावयासाठीं कैंजळगडाहून निघालों, तेव्हा शिवाजीचा बेत लवकरच गणवंतगडास जावें असा होता. एव्हाना तो त्या गडावर गेलेलाच असेल. मी येथून निघेन तो गणवंतगडावर जाऊन शिवाजीची भेट घेईन आणि मग तो सांगेल तिकडे जाईन. पण कासेगांव सोडावयाच्या अगोदर पद्मिनीला भेटून तिचा निरोप घेणें जरूर आहे. तिनें माझ्या बरोबरीनें बाबांची सेवासुश्रूषा केली आहे. शिवाय, बाबांच्या मरणानंतर माझ्या मनाला विरंगुळा पडावा म्हणून, ती दररोज इकडे येत असे. ती फार चांगल्या स्वभावाची मुलगी आहे. तिचें वर्तन किती सभ्य आणि आदरशील, तिचें भाषण किती गोड आणि सरळ ! तिचें अंतःकरण किती मायाळु आणि पवित्र ! तिचे विचार किती प्रौक्त आणि गंभीर ! आणि तिचें रूप तरी किती गोड, किती मोहक ! तिचा सहवास रोज घडावा असें मला वाटतें, पण हे होणार कसें ? ती ह्या कासेगांवची स्थायिक आणि मी जरी ह्याच गांवचा आहे तरी मी नांवाचा ह्या गांवचा ! मी कधीं कैंजळगडावर मामाकडे तर कधीं शिवाजी सांगेल त्या कामगिरीवर जावयाचा ! पण तें कांहीं असो, ती मुलगी मला आवडते इतकें खरें. मला प्रेम करावयाला भाऊ नाहीं आणि बहीण नाहीं. समानवयाच्या माणसांत मिसळल्यानें सुख होतें. मी पद्मिनीला धाकटी बहीण समजून तिच्यावर प्रेम करीन. " या सरणीनें भास्कराच्या मनांत विचार चालले होते, आणि त्या गोड विचारांच्या आस्वादांत तो गढून गेला असता, तेथें अकस्मात् पद्मिनी आली !

---

## प्रकरण ४२ वें.

# पद्मिनीच्या दुःखाचें कारण.



मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें भास्कर पद्मिनीसंबंधाच्या गोड विचारांत असतां तेथें पद्मिनी आली! ती दृष्टीस पडतांच भास्कराचें सर्वांग आनंदरोमांचांनीं एकदम थरारून गेलें! प्रेमानें आणि आनंदानें त्याचे डोळे विस्फारित झाले आणि तो तिला म्हणाला, " पद्मिनी, मी उद्यां गणवंतगडास शिवाजीला भेटावयासाठीं जाणार आहें. तुझा निरोप घ्यावयासाठीं मी आतांच तुझ्या घरीं जावयाला उठणार होतों."

ही अप्रिय बातमी ऐकून पद्मिनीला भारी दुःख झालें. तें तिच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. ती म्हणाली, " भास्करराव, तुम्हीं ह्या गांवीं आल्यापासून दररोज तुमची आणि माझी गांठ पडत होती. तुमच्या सहवासांत गेलेला काळ मला अतिशय सुखकारक होत असे. आतां तुम्हीं गेल्यावर मला अगदीं एकटें पडल्यासारखें होईल. मन मोकळें करून कोणाशीं बोलेन म्हटलें, तर मला भाऊ नाहीं, बहीण नाहीं. गांवांतील कोणी मुली माझ्या आवडीच्या नाहींत. तुम्हीं येथून गेल्यावर मला अतिशय दुःख होईल!"

भास्कर म्हणाला, "पद्मिनी, तुझ्या सहवासांत येथें पंधरा सोळा दिवस जे माझे गेले, ते मी कधींही विसरणार नाहीं. बाबांचें मरण ही गोष्ट बाजूला ठेविली, तर हे दिवस मला फार सुखाचे वाटले. तुला सोडून जाणें मलाही दुःखकारक होईल. पण पद्मिनी आपल्या मधून मधून गांठी पडतीलच. माझें घरदार आणि शेतें ह्याच गांवीं असल्याकारणानें मला वारंवार इकडे यावें लागेलच, आणि मी येथें आलों म्हणजे तुला भेटेनच. आणि शिवाय तुझ्या लग्नाच्या वेळीं मी कोठेंही असलों तरी येथें येईनच येईन आणि तुला मी आहेर म्हणून एक सुंदर महेश्वरी काळी चंद्रकळा आणि एक जरीकाठी खण आणि एक चांदीचा कुंकवाचा करंडा......"

पण भास्करचें हें वाक्य अपूर्णच राहून गेलें. कारण तें वाक्य भास्कर उच्चारीत असतां पद्मिनी एकसारखी रडत होती! तिला रडतांना पाहून भास्कराला

दुःख झालें आणि आश्चर्यही वाटलें. तो तिला म्हणाला, " पद्मिनी, मी तुला दुःख व्हावें म्हणून हें बोललों नाहीं. तुझ्या लग्नांत मी तुला प्रेमाचा आहेर करीन, एव्हढेंच काय तें बोललों. तुझ्या लग्नाची गोष्ट तुला इतकी झोंबेल अशी मला कल्पना नव्हती. पद्मिनी, मी तुझी क्षमा मागतों. तुझें मन दुखवावें असें माझ्या स्वप्नींही नव्हतें. "

पद्मिनी रडें आवरून म्हणाली, " भास्करराव, मला रडें कोसळलें ह्यांत तुमचा कांहीं अपराध नाहीं. मला रडें आलें तें कांहीं वेगळ्याच कारणानें. कारण माझें लग्न होईल तें मला उत्सवाप्रमाणें आनंददायक होणार नाहीं, तर उलटपक्षी तें मला स्मशानयात्रेप्रमाणें दुःखदायक होईल !"

ह्या भाषणाचा अर्थ भास्करला कळला नाहीं. आश्चर्याच्या आणि दुःखाच्या मुद्रेनें तो पद्मिनीला म्हणाला, "पद्मिनी, तूं काय बोलत आहेस तें मला समजत नाहीं. "

पद्मिनी म्हणाली, " तें मी स्पष्ट करून सांगितल्याशिवाय तुम्हाला कळणार नाहीं. बापाची निंदा कन्येने तिऱ्हाइताजवळ करणें हें जरी वाईट आहे, तरी ह्या प्रसंगीं मी तसें करतें. माझ्या दुःखाचें कारण तुम्हाला सांगतें, ऐका. "

भास्कर जिज्ञासेच्या आणि दुःखाच्या मुद्रेने पद्मिनीच्या मुखावर दृष्टि लावून राहिला. ती म्हणाली, " भास्करराव, माझे बाबा भिकाऱ्यापेक्षां दरिद्रीं आहेत. बाबांचीं सर्व शेतें, सर्व मळे, सर्व बागा, सगळें घर, घरांतील सर्व भांडींकुंडीं, सर्व दागिने, सर्व सणंग विकलीं गेलीं आहेत, किंवा गहाण पडलेलीं आहेत. बाबांच्या मालकीची एक तनसडीही नाहीं. बाबा श्रीमंती थाटांत राहातात किंवा राहूं शकतात, ही त्यांच्या सावकाराची मेहेरबानी. ही बाबांची खरी स्थिति फक्त त्यांना आणि त्यांच्या सावकारालाच काय ती ठाऊक आहे, आणि मला ती कारणपरत्वें समजली. आमची राहाणी दिसण्यांत मात्र श्रीमंती थाटाची आहे. "

भास्करनें विचारलें, " तुझ्या बाबांचा सावकार तरी कोण आहे ? "

पद्मिनी म्हणाली, " ग्यानबा वाळुंज. ग्यानबाला बाबांनीं पन्नासहजार रुपये रोख दिले, तर ग्यानबा सर्व कर्जरोखे, सर्व गहाणखतें, आणि सर्व

प्रकारचे कागद फाडून देईल, आणि बाबा आज जसे दिसण्यांत शेतें, बागा, मळे, घरदार, भांडीकुंडीं, दागदागिने वगैरेचे मालक दिसत आहेत, तसे ते खरोखरींचेंच होतील. ”

भास्कर म्हणाला, “ आणि तुझ्या बाबानीं ग्यानबाला पन्नासहजार रुपये नाहीं दिले तर ? ”

पद्मिनी म्हणाली, “ तर पन्नासहजार रुपयांच्याऐवजीं बाबानीं ग्यानबाशीं माझें लग्न करून दिलें पाहिजे. ग्यानबाचें असें म्हणणें आहे कीं, पद्मिनी तरी मला द्या किंवा पन्नासहजार रुपये तरी द्या. नाहीं तर मी तुम्हाला दयामाया न करता घराच्या बाहेर हाकलून काढीन !”

भास्करनें विचारलें, “ ह्या पेचांत तुझे बाबा काय तोड काढणार आहेत ? ”

पद्मिनीनें उत्तर केलें, “ भास्करराव, बापाची निंदा मुलीनें करूं नये हें खरें आहे. पण माझ्यानें बोलल्याशिवाय राहावत नाहीं. माझे बाबा अगदीं लहानपणापासून धर्मनिषिद्ध, शास्त्रनिषिद्ध, निसर्गनिषिद्ध अशीं सुखें भोगण्याला चटावलेले आहेत. ह्या कामीं त्यांचे अतोनात पैसे खर्च होऊन, ते हल्लीं अगदीं भिकारी झाले आहेत. हीं सुखें अजून त्याना सोडवत नाहींत. ह्या सुखासाठीं ते ग्यानबांकडून नवींनवीं कर्जें काढतात आणि त्यांची स्थिति दिवसेंदिवस अधिकाधिकच विपन्न होत चालली आहे. परंतु गैरशिस्त सुखें त्यांच्यानें सोडवत नाहींत. हीं सुखें पूर्वीप्रमाणें चालू रहावी, आपण अतोनात श्रीमंती थाटात पूर्वीप्रमाणें राहावें, अशी बाबांची इच्छा आहे. म्हणून ते माझें लग्न ग्यानबाशीं करून देणार आहेत. हल्लीं कार्तिक महिना चालला आहे. हा महिना संपताच मार्गशीर्ष महिन्यात अगदीं पहिल्याच मुहूर्तावर माझें लग्न व्हावयाचें ठरलें आहे. आणखी सातआठ दिवसांनीं मी ग्यानबाची बायको होणार ! ह्या लग्नाला तुम्ही मंगलाविधि म्हणाल कीं, स्मशानयात्रा म्हणाल ? ”

भास्कर म्हणाल, “ पद्मिनी, हा ग्यानबा कोण आहे ? एका ग्यानबाचा लौकिक आमच्या केंजळगडावर आला आहे, तोच कां हा ?

त्यानें एका रांडेचा खून करून नंतर काजीला पैसे भरून तो खून छपाविला, तोच कां हा ग्यानबा ! ”

पद्मिनी म्हणाली, “ तोच तो ग्यानबा. ”

भास्कर म्हणाला, “त्याच ग्यानबानें आपल्या बायकोला छळून छळून विहिरींत जीव द्यावयाला भाग पाडलें ना ! ”

पद्मिनी म्हणाली, “ होय. ”

भास्करनें विचारलें, “ आणि त्यानेंच आपल्या मुलीला विजापुरच्या एका मुसलमान सरदाराला दहा हजार रुपयांना विकलें ना ! ”

पद्मिनी म्हणाली, “ होय. ”

भास्कर म्हणाला, “ आणि त्यानेच विजापुरास एका सरदाराच्या घरांत चोरी केली होती ना ! ”

पद्मिनी म्हणाली, “ होय. ”

भास्कर म्हणाला, “ आणि तो अस्सल मराठा नाहीं. ”

पद्मिनी म्हणाली, “ तो हीन जातीचा आहे. ”

भास्कर म्हणाला, “आणि तो नन्नाशीं उलटून गेलेला आणि अत्यंत कुरूप आहे. ”

पद्मिनी म्हणाली, “ होय, त्याच्या नाकाचा शेंडा लाल आहे आणि गालावर चमत्कारिक डाग आहेत. पण तुम्हाला हा ग्यानबा कसा ठाऊक ! ” तुम्ही त्याला कधीं पाहिलेला आहे काय ! ”

भास्कर म्हणाला, “ नाहीं. पण आमच्या केंजळगडावर ह्या बातम्या आलेल्या आहेत. ह्या ग्यानबाशीं तुला बायकोच्या नात्यानें जखडून बांधणारा बाप हा खरोखरीं पाषाणहृदयाचा म्हटला पाहिजे ! तूं म्हणतेस त्याप्रमाणें तुझें लग्न हा मंगलविधि नसून खरोखर मर्तिकाचा विधिच होय ! पण पद्मिनी, अजून तुझ्या लग्नाच्या दिवसाला अवकाश आहे. ह्या अवधींत कांहीं तरी तोड निघाली तर पाहूं. ”

पद्मिनी म्हणाली, “ पन्नास हजार रुपये ग्यानबाच्या थोबाड्यावर आदळले तर माझी सुटका होईल. पण हे पन्नास हजार रुपये यावयाचे कोठून ! ”

भास्कर म्हणाला, "कांहीं तरी खटपट करून तुला ग्यानबाच्या कचाटींतून सोडविण्याचा मी प्रयत्न करीन."

पद्मिनी आशेनें म्हणाली, "तुम्ही कोणच्या दिशेनें खटपट कराल ? आणि त्या खटपटीला यश येण्याचा बराचसा संभव आहे काय ?"

भास्कर म्हणाला, "पद्मिनी, तूं मला धाकट्या बहिणीप्रमाणें प्रिय आहेस. तुला ह्या पेचांतून सोडविण्याचा मी प्रामाणिकपणानें प्रयत्न करीन."

पद्मिनी म्हणाली, "तुम्ही प्रामाणिकपणानें प्रयत्न कराल ह्याबद्दल मला शंका नाहीं. पण तुमच्या प्रयत्नाला कितपत यश येण्याचा संभव आहे ? असें माझें विचारणें आहे."

भास्कर म्हणाला, "हे पहा पद्मिनी, तुझ्या मनांत आशा उत्पन्न झाली आणि नंतर ती आशा विफल झाली, तर तुला अतोनात दुःख होईल. म्हणून मी तुला व्यर्थ आशा लावीत नाहीं."

पद्मिनी म्हणाली, "पण तुम्हाला तरी थोडशी आशा वाटते का ?"

भास्कर म्हणाला, "पद्मिनी, मी कोणच्या दिशेनें प्रयत्य करणार आहे, हें तुला सांगतों. त्यावरून माझ्या प्रयत्नांना कितपत यश येणें संभवनीय आहे, हें तुझें तूंच ठरीव."

पद्मिनी म्हणाली, "बरें, सांगा."

भास्कर म्हणाला, "हे पहा पद्मिनी, शिवाजीचा मी सेवक आहे. माझ्यावर त्याचा लोभ आहे. तूं कोणच्या संकटांत आहेस हें त्याला मी सांगितलें असतां तो कांहीं तरी तोड काढूं शकेल. त्याचे दोस्त तानाजी, एसाजी आणि बाजी हे माझेवर प्रेम करणारे आहेत. शिवाय प्रचितगडाचा युवराजगडकरी कमळोपंत, हा माझ्याच वयाचा असून त्याच्याशीं माझी मैत्री आहे. कैंजळगडाचा युवराजगडकरी पुंडरीक, हाही माझ्याच वयाचा असून तोही माझा मित्र आहे. गणवंतगडाचा गडकरी मंदारराव हाही माझ्याच वयाचा असून, तोही माझा मित्र आहे. आम्ही सर्व मुलगे शिवाजीच्या मोहिमींत दंडाला दंड लावून लढलेले आहों. आम्हीं एकमेकांना साहाय्य केलेलें आहे. त्यांच्यापाशीं मी तुझ्यासाठीं एकादा शब्द टाकला, तर ते मला अगदींच धुडकावून लावतील, असें मला वाटत नाहीं.

म्हणून पद्मिनी, माझें तुला असें सांगणें आहे कीं, तूं अगदींच निराश होऊं नको. मी प्रयत्न करीन. माझ्या प्रयत्नाला यश येणें, हें नशीबावर अवलंबून आहे."

पद्मिनी म्हणाली, "तुमच्या प्रयत्नाला यश येईल, असा मला संभव वाटतो. परंतु यश न आलें, तरी मी तुमच्या उपकाराच्या ओझ्याखालीं राहीनच राहीन. माझ्या जन्माचें मातेरें झालें, तरी तुमच्या उपकाराचें मला कधीं विस्मरण होणार नाहीं!"

भास्कर म्हणाला, "पद्मिनी, तुझ्या जन्माचे मातेरे तेच माझ्या जन्माचें मातेरें असें मला वाटेल! मग माझ्या जीवितांत कांहीं स्वारस्यच राहाणार नाहीं, इतकी तूं मला प्रिय झालेली आहेस. परंतु सध्यांच अनिष्ट का चिंतावे? मी प्रयत्न करीन. पुढें काय होतें तें पाहूं. अझून सात आठ दिवस अवकाश आहे. उद्या मी येथून निघून गणवंतगडाकडे जाईन असें म्हणतों. तेथें मी तुझ्या संबंधाने खटपट सुरू करीन."

यानंतर भास्कर आणि पद्मिनी ह्यांचीं कांहीं किरकोळ संभाषणें झालीं. नंतर त्या दोघांनीं एकमेकांचे निरोप घेतले. मग भास्कर स्नान, सूर्याला अर्घ्यप्रदान, भोजन वगैरे कार्यासाठीं उठला व पद्मिनीही आपल्या घराकडे जावयाला निघाली.

---

## प्रकरण ४३ वें.

# भास्कर आणि शिवाजी.



भास्कराचें जेवणखाण आटोपल्यावर तो थोडासा विश्रांति घ्यावयासाठीं माजघरांत कांहीं वेळ आडवा झाला. त्याच्या मनांत यावेळीं अनेकप्रकारचे विचार चालले होते. प्रपितामहाच्या लेखासंबंधाचे विचार, पद्मिनीच्या बिकट परिस्थितीसंबंधाचे विचार, शिवाजीच्या उच्चतम ध्येयासंबंधाचे विचार, महाराष्ट्रीयांची ऐन जिनसी जूट करण्याच्या शिवाजीच्या हातोटीसंबंधाचे विचार, इत्यादि विचार त्याच्या मनांत ह्यावेळीं घोळत होते. ह्या प्रकारच्या विचारांत पद्मिनीच्या रूपगुणादिसंबंधाचे

विचारही मिश्रित झाले होते आणि ते त्याला स्वर्गीय आनंद चाखवीत होते !'

ह्या प्रकारच्या विचारांत भास्कर गढून गेला असतां त्यास "भास्कर मोरे यांचें हेंच घर काय ? " असा प्रश्न ऐकूं आला. तेव्हां भास्कर झटदिशीं उठून घराच्या पुढच्या दाराशीं आला आणि पाहातों तों शिवाजी आणि बत्ताशा !

भास्करला पाहातांच शिवाजी त्याला म्हणाला, " भास्कर, आम्ही इकडे येत असतांना तुझ्या वडिलांच्या मृत्युची खबर आम्हाला लागली. पण तुझे वडील अल्पवयी वारले नाहींत, परिपक्व वार्धक्यांत वारले. आणि मरणशय्येवर त्यांचे हाल झाले नाहींत, हें त्यांतल्या त्यांत बरें झाले. "

हें बोलत असतां शिवाजी आणि बत्ताशा हे दोघेही घोड्यावरून उतरलेले होते. भास्करानें बत्ताशाला घोडे कोठें बांधावे, वगैरे सूचना दिल्या. बत्ताशा दोन्ही घोडे तिकडे घेऊन गेल्यावर, भास्कर शिवाजीला म्हणाला, " आबा, मी उद्यांच तुझ्या भेटीला गणवंतगडावर येणार होतों, तों तूंच इकडे आलास. बरें, आबा, तुझ्या कायकाय सोयी आणि तजवीजी करूं तें सांग ! "

शिवाजी म्हणाला, " पहिली गोष्ट ही कीं, माझें आणि बत्ताशाचें अगोदर स्नान आणि भोजन झालें पाहिजे. नंतर मी तुला माझा येथें येण्याचा हेतु सांगेन. "

"ठीक आहे," असें शिवाजीला उत्तर देऊन भास्कर त्या व्यवस्थेला लागला.

भोजनानंतर बत्ताशा दातेगडाच्या परिसराचें अवलोकन करावयाला निघाला; शिवाजी आणि भास्कर हे माजघरामध्यें गप्पागोष्टी करावयाला बसले. दिवाकररावांच्या आजारासंबंधाचें बोलणें झाल्यावर शिवाजी म्हणाला, " भास्कर, तूं आतां पुढें काय करणार ? तुझीं शेतें आणि घरदार यांच्या संबंधाचीं कामें करावयासाठीं तुला कासेगांवालाच राहावें लागेल काय ? "

भास्कर म्हणाला, " आबा. तसें कांहीं नाहीं. मी पूर्वीप्रमाणेंच तुझीं कामें करावयाला मोकळा आहे. तूं सांगशील तिकडे जावयाला आणि तूं सांगशील तीं कामें करावयाला मी पूर्वीप्रमाणेंच सिद्ध आहे. माझे वडील ह्यात असतांना मुकुंदराव जोशी वैद्य हेच आमच्या शेतांचीं वगैरे कामें पहात असत. ते पुढेंही तशींच पहात रहावयाला कबूल आहेत. आणि आबा, माझीं शेतें तीं काय आणि त्यांचीं कामें तीं काय! जेमतेम दोन माणसांच्या चारितार्थाला पुरण्याइतकें धान्य आमच्या शेतांतून आम्हाला मिळतें. आणि ह्या घरांत दिवा लावावयाला माझ्या वडिलांची मावशी आहेच. मला येथें राहण्याची कांहीं जरुरी नाहीं. पूर्वीप्रमाणें तुझीं कामें करावयाला मी मोकळा आहे."

शिवाजी म्हणाला, " भास्कर, तूं माझीं कामें करावयाला मोकळा आहेस, हें ऐकून मला आनंद होत आहे. आणि खरें पाहिलें असतां, माझीं जीं कामें तीं माझ्याघरचीं कामें नसून देशहिताचीं कामें आहेत. माझीं जीं कामें तीं तुझींही कामें. कारण, माझा जो देश तोच तुझाही देश, असें नव्हे कां भास्कर?"

भास्कर म्हणाला, " आबा, तूं म्हणतोस तें खरें आहे. आपणा सर्व हिंदूंचा देश एकच आहे. परंतु तुझ्यासारखा पुढारी मिळणें दुर्लभ असतें. आज चारशें वर्षें हे मुसलमान लोक आपणाला जनावराप्रमाणें वागवीत आहेत. आपला देश म्हणून आजपर्यंत कोणी मराठा कां पुढें आला नाहीं? म्हणून, 'तुझीं कामें' म्हणण्यात मी कांहीं चुकी केलेली नाहीं. तुझीं कामें तीं तुझींच कामें, आमचीं नव्हेत! आमचीं कामें तुझ्या आज्ञा अमलांत आणणें इतक्या पुरतींच. बरें, तें असो. पण आबा, तूं आज इकडे कशासाठीं आला आहेस? तुझी गांठ घेणें मला जरूरीचें होतें म्हणून मी तुझ्याकडे गणवंतगडाकडे येणार होतों, तों तूंच आलास!"

शिवाजीनें विचारलें, " तूं कशासाठीं येणार होतास?"

भास्कर म्हणाला, " तें मी मागाहून स्वस्थपणें सांगेन. त्याचें विशेष महत्त्व नाहीं. पण तूं कशासाठीं इकडे आला आहेस, तें अगोदर सांग."

शिवाजी म्हणाला, " माझ्या सर्व दोस्तांच्या संमतीनें मी दातेगडावर मोहीम सुरू करणार आहें. खुद्द दातेगडांतलि भेद मला जितका जरूर

आहे, तितका मला मिळालेला आहे. माझ्यातर्फेच्या दोन स्त्रिया त्या गडावर वसति करून राहिल्या आहेत."

भास्कर म्हणाला, "नांदेडची मुक्ताबाई तावरे आणि नारखाची मोकळी झालेली भीमाबाई, ह्याच ना त्या दोन स्त्रिया ?"

शिवाजी म्हणाला, "होय. त्या दोन स्त्रियांकडून आम्हाला दातेगडाचा भेद पुष्कळसा समजलेला आहे. शिवाय, तानाजी आणि एसाजी दातेगडावर गस्तंगीर म्हणून जाऊन आलेले आहेत. त्यांनींहि पुष्कळ माहिती आणलेली आहे. त्या दोन स्त्रियांनीं आणि तानाजी आणि एसाजी ह्यांनीं जी माहिती मला पुरविली आहे,तिच्या जोरावर मी दातेगडावर हल्ला करूं शकेन. आणि हें माझें काम सुलभ करण्यासाठीं, माझ्या दोन दोस्तांनीं, दावूदभाई गडकरी आपणां मऱ्हाठ्यावर हल्ला करावयासाठीं आपलें सर्व सैन्य गडाच्या बाहेर आणील, अशी व्यवस्था करून ठेविली आहे.तें सैन्य बाहेर आलें,म्हणजे आपण मराठे लोक तें सैन्य सहज कुटून काढूं ! शिवाय आपल्या सुदैवानें दावूदभाईचा मुलगा हमीदभाई हा आपल्या तावडींत सांपडलेला आहे ! ह्यावेळीं तो गणवंतगडावर आसारमहालांत कैदी आहे !"

भास्कराने आश्चर्याच्या मुद्रेनें विचारलें, "काय आबा, दातेगडाच्या गडकऱ्याचा मुलगा आपल्या तावडींत सापडला आहे ?"

शिवाजी म्हणाला, "होय. तो आपल्या अटकेंत आहे, ही गोष्ट आपणाला अनुकूल आहे. दातेगडाची मोहीम आपल्या अंगलट येईलसें दिसलें, तर हमीदभाईचें बुजगावणें आपण पुढें करूं. दातेगड आपणाला जिंकून घेतां आला,तर हमीदभाईला आपण कैदेंतून मोकळा करून देऊं !"

भास्कर म्हणाला, "हें सर्व ठीक झालें. दातेगडावर तुझी मोहीम यशस्वी होईल, असें मला वाटतें. तूं गडाच्या बाहेरच्या प्रदेशाची टेहाळणी करावयासाठीं इकडे आला आहेस, कीं दुसऱ्या कांहीं कामासाठीं ?"

शिवाजी म्हणाला, "दातेगडाच्या आंतील जें कांहीं मला माहीत असणें जरूर आहे, तें सर्व मला माहीत झालें आहे. आतां बाहेरच्या प्रदेशाची मला माहिती पाहिजे आहे, ती मिळवावयासाठीं मी इकडे आलों आहे. ह्या गडाच्या भोंवतालच्या प्रदेशांत टेकड्या, नाले, खड्डे,

रानें, वगैरेंची मांडणी कशी आहे, आपलें मराठ्यांचें सैन्य कोठेंकोठें लपून बसूं शकेल, वगैरे गोष्टी ठरवावयासाठीं मी इकडे आलों आहे. मज-बरोबर बत्ताशाला मी आणलें आहे. आज संध्याकाळीं तानाजी, एसाजी, बाजी वगैरे दोस्त येतील. उद्यां सकाळीं भरमानाक, शिवनाक, हरनाक वगैरे लोक येतील. आम्हीं सगळेजण ह्या दातेगडाच्या सभोवतालचा प्रदेश पाहाणार आहों. टोळीच्या रूपानें नव्हे, एकएकट्यानें!"

भास्कर म्हणाला, "होय तेंच योग्य आहे. तुम्हीं सगळे लोक एक-दम कोठें गेलां तर लोकांना संशय येईल."

शिवाजी म्हणाला, "भास्कर, मी कासेगांवीं कां आलों आहे, हें तुला तपशीलवारपणें सांगितलें. आतां तूं माझ्याकडे कोणच्या विशिष्ट उद्देशानें येणार होतास, तें सांग."

भास्कर म्हणाला. "सांगतों, ऐक."

असें म्हणून भास्करनें आपली हकीगत तपशिलवारपणें शिवाजीस सांगण्याला सुरवात केली. ती हकीगत वाचकांना आम्हीं पुढील प्रकरणीं निवेदूं.

---

## प्रकरण ४४ वें.

# मृत्युपत्राचा उलगडा.



भास्करानें शिवाजीला प्रथम मोरेकुटुंबाचा इतिहास सांगितला. तो वाचकांना ठाऊकच आहे. दातेगडाचा शेवटचा हिंदूगडकरी विभाकरराव हा होता, तो मुसलमानांकडून पदच्युत केला गेल्यावर त्याला वैताग आला, त्यानें तीर्थयात्रा केल्या, मग तो म्हातारपणीं कासेगांवाला येऊन राहिला, त्यानें मरणसमयीं आपला मुलगा प्रभाकरराव ह्याच्या हवालीं एक कागद केला, त्या कागदांत मूल्यवान् उपदेश असून त्यांत तीन चमत्कारिक वाक्यें होतीं, प्रभाकररावानें आपणाला कांहीं डबोलें सापडेल म्हणून चांधयांच्या भिंती उतरल्या, पण कांहीं सांपडलें नाहीं म्हणून पुन्हा त्या त्याच विटांनीं बांधून काढल्या, दिवाकररावांनीं चांधयांची प्रत्येक वीट फोडून

पाहिली, पण त्यांना कांहीं द्रव्यप्राप्ति झाली नाहीं, त्या दोघांनीं देवऋषि, पंचाक्षरी, वगैरेंना पुष्कळ पैसे देऊं केले, पण त्यांनाही डबोल्याचा पत्ता लागला नाहीं, वगैरे हकीगत भास्करनें शिवाजीला सांगितली आणि ती हकीगत समाप्त करतांना तो म्हणाला, " आबा, विभाकररावांनीं आपल्या कुटुंबांत पुढें जन्मास येणाऱ्या पुरुषांस जो बोध केला आहे तो खरोखर भारी मूल्यवान् आहे. त्या बोधाच्या कागदांतील सगळीं वाक्यें तुटकतुटक आहेत. आणि बोध करण्याच्या ऐन भरांत असतां, मधून मधून तीन वाक्यांपैकीं एक एक वाक्य फेकून दिल्यासारखें दिसतें. त्या एका एका वाक्याचा मागच्या पुढच्या वाक्याशीं कांहीं संबंध नाहीं, किंवा कांहीं संदर्भ नाहीं. ह्या तीन चमत्कारिक वाक्यांपैकीं 'चांधया पहा' ह्याच एका वाक्यानें माझे आजोबा आणि माझे वडील फसले, असें मला वाटतें. ' चांधया पहा ' ह्या वाक्याचा त्यांनीं उत्तान अर्थ घेतला आणि त्या चांधया त्यांनीं उतरल्या आणि त्या चांधयांतील विटा फोडून पाहिल्या. मला वाटतें ' चांधया पहा ' ह्या वाक्याचा लाक्षणिक अर्थ माझ्या पणजोबाना अभिप्रेत असावा. त्या वाक्याचे अनेक लाक्षणिक अर्थ निघूं शकतील, त्यापैकीं कोणताही लाक्षणिक अर्थ घेतला, तरी त्यात मूल्यवान बोध आहेच आहे. "

शिवाजीनें विचारलें, " तूं कोणकोणचे लाक्षणिक अर्थ काढलेस ? "

भास्कर म्हणाला, "घराला जशा दोन बाजूला दोन चांधया असतात, तशा मानवी आयुष्याला बाल्य आणि वार्धक्य ह्या दोन चांधया आहेत, त्या पहा. याचा अर्थ असा कीं, बाल्य जसें पवित्र असते तसें वार्धक्यही पवित्र राख. 'चांधया पहा' ह्याचा दुसरा लाक्षणिक अर्थ असा कीं, चांधया मोठ्या पायावर रचलेल्या असतात, म्हणून त्या इतक्या उंच चढूं शकतात. त्याप्रमाणें आपल्या जीविताची इतिकर्तव्यता देशप्रीति, विश्वबंधुत्व, वगैरेसारख्या विस्तीर्ण पायावर उभारावी म्हणजेच आपल्या जीविताची सार्थकता होते, हें लक्ष्यांत धर. 'चांधया पहा' ह्याचा तिसरा लाक्षणिक अर्थ असा होऊं शकेल कीं, चांधया जरी आरंभीं भूतलाचा आधार घेऊन रचलेल्या असतात, तरी त्यांचें ध्येय स्वर्गाच्या वाटेकडे उंच उंच जाणें हें असतें. त्याप्रमाणें मानवी देह हा जरी पार्थिव द्रव्यानें बनलेला असतो, तरी

त्याच्या साधनानें आत्म्याची उन्नति आपण करून घेऊन स्वर्गसुख चाखावें. 'चांधया पहा' ह्याचा आणखी एक लाक्षणिक अर्थ निघूं शकेल तो हा कीं,...... "

शिवाजी म्हणाला, " भास्कर, 'चांधया पहा' ह्या वाक्याचे तूं दहा लाक्षणिक अर्थ काढलेस, तर मी पंचवीस अर्थ काढीन. पण हे लाक्षणिक अर्थ तूं किंवा मी काढीत बसण्यांत वेळ घालविण्यापेक्षां, तो कागदच मला पहावयाला दिलास, तर बरें होईल ! तसें करावयाला तुझी कांहीं हरकत नाहीं ना ? "

भास्कर म्हणाला, " आबा, तो कागद मी इतके वेळा वाचला आहे कीं, तो मला पाठ झाला आहे. "

असें म्हणून भास्करनें त्या कागदांतील मजकूर घडाघडा बोलून दाखविला. ' राजबिंड्या, आपण क्षत्रिय मराठे आहों ' या शब्दांपासून सुरवात करून तों ' जगीं बरे म्हणून घे. ' येथपर्यंतचा सर्व मजकूर भास्करनें म्हणून दाखविला. भास्कराचें हें पठण समाप्त झाल्यावर शिवाजी त्याला म्हणाला, " मजकूर मला कळला. आतां तुझी हरकत नसल्यास मला तो कागद डोळ्यांनीं पहावयाला दे. "

भास्कर म्हणाला, " माझी कांहीं हरकत नाहीं. हा पहा तो कागद. " असें म्हणून भास्करनें तो कागद ठेवला होता तेथून आणून शिवाजीच्या हातीं दिला. शिवाजीनें तो कागद लक्ष्यपूर्वक एकदां वाचला. मग तो डोळे मिटून कांहीं क्षण विचार करीत बसला. भास्करचें लक्ष्य शिवाजीच्या मुद्रेकडे होतें. नंतर कांहीं वेळानें डोळे उघडून शिवाजीनें तो कागद वाह्यात्कारें सहजगत्या पण वस्तुतः कांहीं विशिष्ट उद्देशानें आपल्या पुढें धरला. तो अशारीतीनें धरला कीं, आपल्या नजरेची दिशा भास्कराला न दिसावी. या रीतीनें तो कागद आपल्या डोळ्यांपुढें कांहीं वेळ धरल्यावर शिवाजीनें तो कागद जमीनीवर उताणा ठेविला. मग त्यानें कांहीं वेळ मंदस्मितपूर्वक दृष्टि भास्कराच्या मुखावर कांहीं न बोलतां निविष्ट केली. भास्करला शिवाजीच्या ह्या हावभावांचा कांहीं अर्थ कळला नाहीं. पण त्यानें कांहीं प्रश्न शिवाजीला विचारला नाहीं.

कांहीं क्षण ह्या स्थितींत गेले, तेव्हां शिवाजी गंभीर मुद्रेनें भास्करला म्हणाला, "भास्कर, तुला मी एक प्रश्न विचारतों, त्याचें मला उत्तर सांग."

भास्कर म्हणाला, " विचार. "

शिवाजी म्हणाला, " भास्कर, घटकाभर अशी कल्पना कर कीं, तुला कोणी खूब पैसा दिला, तर त्याचे तूं काय करशील ! "

भास्करनें साधेपणानें उत्तर दिलें, " माझ्या कुटुंबांतील आठ माणसांना कांहीं उद्योगधंदा न करतां जन्मभर खातां येईल,—अर्थात् नीतिमान राहणीनें राहून,—इतका पैसा मी स्वतासाठीं ठेवून घेईन आणि बाकीचा पैसा मी दीन, अनाथ, विपन्न अशा माणसांच्या आणि देशहिताच्या कामाला लावीन ! "

शिवाजी म्हणाला, " शाबास, भास्कर शाबास ! पैसा तुला मिळावयाला तूं पात्र आहेस ! "

भास्करनें विचारलें, " पण आबा, मला पैसा द्यावयाला कोण उदार माणूस पुढें येत आहे ? "

शिवाजी म्हणाला, " कोण म्हणजे ? तुझा पणजा ! "

भास्कर—" माझा पणजा ? "

शिवाजी—" होय, तुझा पणजा ! "

भास्कर—" माझा पणजा ? "

शिवाजी—" होय, होय, होय, तुझा पणजा ! आतां हा कागद तूं जेथून आणलास तेथें परत नेऊन ठेव. मग मला तुझें सारें घर दाखीव."

शिवाजीची ऐनदारी आणि इभ्रत इतक्या वरच्या दर्जाची होती कीं, त्याच्या नजरेपुढें सर्व माणसें जणों काय मंत्रबद्ध होऊन जात. फाजील जिज्ञासेनें प्रेरित होऊन कोणीही मनुष्य शिवाजीच्या पुढें बोलूं शकत नसे.

भास्करनें शिवाजीच्या आज्ञेप्रमाणें तो कागद पूर्वींच्या ठिकाणीं नेऊन ठेविला. मग शिवाजीच्या पुढें येऊन तो त्याला म्हणाला, "चल, आबा, मी तुला माझ्या सर्व घरांत हिंडवून आणतों. "

असें म्हणून भास्कर शिवाजीला बरोबर घेऊन निघाला. त्यानें त्याला

घराची पुढची पडवी, नंतर ओटी आणि ओटीला लागून असलेल्या दोन्ही खोल्या दाखविल्या. मग भास्करनें माजघर, आणि त्याला लागून एका बाजूस असलेलें स्वयंपाकघर दाखविलें. माजघराच्या दुसऱ्या बाजूस असलेली खोली,—जींत दिवाकरराव निजत बसत,—ती दाखविली. मग पिछाडीच्या घईमध्यें भास्करनें शिवाजीला नेलें. तेथून मागली पडवी दाखवून पिछाडीचें पटांगण दाखविलें. शिवाजीनें घराचे हे सर्व भाग लक्ष्यपूर्वक अवलोकिले.

मग पुन्हा माजघरांत येऊन बसल्यावर शिवाजी भास्करला म्हणाला, "भास्कर, तुझ्या पणजोबांचा लेख मी वाचला. 'चांधया पहा' ह्या वाक्याचा उत्तान अर्थ घ्यावयाचा नाहीं असें तुझें म्हणणें आहे, तसेंच माझेंही म्हणणें आहे. 'चांधया पहा' ह्या वाक्याचा लाक्षणिक अर्थ घेतला पाहिजे असें तुझें म्हणणें आहे, तसेंच माझेंही म्हणणें आहे. आतां 'चांधया पहा' ह्याचे शंभर लाक्षणिक अर्थ होऊं शकतील. पण त्या शंभर अर्थांपैकीं कोणचा विशिष्ट अर्थ घ्यावयाचा, एवढाच काय तो प्रश्न आहे. होय कीं नाहीं, भास्कर ?"

भास्कर म्हणाला, "होय."

शिवाजी म्हणाला, "मी कोणचा लाक्षणिक अर्थ घेतों, तो तुला सांगतों. पण तुझा तो कागद घेऊन ये, म्हणजे तुला सर्व नीट सांगतो."

शिवाजीच्या आज्ञेवरून भास्करने तो कागद आणून त्याला दिला. शिवाजीनें तो हातात धरून म्हटलें, "भास्कर, घराला दोन चांधया असतात ना ? एक उजव्या बाजूची आणि एक डाव्या बाजूची."

भास्कर—"होय."

शिवाजी—"पत्राच्या 'चांधया' म्हणजे पत्राच्या उजव्या आणि डाव्या अशा दोन बाजू म्हणावयाला काय हरकत आहे ?"

भास्कर—"कांहीं नाहीं."

शिवाजी—"पत्राच्या दोन 'चांधया पहा' म्हणजे पत्रांतील ओळींचीं डाव्या कडेचीं अक्षरें आणि उजव्या कडेचीं अक्षरें पहा, असा अर्थ करावयाला काय हरकत आहे ?"

भास्कर—"कांहीं नाहीं."

शिवाजी—" चांधया खालून वर बांधीत नेलेल्या असतात ना ? "

भास्कर—" होय. "

शिवाजी—" हें पहा पत्र ! या पत्राच्या डाव्याकडेची अक्षरें खालून वर वाचीत जा. मग उजव्याकडेची अक्षरें खालून वर वाचीत जा, म्हणजे काय चमत्कार होतो तो पहा !"

भास्करनें शिवाजीच्या सूचनेबरहुकूम तीं अक्षरें वाचलीं, तीं खालीं दिल्याप्रमाणें होतीं:—

" माझ्या खोलींत माच्याखालीं चार हात खण. लाख मोहोरा घे. गड परत घे. सदाचरण सतत कायम ठेव. "

ही चाळीस अक्षरें वाचून भास्कर आश्चर्यानें कांहीं क्षण स्तिमित होऊन गेला ! शिवाजी त्याच्या मुखावर दृष्टि स्थिरावून बसला होता. मग शिवाजी त्याला म्हणाला, " भास्कर, कोडें उलगडलें ना ? 'चांधया पहा' ह्या वाक्याचा लाक्षणिक अर्थ कोणचा घ्यावयाचा ह्या कोड्याचा उलगडा झाला ना ? "

भास्कर म्हणाला, " होय, आबा. उलगडा करण्याचें श्रेय तुझ्याकडे आहे ! "

शिवाजी म्हणाला, " माझ्याकडे नाहीं. तुझ्या नशीबाकडे आहे ! माच्याखालीं चार हात जमीन खणून जर तुला लाख मोहोरा सांपडल्या तर तूं खरा नशीबाचा असें मी समजेन !"

भास्कर म्हणाला, " मोहरा सापडणारच ! "

शिवाजी म्हणाला, " भास्कर, असें कां म्हणतोस ? चार हात खणून जर कोळसेच हाताला लागलें तर ? आपलें कर्म आपल्या संपत्तीचे कोळसे करतें अशीं उदाहरणें आपण पुष्कळ ऐकिलीं आहेत. म्हणून म्हणतों, तुझें नशीब जोरावर असलें तरच तुला लाख मोहरा मिळतील ! पण जमीन खणून पाहाणें हें केलेंच पाहिजे. "

भास्कर म्हणाला, " होय, आलबत ! "

शिवाजी म्हणाला, " आज संध्याकाळीं आपले दोस्त तानाजी, एसाजी आणि बाजी हे येणार आहेत. त्यांच्या मदतीनें आपण माच्याखालीं चार हात जमीन खणूं. पण पैसे जर खरोखरी सांपडले, तर त्यांचा विनियोग तूं मघाशीं मला सांगितल्याप्रमाणें करशील ना ? "

भास्कर म्हणाला, " आलबत करीन ! मी श्रीमंत झालों तर हुरळून जाणार नाहीं. बदफैलीपणा करणार नाहीं. दोन नवराबायको, चारपांच मुलें, एकाददुसरा नोकर, एकाददुसरा पाहुणा किंवा अनाथ माणूस, अशा दहामाणसांना जन्मभर पुरण्याइतका पैसा माझा समजून तो मी वापरीन. बाकीचा पैसा मी दीन, अनाथ आणि विपन्न अशांच्या उपयोगाला, आणि देशकार्याच्या कामाला लावीन ! आणि मला जर खरोखरीं लाख मोहोरा मिळाल्या, तर पहिल्या तडाख्याला पन्नासहजार रुपये मी पद्मिनीला एका चंडाळ बापाच्या कचाटींतून सोडविण्याच्या कार्याला लावीन !"

शिवाजीनें विचारलें, " ही पद्मिनी कोण ? "

तेव्हां, पद्मिनी ही सर्जेराव निंबाळकर यांची कन्या असून ते तिला ग्यानबा नांवाच्या आपल्या सावकाराला कर्जफेडीसाठीं बायको करून देणार आहेत ही हकीगत,—जी वाचकांना ठाऊक आहे ती,— भास्करनें शिवाजीला तपशीलवारपणें सांगितली. ती ऐकून शिवाजी म्हणाला, "भास्कर, तूं खरोखरीं महात्मा आहेस ! कारण, पद्मिनी तुझी कोणी नसतां तूं तिच्या मुक्ततेसाठीं पन्नास हजार रुपये द्यावयाला तयार आहेस ! तुझा संकल्प स्तुत्य आहे. तुझ्या नशीबानें तुला एक लाख मोहरा मिळोत, म्हणजे झालें ! "

याप्रमाणें शिवाजी आणि भास्कर ह्यांचें संभाषण चाललें असता तिसरा प्रहर उलटून गेलेला होता. ह्या समयीं बत्ताशा तेथें आला आणि म्हणाला, " आबा, तानाजी, एसाजी आणि बाजी आले आहेत. "

असें तो बोलत आहे, तों त्याच्या पाठोपाठ त्यानें सांगितलेले तीन गडी तेथें येऊन हजर झाले !

किरकोळ संभाषणें झाल्यावर आणि त्यांच्या आणि त्यांच्या जनावरांच्या स्वास्थ्याच्या सर्व तजवीजी झाल्यावर, तीं सर्व मंडळीं गप्पा मारावयाला बसली. दातेगड काबीज करण्यासंबंधाची वाटाघाट झाल्यावर, शिवाजीनें रात्रीं काय करावयाचें तें सर्वांना सांगितलें. चार हात जमीन खणावयाला जीं हत्यारें आणि उपकरणें जरूर होतीं, तीं सर्व जुळविण्यांत आलीं. प्रहरभर रात्रीं जमीन खणावयाचें काम सुरूं करावयाचें, असें सर्वानुमतें ठरलें.

———

## प्रकरण ४५ वें.

# मोहोरा कीं कोळसे ?



तोच दिवस. प्रहरभर रात्र उलटून गेली आहे. कासेगांवांत जिकडे-तिकडे शांतता नांदत आहे, अशासमयीं भास्कर मोरे याच्या वडिलांच्या खोलींत सहा पुरुष,—किंवा वास्तविक पाहिलें असतां सहा मुलगे,- बसलेले होते. ते कोण होते, तें वाचकांनीं तर्किलेंच असेल. शिवाजी, भास्कर, तानाजी, एसाजी, बाजी, आणि बत्ताशा असे ते सहा असामी होते. त्यांच्यापाशीं कुदळी, पावडीं, टिकाव, टोपल्या, पहारी वगैरे खोदकामाला जरूर तीं सर्व उपकरणें असून,त्या खोलींत एक मशाल,दोन तीन पणत्या आणि एक समयी अशीं प्रकाशसाधनें जळत होतीं. त्या खोलींतील माचा मागील पडवींत संध्याकाळींच नेऊन ठेवण्यांत आलेला होता.

सर्व वस्तूंची जुळवाजुळव झालेली आहे, असें पाहून शिवाजी आपल्या दोस्तांना म्हणाला, "गड्यांनो, आपली सर्व सिद्धता झालेली आहे. आतां देवाचें मनांत चिंतन करून कामाला सुरवात करावी, असें मला वाटतें."

तानाजी म्हणाला, "होय. आबा,पहिली कुदळ तूं आपल्या यशस्वी हातांनीं मार! नंतर आम्ही पांच गडी काम पुरतें करूं."

भास्कर म्हणाला, "होय, आबा, खणावयाला मुहूर्त तूं करून दे!"

सर्वांच्या इच्छेला मान देऊन शिवाजीनें कुदळीचा पहिला तडाखा जमिनीवर हाणला! मग त्यानें आपल्या हातांतील कुदळ भास्कराच्या हातांत दिली. त्यानें दुसरा तडाखा जमीनीवर हाणला, तानाजीनें तिसरा, एसाजीनें चवथा, बाजीनें पांचवा आणि बत्ताशानें सहावा तडाखा त्याच कुदळीनें हाणला.

त्या खणतीचें तपशीलवार वर्णन आम्हीं करीत बसत नाहीं. आम्ही इतकेंच वाचकांना सांगतों कीं, मध्यरात्रीच्या बरेंच अगोदर चार हात खड्डा खणला गेला. सगळ्या सहा गड्यांनीं आळीपाळीनें खणण्यानें आणि

माती बाहेर काढण्याचें काम केलें. पैकीं, खणण्याचें काम प्रथम कुदळीनें करण्यांत आलें, तरी पुढें पहारीचाच उपयोग बहुतेक करण्यांत आला.

तानाजी खड्ड्यांत उतरलेला होता. तो पहारीचे तडाखे मारीत होता. त्याच्या हत्याराचें टोंक धातूच्या पदार्थावर आपटल्याचा ध्वनि झाला! तो ध्वनि त्याच्या आणि खड्ड्याच्या तोंडाशीं बसलेल्या त्याच्या पांच दोस्तांच्या कानीं पडला! हा ध्वनि कानीं पडतांच सर्वांच्या छात्या धड-धडूं लागल्या!

हा ध्वनि ऐकताच शिवाजी म्हणाला, "तानाजी, आतां कुदळ दे वर माझ्या हातांत, आणि तू बोटांनीं त्या भाड्याचा पृष्ठभाग उघडा कर!"

तानाजीनें तसें केलें. एका हातभर व्यासाच्या ताब्याच्या हांड्यावर एक वीतभर व्यासाचें ताब्याचें पातेलें पालथें घातलेलें होतें. सर्वांनीं खड्ड्यांत डोकावून पाहिलें. हाडा आणि हांड्यावर झांकण घातलेलें पातेलें पाहून सर्वांच्या छात्या धडधडूं लागल्या! प्रत्येक मनुष्य स्वगत म्हणाला, "आता ह्या हाड्यात मोहोरा निघतात कीं कोळसे निघतात?"

तानाजीनें हांड्यावर झाकण घातलेलें पातेलें उताणें केलें. तों त्याला हांड्यांत काय दिसलें? पणतीच्या प्रकाशानें तानाजीला त्या हांड्यांत कांठोकांठ, चकचकीत, झगझगीत आणि पिवळ्या धमधमीत मोहोरा दिसल्या! त्याच्या मुखावर मोहोरांचीं पिवळीं किरणें पडून तें मुख पिव-ळसर दिसूं लागलें! त्याच्या पाच दोस्तांनीं खड्ड्यांत डोकावून पाहिलें, त्यांना त्या हांड्यांतील मोहोरा दिसल्या!

असो. तानाजीनें तीन चार ओंजळी मोहोरा पातेल्यांत घालून तें पातेलें त्यानें वरच्या दोस्ताच्या हातात दिलें! प्रत्येकानें त्या पातेल्यातून एक मूठ मोहोरा काढून त्या झेलून परत पातेल्यांत टाकल्या! शिवाजीनें भास्करची पाठ थोपटून प्रेमानें म्हटलें, "भास्कर, तूं खरोखर भाग्याचा मुलगा आहेस, म्हणून तुला हें डबोलें मिळालें!"

भास्करनें उत्तर दिलें, "पण कोड्याची किल्ली तूं हुडकून काढलीस, म्हणून हें डबोलें आपणाला मिळालें!"

भास्कराच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले! तो मनात उद्गारला, "जिजी, तूं आणि तुझे वडील आता ग्यानबाच्या तावडींतून सुटलां! देव तुमचें मलें करो!"

एवढा वेळ तानाजी खड्ड्यांतच उभा होता. तो हांड्यांतील मोहोरा हाताच्या बोटांनीं इकडच्या तिकडे आणि तिकडच्या इकडे करीत असता त्याला एक वीतभर लांब नळकंडें दिसलें ! तें त्यानें मोहोरांतून उपसून काढलें, आणि तें वर शिवाजीच्या हातीं देऊन तो म्हणाला, " आबा, हें नळकंडें ह्या हांड्यांत होतें. पहा त्यांत काय आहे तें. मी आता वर येतों. तें मोहोरांचें पातेलें कर इकडे. "

तानाजीनें तें पातेलें शिवाजीच्या हातांतून घेतलें. त्यांतील मोहोरा परत हांड्यांत ओतून, तेंच पातेलें त्यानें त्याचेवर पूर्वीप्रमाणें पालथें घालून ठेविलें. मग तो वर आला !

शिवाजीनें त्या नळकंड्याचें झाकण काढलें. तों त्याला एक कागदाची सुरळी दिसली. ती त्यानें उलगडली. त्या सुरळीचा कागद टीचभर रुंद, सहा वित्ती लांब. चकचकीत आणि गुळगुळीत होता. त्याचेवर लाखी शाईनें बारीक आणि वळणदार अक्षरांनीं लिहिलेल्या बाहत्तर ओळी होत्या. आणि त्याचे तळाशीं 'विभाकरराव बिन आदित्यराव मोरे' अशी सही होती. मृत्युपत्राच्या अक्षराचें वळण आणि ह्या कागदांतील अक्षराचें वळण एकच होतें, आणि ते दोन्ही लेख एकाच माणसानें लिहिलेले असले पाहिजेत, असें उघड दिसण्याजोगें होतें.

असो. ह्या कागदावर ओझरती नजर टाकून शिवाजीनें तो भास्करच्या हातीं दिला. भास्करनें तो मोठ्यानें वाचला. त्यात पुढील मजकूर होता.

" राजबिंड्या, तूं माझ्या पुढच्या कोणच्या पिढीचा पुरुष आहेस, हें मला ठाऊक नाहीं. तूं माझा मुलगा असलास, किंवा नातू असलास, किंवा पणतू असलास, किंवा पणतूचा मुलगा किंवा नातू किंवा पणतू असलास, किंवा त्याच्याही पुढच्या पिढीचा कोणीही पुरुष असलास, तरी तूं ह्या मोहराच्या हांड्यापर्यंत येऊन पोंचल्याबद्दल मी तुझें अभिनंदन करतों ! माझ्या मृत्युपत्राचें कोडें तूं सोडविलेंस, किंवा तुझ्या कोणी मित्रानें सोडविलें, ह्यावरून तुझी बुद्धिमत्ता किंवा त्या मित्राची बुद्धिमत्ता सिद्ध होत आहे, आणि त्या बुद्धिमत्तेचें मी कौतुक करतों ! तुझ्या मित्राच्या बुद्धिमत्तेनें हें कोडें उलगलें असल्यास अशा माणसाची तूं मैत्री संपादन केली आहेस म्हणून मी तुझें अभिनंदन करतों. असो.

हा पैसा,—जो तुला आतां मिळत आहे,—तो मी आणि माझ्या पूर्वजांनी न्याय्य मार्गानें मिळवून शिल्लक राहिलेला पैसा आहे. तुझ्या स्वताच्या कुटुंबांत सातआठ माणसें, किंवा दहाबारा माणसें, जीं असतील, त्यांच्या गरजा भागवावयाला जितका पैसा जरूर तितका तूं बेलाशक वापरावयाला काढ. बाकीचा पैसा तूं सत्कार्याकडे लावावा अशी माझी इच्छा आणि आज्ञा आहे. नीतिमान् पण विपन्न, विद्वान् पण दरिद्री, उत्साही पण पैशावांचून अडलेला, अशा माणसाच्या उपयोगाला हा पैसा तूं लाव! देशहिताच्या कामीं हा पैसा तूं लाव. ह्या आपल्या हिंदभूमीला यवनांच्या जाचांतून सोडविण्याकडे हा पैसा तूं लाव! हें काम तुझ्या आटोक्याबाहेरचें आहे असें वाटत असल्यास, तें ज्याच्या आटोक्यांत असेल त्याला हा पैसा तूं दे!

ज्याअर्थी तूं येथपर्यंत येऊन पोंचला आहेस,—स्वताच्या बुद्धिमत्तेनें किंवा लायक मित्राच्या बुद्धिमत्तेनें,—त्याअर्थी तुला मी वैभवाचा एक मार्ग सुचवितों. हा हांडा उचल. त्याच्याखालीं भुयार आहे. त्याच्या वाटेनें तूं न भितां जा. जेथें दगडांत कोरलेल्या मारुतीनें तुझा मार्ग अडेल, तेथील उजव्या बाजूची कडी ओढ, म्हणजे एक दगडी दार उघडेल. त्या दारानें तूं दोन हजार शिपायी घेऊन दातेगडांत शिरून तो काबीज कर! बाहेरून हल्ला करून तो गड जिंकून घेणें अशक्य आहे. ह्या वाटेनें दातेगड जिंकून घेण्याची तुझी धमक नसली, तर ज्याची धमक असेल त्याला ही वाट दाखीव! कोणीकडून तरी दातेगड यवनांच्या ताब्यांत राहूं देऊं नको!

ह्या भुयाराच्या वाटेंतील मारुतीच्या उजव्या बाजूस दगडी दार उघडण्याची कडी आहे आणि डाव्या बाजूस तें दार झाकण्याची कडी आहे. गडातून बाहेर पडण्यासाठीं जी हिकमत आहे, ती तुला गडाच्या बाजूनें बारकाईनें तपास केल्यास कळून येईल!

राजबिंड्या, तुझी धमक असल्यास ह्या वाटेनें जाऊन दातेगड जिंकून घेऊन तेथला गडकरी हो!

राजबिंड्या, प्रयत्न कर! प्रयत्नाअंतीं परमेश्वर!

राजबिंड्या, देव तुझें भलें करीं!"

भास्कराचें वाचन समाप्त झालें तेव्हां त्या मंडळीमध्यें त्या वाचनानें

उपस्थित झालेल्या विषयांसंबंधानें पुष्कळ वेळ वाटाघाट झाली. मग सर्वांच्या अनुमतानें असें ठरलें कीं, दुसऱ्या दिवशीं प्रहरभर रात्र चढली म्हणजे सर्वांनीं, आणि दुसऱ्या दिवशीं येणाऱ्या भरमानाक, शिवनाक ह्यांनीं, मोहोरांच्या हांड्याखालच्या भुयारांतून दातेगडापर्यंत जाऊन यावें!

इतकें झाल्यावर सर्व वस्तूंची आवराआवर करून भास्कर, शिवाजी वगैरे सहा मुलगे रात्रीच्या विश्रांतीसाठीं आपल्या पथाऱ्या पसरून निजावयाला गेले!

त्या दिवशीं सर्वांना श्रम झालेले असल्याकारणानें सर्वांना तत्काळ झोंप लागली!

---

## प्रकरण ४६ वें.

# पद्मिनीचें आश्वासन.



दुसरा दिवस, म्हणजे कार्तिक वद्य दशमी, सोमवार, हा दिवस उजाडला. तेव्हां शिवाजी, भास्कर वगैरे सहा मुलांनीं आपलीं प्रातःकाळचीं कृत्यें आटोपलीं. मग सर्वांनीं न्याहारी केली. मग आपण पद्मिनीच्या भेटीला जात आहों असें शिवाजीला सांगून, भास्कर सर्जेरावांच्या घराकडे जावयाला निघाला.

भास्कर सर्जेरावांच्या घरात शिरला, तेव्हां ते कांहीं कामानिमित्त बाहेर गेलेले होते. पद्मिनी बागेतील झाडांना पाणी घालण्याच्या कामांत निमग्न होती. परंतु हें पाणी घालण्याचें काम तिच्या हातून तरतरीतपणानें होत नव्हतें. ती कांहीं तरी दुःखाच्या विचारांत गढलेली असावी असें तिच्या मुद्रेवरून व्यक्त होत होतें! आपल्या लग्नाचा दिवस जवळ येत चालला आहे, भास्कररावांच्या प्रयत्नांना यश न आलें तर आपणाला ग्यानबासारख्या अनीतिमान आणि पाषाणहृदयी माणसाच्या सहवासांत आयुष्य घालवावें लागणार, इत्यादि विचार पद्मिनीच्या मनांत ह्यावेळीं घोळत असल्याकारणानें तिची मुद्रा दुःखी दिसत होती!

पद्मिनीच्या मुखावर ही दुःखाची छटा पाहून, भास्कराला भारी दुःख

झालें; परंतु तिच्या दुःखाचें निरसन करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे हा विचार मनांत येताच भास्कराचें दुःख क्षणात विलुप्त झालें, आणि त्याची मुद्रा आनंदित झाली !

भास्कराचें आनंदित मुख पाहून पद्मिनीला आनंद झाला ! भास्कराच्या प्रयत्नाना यश आलें असावें, असा पद्मिनीनें तर्क केला. ती झाडाना पाणी घालण्याचें काम बंद करून त्यांच्या मुखावर दृष्टि निविष्ट करून उभी राहिली. तेव्हा भास्कर तिला म्हणाला, " पद्मिनी, तुझी एकटीची गाठ घ्यावी अशी माझी इच्छा होती. तूं येथे एकटी आहेस ही सुदैवाचीच गोष्ट होय ! मी तुला काहीं आनंदाची गोष्ट सागावयासाठीं ह्यावेळीं मुद्दाम तुझ्याकडे आलो आहें ! "

पद्मिनीनें विचारलें, " ती कोणची ? "

भास्कर म्हणाला, " तूं तर्क कर ! "

पद्मिनी म्हणाली, " भास्करराव, तुम्ही म्हणता कीं, गोष्ट आनंदाची आहे म्हणून. पण मी तुम्हाला असें विचारतें कीं, ती गोष्ट साक्षात तुम्हाला आनंददायक असली तरी परंपरेनें ती मलाही आनंददायक होईलच. आणि साक्षात् मला आनंददायक असली, तरी परंपरेनें ती तुम्हांलाही आनंददायक होणारच. कारण, तुमचें आणि माझें आतां बंधुभगिनींचें नातें झालेलें आहे. होयना भास्करराव ? "

भास्कर म्हणाला, " होय. हे तर खरेंच आहे. पण पद्मिनी, मी जी आनंदाची गोष्ट तुला सागणार आहें, ती जर साक्षात् तुला आणि परंपरेनें मला आनंददायक असली, तर तूं काय म्हणशील ?"

पद्मिनी म्हणाली, " भास्करराव, साक्षात् मला आनंददायक अशी कोणती गोष्ट असणार ? "

भास्कर म्हणाला, " तूं तर्क कर. "

पद्मिनी म्हणाली, " साक्षात मला आनंददायक अशी जगांत एकच गोष्ट असणें शक्य आहे. "

भास्कर म्हणाला, " ती कोणची ? "

पद्मिनी म्हणाली, " ती हीं कीं, माझे बाबा ग्यानबा सावकाराच्या कचाटींतून सुटले, तर मला अतिशय आनंद होईल !"

भास्कर म्हणाला, "तुझे बाबा ग्यानबा सावकाराच्या कचाटींतून सुटणें, म्हणजे तूं ग्यानबा सावकाराच्या कचाटींतून सुटणें होय!"

पद्मिनी म्हणाली, "भास्करराव, तें तर खरेंच. पण बाबा सुटावेत ही माझी पहिली इच्छा, आणि मी सुटावें ही दुसरी इच्छा."

भास्कर म्हणाला, "पण दोघांचीहि सुटका एकाच गोष्टीने होत असली तर!"

पद्मिनी म्हणाली, "पन्नास हजार रुपये जर पुढें आले, तर बाबा सुटतील आणि बाबा सुटले म्हणजे मी ही सुटेन! पण पन्नासहजार रुपये येणार कोठून?"

भास्कर म्हणाला, "पद्मिनी, तूं आणि तुझे बाबा अशीं तुम्ही दोन्हीहि माणसें ग्यानबाच्या तावडींतून सुटाल, असें मी तुला खात्रीनें सांगतों! तूं आपलें दुःख विसरून जा. तूं सुखाचे दिवस पाहशील आणि सुखाचे दिवस पाहाण्याला तूं पूर्णपणें लायक आहेस!"

पद्मिनीनें विचारलें, "भास्करराव, बाबाना कर्जमुक्त तुम्ही करूं शकलां तर ह्या गोष्टी शक्य आहेत. तुम्ही त्याना कसे कर्जमुक्त करणार?"

भास्कर म्हणाला, "पद्मिनी, तें मी तुला पुन्हा केव्हां तरी सांगेन. आज सांगत नाहीं. परंतु मी तुला आज इतकेंच ठासून सांगतों कीं, तूं आणि तुझे बाबा ग्यानबाच्या तावडींतून मुक्त व्हाल! ग्यानबाची बायको होण्याचा दुर्धर प्रसंग तुझ्यावर येणार नाहीं! पण पद्मिनी, ग्यानबाच्या तावडींतून तुझे बाबा मुक्त झाले, आणि तुझ्या बाबांच्या तावडींतून तूं स्वतः मुक्त झालीस, म्हणजे तुझे बाबा तुला अमक्याची बायको हो अशी सक्ती करूं शकणार नाहींत. तूं आपल्या इच्छेला अनुसरून आपला पति करून घेऊं शकशील. असेंच ना पद्मिनी?"

पद्मिनीनें उत्तर दिलें, "आलबत. पण भास्करराव, मी माझा पति ठरवावयाला स्वतंत्र झालें, तर मी दुसऱ्या कोणाला पति ठरविणार? मी तुमच्याच पायांची दासी होणार! तुमच्या प्रयत्नांनींच ज्याअर्थी मला स्वतंत्रता मिळणार आहे, त्याअर्थी मी दुसरा कोण पति करून घेणार? तुमची माझी प्रथम गांठ पडली तेव्हांपासून तुमच्या अंगच्या गुणांनीं माझ्या मनावर फार मोठा परिणाम घडवून आणला आहे! तुमची उप-

कारशीलता, तुमच्या मनाचें पावित्र्य, तुमचा मर्यादशीलपणा, तुमची देशप्रीति, तुमचें शौर्य, इत्यादि अनेक गुणांनीं माझ्या हृदयाला तुमच्याशीं जणों काय जखडून बांधलें आहे! तुम्ही जर मला बायको करून घ्यावयाला तयार असाल, तर मी तुमची बायको मोठ्या आनंदानें होईन!"

भास्कर म्हणाला, "पद्मिनी, तुझ्याशिवाय मीहि दुसऱ्या कोणा मुलीला आपली बायको करून घेणार नाहीं! तुझ्या मनाचें पावित्र्य, तुझी पितृभक्ति, तुझें शौर्य, तुझा स्वभाव, तुझें शील इत्यादि अनेक गुणांमुळें तूं मला प्रिय झालेली आहेस! तुझ्या सहवासांत माझें आयुष्य सुखांत जाईल. तूं माझी बायको व्हावयाला सिद्ध असलीस तर माझ्यासारखा सुखी मीच, असें मी म्हणेन!"

हें भाषण भास्कर बोलत असता पद्मिनी भास्कराच्या मुखावर आनंदाची दृष्टि निविष्ट करून स्तब्धपणें उभी राहिली होती. आपली कृतज्ञता भास्कराला कोणच्या शब्दांनी व्यक्त करावी हे तिला सुचत नव्हते!

असो. भास्कर पुढे म्हणाला, "पद्मिनी, मी जे कांहीं तुला सांगत आहे तें गुप्त ठेव, ते कोणालाहि कळतां कामा नये. तूं हल्लींच्या पेचांतून सुटणार आहेस, ही गोष्ट तूं आपल्या पित्याला देखील कळवूं नको. मी जें तुला सांगितलें आहे, तें सध्या गुप्त ठेवलें पाहिजे, सध्याचे माझे कांहीं दिवस घाईच्या आणि [illegible] आणि महत्त्वाच्या कामांत जावयाचे आहेत! तीं कामें सगळीं समाप्त झाल्याशिवाय तुझ्या भेटीला मला येतां यावयाचें नाहीं, तथापि तूं धीर धरून अस! तुझी मला विस्मृति कधीं पडणार नाहीं! तुझ्या वडिलांच्या हालचाली मला कळत राहतील, अशी मी तजवीज करून ठेवीन! मी ऐनवेळेला येऊन हजर होईन. मार्गशीर्ष महिन्याची भीति सोडून दे!"

भास्कराचें हें भाषण चाललेलें असता पद्मिनी आनंदसागरात जणों काय निमग्न होऊन गेली होती, आणि ह्या आनंदामुळें तिचें सुंदर मुख फारच मोहक दिसत होतें! पद्मिनीला सुखी करण्याचें पुण्य आपल्या वाट्याला येत आहे, म्हणून भास्कराला धन्यता वाटत होती!

असो. नंतर तो तिला म्हणाला, "पद्मिनी, मला आतां फुरसत नाहीं. मी कांहीं घाईच्या कामांत आहें. मी तुला जें कांहीं सांगितलें

आहे, तें लक्ष्यांत ठेव आणि दुःख विसरून जा ! तुला मी ग्यानबाच्या कचाटींतून सोडवावयाला पूर्णपणें समर्थ आहें आणि सोडवीनहि. बरें, पद्मिनी, मी आतां जातों. जाऊं ! ”

पद्मिनी म्हणाली, “ होय !”

भास्कर तेथून निघाला तो तडक आपल्या स्वताच्या घरीं आला.

---

## प्रकरण ४७ वें.

# देशभक्तांचे पुढचे बेत.



पद्मिनीला भेटून आणि तिला आनंदाची खबर सांगून भास्कर परत आला. त्यानें पद्मिनीशीं झालेलें संभाषण शिवाजीला संक्षिप्तपणें सांगितलें.

भास्कराची हकीगत समाप्त होत आहे तों तेथें भरमानाक, शिवनाक आणि हरनाक येऊन हजर झाले. त्यांनीं शिवाजीला जोहार करून आपली वरंचकिडची हकीगत सांगावयाला सुरवात केली. भरमानाक म्हणाला, “ हत्याराच्या आणि पैशाच्या गाड्या अमुक दिवशीं अमुक वेळीं विजापुराहून सुटल्या, ही खबर मला माझ्या हेराकडून कळली. रोज संध्याकाळीं त्या गाड्याचा मुक्काम कोठें होत असे, ह्या संबंधाची ताजी खबर मला रोजच्या रोज माझ्या हेराकडून कळत असे. त्यावरून त्या गाड्या वरंची मार्गे टाकून पुढें आल्या म्हणजे त्यांना अमुक ठिकाणीं गाठावें, असें मी ठरवून ठेविलें होतें. मला सोयिच्या स्थळीं त्या गाड्यांचा मुक्काम झाला तेव्हां मी त्या गाड्यांच्या रखवालीच्या शिपायांचा नायक सय्यद करीम ह्याला भेटलों, आणि माझें कार्य साधून घेतलें. ”

येथपर्यंत भरमानाकाने आपलें निवेदन आणलें. नंतर त्यानें आपल्या बिंदुवेधी शिपायांच्या तिरंदाजीचें प्रदर्शन करून आपण सय्यद करीम याला कसें घाबरविलें, त्याला भोपाळगडाकडे कसें नेलें, तेथें गडकऱ्याच्या हवालीं त्या गाडीवानांना आणि सय्यद करीमला आणि त्याच्या जोडी-

दाराना कसें केलें, वगैरे तपशीलवार हकीगत भरमानाकानें शिवाजीला सांगितली.

ही हकीगत सागताना भरमानाकाने सय्यदकरीमचं पूर्ववृत्त शिवाजीला कळविले नाहीं. दातेगडाची मोहीम समाप्त व्हावयाच्या अगोदर त्या गोष्टीचा वेध शिवाजीच्या मनाला न लागावा, असा भरमानाकाचा उद्देश होता.

असो. विजापुरच्या गाड्या आपल्या कबज्यात आल्या ह्याबद्दल शिवाजीला फार आनंद झाला. त्यानें भरमानाकाला ह्या पराक्रमाबद्दल शाबासकी दिली.

ह्यानंतर शिवाजीनें भरमानाक आणि त्याचे जातभाई याना दातेगडाच्या आसमंताचें निरीक्षण करून येण्याची कामगिरी सांगितली.

× × ×

प्रहरभर रात्र चढली आहे. कासेगावात जिकडेतिकडे शातता नादत आहे. भास्कराच्या घरांतील दिवाकररावांच्या खोलींत नऊ माणसें जमलेलीं आहेत. आदल्या दिवशीं ह्याच समयीं जीं सहा माणसें ह्या खोलींत होती त्यांच्यात आतां भरमानाक, शिवनाक आणि हरनाक ह्या तिघांची भर पडलेली होती.

ह्या खोलींत ह्यावेळीं एक समई आणि दोनतीन पणत्या तेवत होत्या. तेथे सज्ज केलेल्या नऊदहा मशाली होत्या पण त्या पेटविलेल्या नव्हत्या. तेथे दहाबारा तरवारीहि असून कांहीं भाले होते.

सर्व गोष्टींची सिद्धता झाली असे पाहतांच शिवाजी आपल्या दोस्तांना म्हणाला, " माझ्या शूर गड्यांनो, आता आपण कामाला लागावे असें मला वाटतें. "

त्यावर सर्वजण म्हणाले, " होय, आम्ही तयार आहों ! "

तव्हां तानाजी, भरमानाक, शिवनाक आणि हरनाक असे चौघेजण आदल्या दिवशीं केलेल्या खड्ड्यांत उतरले. त्यांनीं काळजीपूर्वक मोहोरांचा हांडा त्याच्या पहिल्या स्थानावरून पलीकडे सरकावला. तेव्हां त्यांना तेथें एक वाटोळें भोक दगडांनीं बांधून काढलेलें दिसलें ! ह्या भोकांत मशाल घालून त्यांनीं पाहिलं तों त्यांना चिरेबंदी दहा पायऱ्या दिसल्या.

पूर्वी ठरल्याप्रमाणें वरच्या खोलींत शिवाजी, बाजी आणि भास्कर असे तिघेजण बसून राहिले. तानाजी, एसाजी, बत्ताशा आणि तीन अंत्यज दोस्त मशाली आणि तरवारी घेऊन ह्या दहा पायऱ्या उतरून भोकांतून खालीं गेले, आणि ही भुयाराची वाट चालू लागले ! ही वाट तीन माणसांना दंडाला दंड न लागूं देतां चालण्याइतकी ऐसपैस होती !

ह्या वाटेनें हे सहा गडी मशालींच्या प्रकाशाने चालत होते. मधून मधून त्यांना डोंगराच्या फटींतून येणाऱ्या गार वाऱ्याच्या झुळका हुशारी देत होत्या ! ह्या भुयाराच्या वाटेनें चालतांना त्यांना गुदमरल्याची भावना कोठेंच होत नव्हती !

ज्या वाटेनें आपले हे सहा शूरगडी चालले होते ती कांहीं ठिकाणीं सपाट होती, कांहीं ठिकाणीं खडबडीत होती, तरी सर्व ठिकाणी ती ऐसपैस होती, आणि कित्येक ठिकाणीं तर ती सहाच्या सहा गड्यांना एका रांगेंत चालतां येण्याइतकी रुंद होती !

वाटेमध्ये कित्येक ठिकाणीं त्यांच्या अंगावर डोंगराच्या फटींतून येणाऱ्या वाऱ्याचे झोत येत होते आणि त्यांच्या मशालींच्या ज्योती फडफडत होत्या, परंतु त्या ज्योती विझविण्याइतक्या जोराचे ते झोत नव्हते.

ही वाट बहुतेक चढणीची होती. आणि बरेच ठिकाणीं ती शिडी-वजा होती

ही वाट वळणावळणाची होती. हीं वळणें बहुतेक ठिकाणीं सौम्य होती आणि क्वचित्स्थळीं बिकट होती.

ह्या वाटेनें ते बराच वेळ चालले, तेव्हा त्यांना एक साधारण चौकोनी आकाराची गुहा लागली, तिचा तळ सपाट असून ती सुमारें हजार माणसांना समावून घेण्याइतकी प्रशस्त होती !

ह्या गुहेमध्यें आमचे सहा गडी कांहीं वेळ विश्रांति घ्यावयासाठीं बसले !

विश्रांति घेऊन ताजेतवाने झाल्यावर, हे सहा गडी पुन्हा आपल्या भूगर्भमार्गानें चालूं लागले !

याप्रमाणें दोन घटका मार्ग क्रमिल्यावर, त्यांची गति एकदम कुंठित झाली. त्यांच्यापुढें भिंतीसारखा खडक होता !

ह्या खडकावर ओबडधोबड रीतीनें कोरून काढलेली मारुतीची मूर्ति होती. सर्वांनीं त्या मूर्तीपुढें हात जोडले आणि 'इष्ट कार्यात यश दे' म्हणून मारुतीची मनोभावानें प्रार्थना केली !

हा प्रार्थनेचा विधि झाल्यावर तानाजी पुढें सरसावला. त्याच्या पाठोपाठ त्याचे पांच दोस्त होतेच.

तानाजीनें आपली मशाल उंचसखल करून मारुतीच्या दोन्ही बाजूंच्या भिंतींचें निरीक्षण केलें. तेव्हां त्याला दोन लोखंडी कड्या दिसल्या. तेव्हा तो आपल्या दोस्तांना म्हणाला, " गड्यांनो, ही कडी ओढली असतां दार उघडतें, आणि ती कडी ओढली असता ते दार झाकतें ! ओढूं ही कडी ? "

त्याचे दोस्त म्हणाले, " ओढ !"

तेव्हां तानाजीनें मारुतीचें मनांत स्मरण करून उजवीकडची कडी खेचली ! त्याबरोबर ओणव्याने शिरतां येईल इतकें उंच एक दगडी दार नरमाद्यांवर आवाज न होतां आंतल्या बाजूस फिरलें !

ह्या उघडलेल्या दारांतून एकदम इतक्या जोराचा वाऱ्याचा झोत आला कीं, सर्वांच्या हातांतील मशाली एकदम विझून गेल्या आणि तेथें निबिड अंधकार पसरला !

परंतु आपले शूर गडी भ्याले नाहींत ! गडांत ह्या वेळीं ह्या बाजूस कोणी माणूस वावरत असलें, तर त्याला आपले हे चोरटे कारभार कळूं नयेत म्हणून ह्या मशाली विझल्या हा आपणाला शुभशकुनच झाला, असें सर्वांना वाटलें.

असो. ह्या दारांतून तानाजी आणि एसाजी यांनी बाहेर डोकावून पाहिलें. ह्या वेळीं आकाशांत जरी निबिडतम अंधकार होता, तरी चांदण्याच्या प्रकाशानें त्यांना बाहेरचा देखावा बराच स्पष्ट दिसत होता ! दातेगडाचा कोणचा भाग आपणास दिसत आहे हें तत्काळ त्यांनी ओळखिलें. दातेगडावर गस्तंगिरांच्या वेषानें ते दोघेजण गेले होते. तेव्हां आजमखानानें त्यांना दाखविलेल्या नैर्ऋत्य कोंपऱ्यांतील जो सैतानहांडा तोच हा, असें त्यांना तत्काळ कळून आलें ! परंतु त्यांनीं त्याबद्दल मुखावाटे कांहीं उद्गार काढला नाहीं !

तानाजी आणि एसाजी ह्यांनीं हें निरीक्षण केलें, तसें त्यांच्या बाकीच्या दोस्तांनींही आळीपाळीनें निरीक्षण केलें. मग ते सगळे गडी गुहेंत परत आले. मग तानाजीनें डावीकडची कडी खेचली. तेव्हां तें दगडीदार नरमाद्यावर बिलकुल आवाज न करता मिटलें ! आकाशातील चांदण्याही ह्या सहा गड्याना दिसेनाशा झाल्या ! जिकडेतिकडे गडद अंधकाराचें साम्राज्य सुरु झालें ! ह्या सहा गड्यानीं चकमकीच्या साधनानीं आपल्या मशाली पुन्हा पेटविल्या. आणि मग ते आल्यावाटेनें भुयाराच्या मार्गानें परत फिरले !

हीं सहा माणसें येऊन शिवाजीला भेटलीं, आणि त्यानीं त्या चोरवाटेचें तपशीलवार वर्णन त्या वाटेनें न गेलेल्या शिवाजी, भास्कर ह्या माणसांना सांगितलें. दुसऱ्या दिवशीं त्या वाटेनें पुन्हां तानाजी, एसाजी, शिवाजी वगैरेंनीं जावें असें ठरवून, हीं माणसें रात्रीच्या विश्रांतीसाठीं निजावयाला गेलीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं हे देशभक्त दातेगडाच्या टेकडीच्या आसमन्तात भागाचें अवलोकन करावयाला गेले. ते परत आल्यावर त्यानीं भास्कराच्या घराच्या पिछाडीच्या विस्तीर्ण आणि बंदिस्त पटांगणाचें अवलोकन केलें. हें करीत असता शिवाजी आपल्या दोस्तांना म्हणाला, " गड्यानों, चोरवाटेनें जें आपलें सैन्य दातेगडांत शिरणार त्याचा तळ ह्याच पटांगणांत आपण देऊं ! "

त्याचे दोस्त म्हणाले, "होय, हेंच पटांगण त्या कामाला योग्य आहे. तें बंदिस्त असल्याकारणानें येथें उतरलेले शिपायी बाहेरच्या लोकाना दिसणें शक्य नाहीं ! "

हें झाल्यावर सगळ्या देशभक्तांचीं जेवणें झालीं. नंतर त्यानीं आपल्या मोहिमेचे तपशील ठरविले.

हे तपशील ठरल्यावर शिवाजीनें भोपाळगड, कंजळगड, जंगली जयगड, गणवंतगड, प्रचितगड वगैरे गडांकडे आपले जासूद रवाना केले. त्या गडकऱ्यांनीं आपले लढाऊ गडी लायक इसमांच्या नायकत्वाखालीं अमुक दिवशीं, अमुक वेळीं आणि अमुक ठिकाणीं हजर करावे, त्यांची संख्या अमुक असावी, त्यांच्याजवळ अमुक अमुक

तारक आणि मारक हत्यारें असावी, इत्यादि तपशीलवार हुकमांचीं पत्रें ह्या जासूदांबरोबर देण्यांत आलेलीं होती ! हें केल्यावर शिवाजीनें दातेगडावर करावयाच्या मोहिमीचे तीन भाग करून, प्रत्येक भागाची अंमलबजावणी विशिष्ट माणसांकडे सोपवून दिली !

यानंतर तानाजी आणि एसाजी हे दोघेजण दातेगड ज्या डोंगरावर बांधलेला होता, त्याच्या पायथ्याशीं एका विशिष्ट दिशेनें निघालें. त्यांना एके ठिकाणीं बोरीचीं तीन झाडें दिसलीं. तेव्हां तानाजी आपल्या जोडीदाराला म्हणाला, " अरे एसाजी, हींच तीं तीन झाडें, नव्हेत काय ? येथेच आपण जळकें लाकूड पाहिलें पाहिजे ! "

एसाजी म्हणाला, " होय. हींच तीं तीन झाडे असलीं पाहिजेत !" नंतर तो गडाच्या तटबंदीकडे वर पाहून आणि बोटाचा निर्देश करून म्हणाला, "तानाजी, त्या तेथूनच जळकें लाकूड मी फेकीन, असें भीमाबाई म्हणालेली होती, असें मला वाटते. "

तानाजी म्हणाला, " होय. येथें आपण जळके लाकूड शोधूं. "

असें म्हणून तानाजी आणि एसाजी हे दोघेजण जमीनीवर बारीक नजरेनें पाहूं लागले. तों त्या दोघाना एक जळकें लाकूड दिसलें. तें तानाजीनें जमीनीवरून उचलून घेतलें. मग त्याच्या धमाला आडकलेला एक पांढऱ्या रेशमाच्या दोऱ्याचा वीतभर तुकडा त्या धसापासून सोडवून तानाजी म्हणाला, " अरे एसाजी,त्या स्त्रियांनीं ठरावाप्रमाणें आपणाला ही इशारत दिली आहे. कार्तिक वद्य त्रयोदशी, गुरुवार, ह्या दिवशीं गडकरी आणि सेनापति हे दोघेजण पूर्वसंकल्पाप्रमाणें स्वारीवर निघणार; ह्या त्यांच्या बेतांत कांहीं बदल झालेला नाहीं, असें त्या दोघींनीं आपणाला सुचविलें आहे ! उत्तम, आपले बेत कायम ठरले ! चल, आपण हेंच लाकूड नेऊन शिवाजीला दाखवूं ! "

असें म्हणून तानाजी आणि एसाजी तें लाकूड घेऊन कासेगांवाकडे परत निघाले. भास्कराच्या घरीं येऊन पोचतांच त्यांनीं तें लाकूड शिवाजीला दाखविलें. तेव्हा शिवाजी आनंदानें म्हणाला, " येथपर्यंत भवानीच्या कृपेनें सर्व कांहीं ठीक चाललें आहे ! आपण मोहिमेचे जे बेत केले आहेत, त्यांत आपणाला कांहीं फेरबदल करण्याचें कारण नाहीं.

भवानीच्या:कृपेनें आपण दावूद आणि इलाहीबक्ष याच्या फौजाचा योग्य समाचार घेऊं आणि दातेगडावर मराठ्याचें निशाण उभारूं !"

---

## प्रकरण ४८ वें.

# कार्तिक वद्य त्रयोदशी.



कार्तिकवद्य त्रयोदशीला आठवड्याचा वार गुरुवार हा होता. ह्या दिवशीं सकाळपासून दातेगडावर गडबड सुरू झाली.

दावूदभाईनें दीड हजार शिपायी घेऊन गणवंतगडावर हल्ला करावा आणि इलाहीबक्ष ह्यानें दीड हजार शिपायी घेऊन प्रचितगडावर हल्ला करावा, असे ठरलेले होते. ह्या दोन्ही सैन्यानीं आपआपल्या सोयींप्रमाणें त्या त्या गडाकडे जावयाला निघावें, असें ठरलेलें होते.

इलाहीबक्ष ह्याला पंधरा सोळा मैलाची आणि दावूद याला फक्त पाच सहा मैलांची जमीन तुडवून जावयाची असल्याकारणानें,इलाहीबक्ष ह्याला दातेगडाहून अगोदर निघणें जरूर होतें. त्याची सर्व तयारी झाली, तेव्हां तो गडकरीसाहेबाचा निरोप घ्यावयाला आला आणि म्हणाला, "भाई-साहेब, माझी सर्व तयारी झाली ! माझे शिपायी शस्त्रास्त्रें घेऊन सिद्ध आहेत. हत्याराची वाण कोणालाही नाहीं. सर्वांच्या जवळ सर्व हत्यारें आहेत. विजापुरच्या बादशहाकडून यावयाचीं तीं हत्यारें जरी आलीं नाहींत, तरी त्यामुळें आपलें काहीं अडलें नाहीं. परंतु तीं हत्यारें अजून आलीं नाहींत, ही आश्चर्याची गोष्ट होय !"

दावूद म्हणाला, "होय. ही आश्चर्याची गोष्ट आहे, ह्यांत कांहीं शंका नाहीं ! पण त्या गाड्या न आल्याकारणानें आपलें कांहीं अडलें नाहीं. आपल्याजवळ भरपूर शस्त्रास्त्रें आणि भरपूर पैसा आहे ! आपली मोहीम संपल्यानंतर जरी त्या गाड्या आल्या, तरी हरकत नाहीं. आपण तीं हत्यारें आणि तो पैसा शिल्कीला टाकूं !"

इलाहीबक्ष म्हणाला, "मला प्रचितगडावर स्वारी करावयाची आहे. काल माझे हेर भिन्नभिन्न वाटानीं तेथपर्यंत जाऊन आलेले आहेत.

सगळ्या वाटा चांगल्या आहेत अशी त्यांनी वर्दी आणली आहे. माझें सैन्य तीन तुकड्यांनीं गोशतवाडी, मणेरी आणि वाझोली ह्या तीन गांवाजवळ कोयना नदी ओलांडील; आणि ह्या तीन तुकड्या रणघीव जवळ मिळतील. तेथून आम्ही जमावानें प्रचितगडावर हल्ला करावयाला निघूं."

दावूदनें विचारलें, "तुम्ही डुकरमुंड्या बरोबर घेतल्या आहेत काय?"

इलाहीबक्ष म्हणाला, "डुकरमुंड्याचें कांहीं काम नाहीं. प्रचितगडाच्या दक्षिणबाजूची तटबंदी ढासळली आहे, असें माझ्या हेरांनीं मला सांगितलें. त्याच भगदाडातून मी त्या गडात शिरेन!"

दावूद म्हणाला, " ठीक! पण माझा हमीदबाळ अझून परत आला नाहीं! ह्या गडाचें संरक्षण एकट्या तुमच्या भावावर पडेल."

इलाहीबक्ष म्हणाला. " हमीदबाळ असेल तेथे सुरक्षित असेल, ह्यांत शंका नाहीं.माझा भाऊ एकटा देखील ह्या गडाचें संरक्षण करूं शकेल!"

दावूद म्हणाला, " ठीक, तर मग तुम्ही आता निघा!"

तेव्हां इलाहीबक्ष दातेगडांतून आपल्या सैन्यासह बाहेर पडला.

तिसऱ्या प्रहराच्या सुमारास दावूदभाईनें खुदाबक्ष ह्याच्याकडे दातेगडाचें संरक्षण सोंपवून, आपल्या दीड हजार शिपायांसह तो दातेगडाच्या बाहेर पडला. तो तामकडा येथें कोयना नदी ओलांडून जाणार होता.

इलाहीबक्ष आणि दावूदभाई या दोघांच्याजवळ पांचपांचशे तीरंदाज होते, पांचपांचशे भालेवाले होते आणि पांचपांचशे शमशेरगीर होते. त्या काळच्या बंदुका ओबडधोबड आणि एका फर्लांगाहून कमी पल्ल्याच्या असल्याकारणानें आणि त्या तोड्यांनीं पेटवावयाच्या असल्याकारणानें, त्या काळच्या लोकांना तिरकामठेच सुडसुडीत म्हणून पसंत असत, आणि तीरांचा पल्ला त्याकाळच्या बंदुकीच्या गोळीइतका किंवा त्याहून थोडासा अधिक देखील असूं शके.

शिवाजीनें ह्या मोहिमीसाठीं सहाहजार शिपायी मागविलेले होते. भोपाळगड, केंजळगड, जंगलीजयगड, आणि भैरवगड येथले हजार-हजार शिपायी आणि प्रचितगडचे पांचशे आणि गणबंतगडचे पांचशे शिपायी, मिळून एकंदर पांचहजार आणि भरमानाकाचे हजार शिपायी

असे एकंदर सहा हजार शिपायी शिवाजीच्या म्हणजे स्वराज्याच्या बाजूनें लढावयाला सिद्ध होऊन आलेले होते !

शिवाजीनें आपल्या शिपायांची पुढीलप्रमाणें विभागणी केली:—

१५०० मावळे आणि ४०० बिंदुवेधी अंत्यज ह्यानीं एसाजी आणि हरनाक यांच्या नायकत्वाखाली दावूदभाईच्या सैन्याशीं लढावें.

१५०० मावळे आणि ४०० बिंदुवेधी अंत्यज ह्यानीं बाजी आणि पांडनाक ह्यांच्या नेतृत्वाखालीं इलाहीबक्ष याचेबरोबर लढावें. १००० मावळे यांनी तानाजी आणि बत्ताशा यांच्या नेतृत्वाखालीं चोरवाटेने दातेगडांत शिरावें. १००० मावळे आणि २०० बिंदुवेधी अंत्यज यांनीं शिवाजी आणि भरमानाक ह्यांच्या नेतृत्वाखाली पश्चिमाभिमुख दरवाज्यानें दातेगडांत शिरावे !

हिंदूसैन्यांच्या नायकानीं आपलीं माणसें पाठवून वाटाची पूर्ण माहिती आगाऊ आणविलेली होती. किती किती लोकांना कोणकोणच्या खड्डयांत, कोणकोणच्या टेकाडांमागें, कोणकोणच्या झाडींत लपून बसतां येईल आणि ह्या लोकांनीं शत्रूच्या सैन्यावर कोणकोणच्या ठिकाणांवरून आणि कोणकोणच्या शस्त्रास्त्रानीं हल्ला करावयाचा, हें आगाऊ ठरवून ठेवण्यांत आलेले होतें. एका टोळीचा निरोप दुसऱ्या टोळीकडे पोंचवावयाचीं कामेंही त्या त्या माणसांकडे नेमून टाकलीं होतीं !

तोच दिवस. प्रहरभर रात्र उलटून गेली आहे. जिकडेतिकडे निबिडतम अंधकार पसरला आहे. डोळ्यांत कोणी बोट घातलें असतें तरी तें दिसले नसतें. वाटेवरील रहदारी मुळींच नाहीं. अशा समयीं दावूदभाई आपले दीड हजार शिपायी घेऊन गणवंतगडाच्या रोखानें चालला होता ! वाटेवर जरी अंधकार होता, तरी वाटाड्यांच्या मार्गदर्शकत्वाखालीं हें सैन्य न चुकता चाललें होतें !

हे दावूदचे शिपायी एका एका रांगेत आठ आठ असे चालत असून त्यांच्या सुमारें दोनशें रांगा चालल्या होत्या. त्या काळीं सैन्य बहुतकरून घट्टसमूहाच्या मांडणीनें चालत असे. ह्या सर्व रांगांच्या पिछाडीला दावूदभाई घोड्यावर बसून चालला होता. त्याचे दुय्यम सेनापति

सैन्याच्या उजव्या बगलेने दहा आणि डाव्या बगलेनें दहा असे घोड्यावरून चालले होते.

या रीतीनें हे सैन्य चालले असता त्याना वाटेत कांहीं अडथळे आले नाहींत. सर्व शिपायाना गणवंतगड केव्हा येतो आणि तेथच्या हिंदूकाफिरांना कापून काढून आपण त्या गडाचा कबजा केव्हां घेतो, असें होऊन गेले होते !

गणवंतडापासून हें सैन्य सुमारें अर्धाकोसाच्या अंतरावर आलें तों त्यांच्या तोंडावर, छात्यांवर, आणि मांड्यावर समोरून अकस्मात् शरवृष्टि होऊं लागली ! परंतु ही शरवृष्टि केवळ समोरूनच होत, होती असे नव्हे. दावूद्च्या सैन्याच्या उजव्या आणि डाव्या बगला ह्यांचेवर सुद्धां ही शरवृष्टि होत होती ! एसाजी आणि हरनाक ह्याच्या एकोणीसशे तीरंदाजाच्या कामठ्यांवरून हे तीर सुटत होते !

हे तीर सूं सूं सूं असा ध्वनी करीत येत होते. मुसलमानी सैन्य घट्टरचनेनें चाललेले असल्याकारणानें प्रत्येक तीर कोणातरी शिपायाच्या अंगांत चारचार बोटें घुसत होता. ह्या तीराच्या पोलादी टोकांना आंतल्या बाजूला वळलेले काटे असल्याकारणानें ते तीर अंगांतून उपसून काढतांना मांसही बाहेर उपसलें जात होतं.

ह्या तीरांची वृष्टि सुरू झाली तेव्हां मुसलमान शिपायी गैरसावध होते, आणि ही वृष्टि एकदम आणि अचानक होऊं लागल्यामुळें मुसलमान शिपायाना आपले तीरकामठे सज्ज करावयाला आणि उलट प्रतिवृष्टि करावयाला अवसरच मिळाला नाहीं.

ज्यांच्या अंगांत मराठे शिपायांनीं सोडलेले तीर घुसत होते त्यांच्या तोंडांतून " या अल्ला ! " असा दुःखाचा आणि आश्चर्याचा उद्गार निघत होता. कांहीं शिपायी ह्या तीरांना बाहेर उपसून काढूं लागले. ह्या तीरांच्या कांट्यांनीं मांस ओरबाडले जाऊन बाहेर येत होते. त्या वेदनांनीं हे शिपायी ओरडत, आरडत किंचाळत होते. कांहीं शिपायी धबकदिशीं जमीनीवर आदळत होते. खालीं पडलेल्या शिपायांच्या अंगावर शेजारचे शिपायी पडत होते. खालचे शिपायी तुडविले जात

होते. मुसलमानी सैन्यांत गडबड, धांदल, कलकलाट, धडपडाट ह्यांचें साम्राज्य चालूं झाले! परंतु तीरांचा वर्षाव चाललेलाच होता!

घटका दोन घटकांच्या आंत मुसलमानी पंधराशें शिपायी, दावूद-भाई आणि त्याच्या हाताखालचे वीस दुय्यम अमलदार मराठ्यांच्या संतत शरवृष्टीनें गतप्राण होऊन पडले!

लवकरच तेथें सामसूम झाली. शिवाजीचे देशभक्त अनुयायी 'आम्ही परत जात आहों' अशी वर्दी गणवंतगडाच्या गडकऱ्याला देऊन आणि पुढचा कार्यक्रम त्याच्या कानावर घालून, दांतेगडाकडे परत जावयाला निघाले!

प्रचितगड जिंकून घ्यावयाला निघालेला इलाहीबक्ष याचा त्या गडा-पर्यंतचा बहुतेक प्रवास निर्विघ्नपणे पार पडला. त्याचें सैन्यही दीड हजार शिपायांचे असून ते शिपायी आठआठ शिपायांची एक एक रांग अशा दोनशें रांगांनीं आणि दाट रचनेनें चाललेलें होतें. दावूदचे जसे वाटाड्ये होते, तसेंच इलाहीबक्ष याचेही होते.

इलाहीबक्ष हा घोड्यावर बसून सैन्याच्या पिछाडीच्या देखरेखीवर होता. त्याचेही वीस अंमलदार त्याच्या सैन्याच्या दगलाबरोबर घोड्यां-वर बसून चालले होते!

हें सैन्य प्रचितगडावर हल्ला करावयाला उत्कंठित झालेलें होतें. हिंदू-काफिरांना आपण कापून काढूं, प्रचितगडावर आपण बादशहाचें निशाण उभारूं, विजय संपादन करून मोठा उत्सव करूं, वगैरे नानाप्रकारचे विचार करीत करीत आणि ठेक्यांत पावले टाकीत सर्व मुसलमान शिपायी चाललेले होते!

हें सैन्य अशा रीतीने मार्गक्रमण करीत करीत प्रचितगडापासून सुमारें एका कोशाच्या अंतरावरील एका विशिष्ट स्थळीं येऊन पोंचलें. तेथें ते येऊन पोंचतात तों एकदम 'फाड्, फाड्, फाड्' असे प्रचंड आवाज होऊन चाळीस ठिकाणीं दारूचे स्फोट झाले! पंधराशें मुसलमान शिपायी दारूच्या जोरानें आकाशात उडविले जाऊन होरपळून मेलेले असे पुन्हा जमीनीवर आदळले! दीड हजार मुसलमान शिपायी आणि त्यांचे अव्वल आणि दुय्यम सेनापति यांचा एका क्षणांत चक्काचूर उडाला!

मराठे देशभक्तांनीं ह्या विशिष्ट स्थानीं चाळीस दारूचे सुरुंग गुप्तपणें पुरून ठेविलेले होते! त्यांच्या वाती त्यांनीं जमीनींतूनच दूर नेऊन पोंचविलेल्या होत्या! ऐनवेळीं ह्या वातींना मराठे देशभक्तांनीं बत्ती लावून दिल्यावरून हे चाळीस ठिकाणीं स्फोट झाले होते! एकही सुरुंग वांझोटा झाला नाहीं!

येणेंप्रमाणें इलाहीबक्ष याच्या सैन्याचा विध्वंस झाला! एकाही देशभक्ताला तीरकामठा किंवा भाला किंवा तरवार ह्या शस्त्रास्त्रांचा उपयोग करण्याची जरूरी पडली नाहीं!

मुसलमानी सैन्याचा विध्वंस केल्यावर, बाजी आणि पांडनाक आणि त्यांचे दुय्यम अमलदार हे प्राचितगडाच्या गडकऱ्याला भेटून आणि त्याला पुढचा कार्यक्रम कळवून परत दातेगडाकडे यावयाला निघाले!

त्यांच्याबरोबर वाटाड्ये असल्याकारणानें त्याना अंधकारामुळें बिलकूल अडचण वाटली नाहीं.

---

## प्रकरण ४९ वें.

# दातेगडाचा कबजा.

मागिल दोन प्रकरणांत ज्या दिवसाची हकीगत आम्हीं निवेदिली, त्याच दिवशीं प्रहरभर रात्र चढली असतां ठिकठिकाणीं चार चार पांच-पांच इसमांचे गट एकत्र जमून गतगोष्टींसंबंधानें टीका करीत आहेत किंवा आगामी गोष्टींसंबंधानें तर्कवितर्क करीत आहेत, असें दिसत होतें.

कित्येक लोक दावूदच्या तुकडींत किंवा इलाहीबक्ष ह्याच्या तुकडींत आपणाला जाण्याची संधी मिळाली नाहीं म्हणून हळहळत होते. कित्येक लोक आपली दगदग चुकली आणि आपणांला आरामांत बसावयाला सांपडत आहे, म्हणून आनंद मानीत होते. कित्येक लोक उद्यां ह्या गडावर दावूद आणि इलाहीबक्ष हे विजयी होऊन परत येतील तेव्हां त्यांचें अमुकअमुक तऱ्हेनें अभिनंदन केलें जाईल, असें म्हणत होते.

अशा समयीं खुदाबक्ष,—ज्याच्या हवाली गड केलेला होता तो,—सर्व

जागीं योग्य बंदोबस्त आहे किंवा नाहीं, सर्व दरवाजे बंद केलेले आहेत किंवा नाहींत, वगैरे स्वतः पाहून येण्यासाठीं निघाला! त्यानें सर्व गडाला एक प्रदक्षिणा केली. नंतर तो तटबंदीवर गेला, आणि एक प्रदक्षिणा करून तो दक्षिणेच्या बाजूस जाऊन, अंधेरात कांहीं दिसलें तर पहावें म्हणून डोळे ताणून पाहू लागला. परंतु त्या दिशेकडे कांहीं दिसलें नाहीं किंवा कांहीं कलकलाटही ऐकूं आला नाहीं. नंतर तो प्रचितगडाच्या रोखानें पाहूं लागला. परंतु त्या दिशेनेंही त्याला कांहीं दिसलें नाहीं किंवा ऐकूं आलें नाहीं!

सर्व कांहीं यथास्थित आहे असें पाहून तो परत आपल्या घरीं आला आणि रात्रीच्या विश्रांतीसाठीं तो आडवा झाला. त्याला तत्काळ गाढ झोप लागली. दातेगडावरील इतर माणसें देखील आपआपल्या घरीं जाऊन निजलीं. मध्यरात्रीच्या सुमारास दातेगडावर निबिडतम शांतता आणि निबिडतम अंधकार ह्यांचे साम्राज्य स्थापित झालें!

अशा ह्या निबिडतम शांततेच्या समयीं हा कसला बरें ध्वनि कानावर येत आहे? तें कोणातरी प्राण्याचें ओरडणें होतें ह्यांत संशय नाहीं! कोणचा प्राणी ह्या समयीं ओरडत असेल बरें? हें गाढवाचें खिंकाळणें दिसतें, पण दातेगडावर तर एकही गाढव नव्हतें. मग हें गाढवाचें खिंकाळणें कोठलें?

हा रासभध्वनि क्रमाक्रमाने तीव्रतर होत चालला! कांहीं वेळानें एका गाढवाच्या मदतीला दुसरें गाढव आलें, आणि दोन गाढवें एकदम ओरडूं लागलीं आणि त्यांच्या खिंकाळ्या एकदम होऊं लागल्या! ही गाढवांची संख्या वाढतवाढत चालली आणि त्यांच्या खिंकाळ्या अधिकाधिक कर्कश होऊं लागल्या! त्यांच्यांत गायीम्हशींच्या हंबरण्याचें मिश्रण झालें! नंतर हे आवाज क्रमाक्रमानें कमीकमी तीव्र होऊं लागले, आणि त्यांच्याबद्दल त्याच-क्रमानें कावळ्यांचा कलकलाट सुरू होऊन तो क्रमाक्रमाने कर्कश होऊं लागला! नंतर हा कलकलाट क्रमाक्रमानें मंदमंद होत चालला, आणि त्याच्या जागीं उसाच्या चरकांचा आवाज त्याच क्रमानें वाढत चालला! पुढेंपुढें हा आवाज इतका मोठा झाला कीं, एकाद्या शेतांत जणों काय उसाचीं पन्नास गुऱ्हाळे एकदम चालत आहेत!

इतका प्रकार होत आहे तों, गडांतील कांही लोक जागे होऊन कानोसा घेऊं लागले ! कित्येक लोक हे ध्वनि ज्या दिशेकडून येत होते त्या दिशेकडे जाऊं लागले ! पण ती दिशा कोणची होती ? गडाच्या नैर्ऋत्य दिशेकडून हे ध्वनि येत होते !

हे ध्वनि सैतानहांड्यातून निघत होते ! परंतु जे कोणी लोक कानोसा घ्यावयासाठीं ह्या नैर्ऋत्य कोपऱ्याकडे गेले, त्याना त्या कोपऱ्यांत कसलेसे जाळ दिसले ! ह्या जाळांतून त्याना कांहीं मुंडकीं दिसूं लागलीं !

हा प्रकार दृष्टीस पडतांच हे लोक तडक तेथून पळत सुटले ! 'सैतान आला ! सैतानाचे शिपायी आले ! या आल्ला !' असे उद्गार काढून ते पळत सुटले !

गडावरील सर्व लोक जागे होऊन 'सैतान आला, सैतान आला' म्हणून ओरडतआरडत पळत सुटले ! सैतानहाड्यातून एकामागून एक भुतें बाहेर पडत होतीं आणि नाचत होतीं ! गडांतील सर्व लोक मोठ्या दरवाज्याच्या रोखानें पळत सुटले ! सैतानहाड्यातून भुतें नाचत नाचत येत आहेत, ही बातमी गडावर सर्व ठिकाणीं पसरली ! सर्व लोक गडाच्या दरवाज्याकडे पळत सुटले ! दरवाज्याच्या कड्या घाईघाईने काढून ते एकसारखे पळत सुटले ! !

ह्या दिवशीं ह्या वेळीं गडावर दोनशे शिपायी आणि चारपाचशें धंदेवाले आणि कारागीर लोक काय ते होते ! तसेंच काही अगदीं हलके नोकरचाकर होते. सर्व लोक हजाराच्या आंत होते, आणि ते सर्व धूम पळत सुटले ! सर्व लोक गडाच्या दरवाज्याकडे पळत सुटले ! बुऱ्हाणअल्ली–विजापुरचा जासूद–ह्याचा प्रकार नुकताच झालेला असल्याकारणाने, तो सर्वांच्या स्मरणांत होता ! सैतानहांड्यांतून भुतें निघत आहेत, म्हणून सर्वांना भीति वाटून सर्व लोक तकटधूम पळत सुटले !!

दरवाज्यांतून बाहेर पडतांना तेथें अतोनात गर्दी झाली ! आपण दरवाज्यांतून अगोदर बाहेर पडावें, ह्या उद्देशानें मागचे लोक पुढच्या लोकांना पुढें रेटीत होते, त्यामुळें पुढचे लोक जमीनीवर पालथे पडत होते, त्यांच्या अंगावरून मागचे लोक चालत होते, त्यांना जमीनीवर पडलेल्या लोकांच्या शरीरामुळें वाटेमध्यें अडथळे होत होते, त्यामुळें त्या गर्दीत

रेटारेटी, खेचाखेची, ओढाताण ह्याचा परमावधि होऊन गेला! गडांतून बाहेर पडूं इच्छिणारे लोक हजारांहून अधिक नव्हते. त्यांपैकी निम्याहून अधिक लोक चेंगरले जाऊन आणि तुडविले जाऊन मरण पावले! दोनतीनशें लोक मात्र दरवाज्यातून बाहेर पडून वाटेला लागले! परंतु ते लोकही सैतानाच्या भीतीमुळे खरी वाट धरावयाला असमर्थ होते! ही वाट टेकडीला दीड प्रदक्षिणा घालणारी होती, ती ऐसपैस होती आणि फारशी उतरणीची नव्हती, हें खरें आहे. तथापि तिच्या एका बाजूस खोल कडा असल्याकारणाने वरून पळत येणारे लोक मनाच्या गोंधळलेल्या स्थितीमुळें सरळ पळत जात, ते ह्या कड्यावरून कोसळत होते आणि खालीं खडकावर आदळून त्यांच्या शरीरांचा चेदामेंदा होत होता!

अशा रीतीनें माणसे मरता मरता टेकडीच्या तळाशीं पन्नास माणसें देखील येऊं शकलीं नाहींत! हीं जिवंत राहिलेलीं माणसें अर्धमेलीं होऊन जमीनीवर पडलीं!!

ह्यावेळीं खुद्द गडावर काय स्थिति होती? आपले पुरुष घराच्या बाहेर पडले ते अद्याप परत आले नाहींत, म्हणून त्यांच्या शोधासाठीं त्यांच्या स्त्रिया घराच्या बाहेर पडल्या! त्यांच्या कानीं सैतानहाड्यातून येणारे ध्वनि पडत होते, त्यांमुळें त्याचीही घाबरगुंडी वळत होती! त्याही जनसंमर्दाच्या प्रवाहात आडकून पुढें लोटल्या जात होत्या! स्त्रियांपैकीं सगळ्याच्या सगळ्या गर्दीमध्यें तुडविल्या जाऊन मरण पावल्या! एकही स्त्री टेकडीच्या पायथ्यापर्यंत जिवंत पोचूं शकली नाहीं!

खुदाबक्ष आपल्या स्त्रीच्या आणि भावजयीच्या अगोदर घरांतून बाहेर पडला होता. त्यानें लोकांना थांबविण्याचा यत्न केला, पण भीतीनें हाय खाल्लेल्या त्या जनसंमर्दात तोही बिचारा तुडविला जाऊन केव्हांच गतप्राण झाला!

गडावर आतां एकही स्त्री किंवा एकही पुरुष राहिला नव्हता. हो, पण चुकलों! दोन मुक्या आणि बहिऱ्या स्त्रिया मात्र सेनापतीच्या घरांत सुरक्षितपणें बसल्या होत्या! आज काय प्रकार व्हावयाचा होता हें सामान्यतः त्यांना आगाऊ कळलेलें असल्यामुळें त्या निर्धास्त बसल्या होत्या! सैतानहांड्यांतून येणारे आवाज काढणारे ते लोक भुतेंखेतें नसून

शिवाजीचे शूर मावळेच असले पाहिजेत, ते कोणच्या तरी रीतीनें गडांत प्रवेशले असतील, अशी त्यांनीं सहज कल्पना केली !

ह्या दोन मुक्या आणि बहिऱ्या स्त्रियांशिवाय जे लोक गडावर होते, ते तुरुंगांतील कैदी होते. पण ह्या काठिण प्रसंगीं त्यांची काळजी कोण वाहणार ?

असो. चोरवाटेने सैतानहांड्यातून तानाजी आणि बत्ताशा यांच्या नेतृत्वाखालीं बाहेर पडलेले एक हजार मावळे त्या गडांत वावरूं लागले ! आपल्या दोन मुक्या आणि बहिऱ्या स्त्रिया, भीमाबाई आणि मुक्ताबाई, ह्या त्यांना जाऊन मिळाल्या. मुक्ताबाई ही तानाजीची मार्गदर्शक झाली व भीमाबाई ही बत्ताशाची मार्गदर्शक झाली !

देशभक्त पांचशें मावळे तानाजीच्या नेतृत्वाखालीं गडाच्या एका कडेनें निघाले, आणि पांचशे मावळे बत्ताशाच्या नेतृत्वाखालीं गडाच्या दुसऱ्या कडेनें निघाले ! त्यांनीं प्रत्येक घराच्या आणि झोपडीच्या प्रत्येक खोलींत प्रवेश करून कोणी माणूस दडून बसला आहे कीं काय, हें पाहिलें ! त्यांना कोणीही माणूस कोठेंही दृष्टीस पडलें नाहीं !

इतकें केल्यावर ह्या मावळ्यांनीं तुरुंगाचे दरवाजे खोलले. त्यांतून सुमारें पन्नास हिंदूपुरुष बाहेर पडले ! त्यांना वस्तुस्थिति कळल्याबरोबर त्यांनीं तानाजी आणि बत्ताशा ह्यांचे उपकार मानले, आणि शिवाजीचें अभीष्ट चिंतिलें ! हे सर्व लोक मुसलमानी न्यायाच्या सैतानी सरणीला विनाकारण बळी पडलेले होते !

गडावर इतके प्रकार होत आहेत, तों पहाट होऊं लागली. आकाशांत चंद्रोदय होऊन चंद्रप्रकाशानें डोळस लोकांच्या डोळ्यांची सार्थकता होऊं लागली.

आपल्याबरोबरचे बहुतेक मावळे गडावर जागोजाग बसवून ठेवून तानाजी आणि बत्ताशा हे पन्नास पन्नास मावळे बरोबर घेऊन गडाच्या दरवाज्यांतून बाहेर पडून शिवाजीला सामोरे गेले ! पूर्वी ठरवून ठेवलेल्या कार्यक्रमाप्रमाणें, चंद्रोदय होतांच शिवाजी भरमानाकासहवर्तमान महादरवाज्यानें गडांत शिरावयासाठीं टेकडी चढूं लागला होता ! शिवाजीच्या बरोबर भास्करही चालला होता.

शिवाजी महादरवाज्यापाशीं जाऊन पोंचतो आहे, तोंच एसाजी आणि हरनाक, जे दावूदभाईशीं लढवयाला गेले होते, ते येऊन त्याला मिळाले! त्याचप्रमाणें बाजी आणि पांडनाक,–जे इलाहीबक्ष याच्याशीं लढावयाला गेले होते,–तेही तेथेच येऊन त्याला मिळाले! ह्या सर्व विजयी वीरांचें अभिनंदन करावयाला त्या दरवाज्यापाशीं तानाजी आणि बत्ताशा हे वीर उभे होते!

शिवाजी दरवाज्याशी आला, तेव्हा तानाजीनें मंदस्मितानें त्याचें अभिनंदन आणि स्वागत केलें! बत्ताशाने जोराजोराचे हातवारे करून आणि विचित्र पण सार्थ खुणा करून शिवाजीचें स्वागत आणि अभिनंदन केले!

शिवाजीनें आश्चर्याच्या मुद्रेने बत्ताशाला विचारलें, " हे काय वेडे वेडे चार चालविले आहेस, बत्ताशा ? "

तेव्हा आवाज मुद्दाम अशक्त आणि घोगरा करून बत्ताशा म्हणाला, " आबा, मी गडातल्या लोकाना भेडसावण्यासाठीं डुकरांचे, घोड्यांचे, बकऱ्यांचे, गाढवांचे, कावळ्याचे, गायींचे, आणि म्हशीचे आवाज काढून काढून फार दमून गेलों आहे, माझ्या घशाचे स्नायु ओरडूनओरडून सुजून करंगळीसारखे लठ्ठ झाले आहेत आणि माझ्या मुखातून शब्दोच्चार प्रयासानें होतो आहे! "

हें बत्ताशाचे भाषण ऐकून शिवाजी हंसला आणि तेथे असलेले इतर लोकही हंसले! मग शिवाजी बत्ताशाला म्हणाला, " बत्ताशा, तुझा घसा बसला आहे, म्हणून तुला तूं मागशील तितकें कढत दूध, हळद आणि खडीसाखर घालून देईन! मग तर तुझा घसा साफ होईल ना ? "

बत्ताशा नेहेमींच्या स्वरानें म्हणाला, " होय आबा, ताबडतोब होईल!"

हे सर्व वीर गडात प्रवेशतात, तों अरुणोदय होत चालला होता! [illegible] रात्र संपून चतुर्दशी आली आहे, असें हा अरुणोदय सर्वांना सांगत होता! मग हे सर्व वीर गडांतील पटांगणांत कांहीं वेळ विश्रांतीसाठीं बसून त्यांनीं आपआपल्या कामगिऱ्या कशा शेवटाला गेल्या, ह्या संबंधाच्या हकीगती एकमेकांना कळविल्या! मग ते सर्व वीरगडी गडाच्या सर्व भागांत हिंडून यावयाला निघाले. गड फारच मजबूत आहे,

आपण योजल्या त्या युक्तीशिवाय गड कधींच मिळवितां आला नसता, अशी सर्वांची खात्री झाली!

नंतर पुन्हा विश्रांतीसाठीं हे वीरपुरुष एके ठिकाणीं बसले. तेथें शिवाजीनें आपल्या सर्व सहायकाना शाबासकी दिली. मुक्ताबाई आणि भीमाबाई यांची त्यानें फार तारीफ केली आणि म्हटलें, " माझ्या प्रिय-भगिनींनो, तुम्ही दोघानीं देशकार्यांत मला मदत केली, ती खरोखर अतिशय धाडसाची आणि अत्यंत प्रशंसनीय आहे. तुम्ही दोघींनीं मुक्या व बहिऱ्या स्त्रियांचीं कामें अत्यंत कुशलतेनें केलीं; तुम्ही आपल्या मनावर विलक्षण नियंत्रणा घालून मनोविकार मुखावर प्रगट होऊं दिले नाहींत, आणि जें जे तुमच्या कानीं पडे तें तें स्मरणांत धरून ठेविलें व त्याचा योग्य उपयोग केला, ही गोष्ट खरोखर श्रेयस्कर होय. दावूदभाई गडकऱ्याचे बेत आम्हाला तुमच्या योगानें कळले, म्हणूनच हा दातेगड आम्हा मराठ्यांना इतक्या सुलभरीतीनें जिंकून घेतां आला, असें मी समजतों!"

त्यावर मुक्ताबाई म्हणाली, " आबा, आम्ही जें केलें त्यांत आपणां-सर्वांचें हित आहे. तुला मदत करण्याचे कामीं आम्ही प्राणांचीही परवा केली नसती! पण हल्लीं आम्ही प्राण न गमावतां हा दातेगड हिंदूंच्या ताब्यांत आलेला पाहात आहों! यापेक्षा अधिक भाग्य कोणतें असणार!"

भीमाबाई म्हणाली, " आमची कामगिरी यशस्वी रीतीनें पार पडली याबद्दल तुला आनंद होत आहे, तसा आम्हालाही आनंद होत आहे! देशासाठीं ही कामगिरी केल्यानें माझ्या मागल्या पातकाचें थोडें तरी क्षालन झालें असें मी समजतें!"

याप्रमाणें संभाषणें झाल्यानंतर सर्व लोक पुढच्या उद्योगाला लागले.

---

## प्रकरण ५० वें.

# मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा.



आज मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा. आज आठवड्याचा वार आदित्य-वार! आजचा दिवस पद्मिनीच्या आयुष्यांस महत्त्वाचा दिवस होता!

कारण आज ग्यानबा वाळुंज हा सर्जेरावापाशीं पन्नास हजार रुपयाची रक्कम किंवा पद्मिनी ह्या दोहोंपैकीं एक वस्तु मागावयाला यावयाचा, असें ठरलेलें होतें ! तुम्ही मला आपला जांवई करून घेतला नाहीं, तर मी तुम्हाला आणि तुमच्या मुलीला ह्या घरातून हाकलून काढून, तुमच्या हातीं करवंटी देऊन, तुम्हाला ह्याच तुमच्या गावांत भीक मागावयाला लावीन, अशी धमकी ग्यानबानें सर्जेरावांना दिली होती !

ही धमकी पद्मिनीला ठाऊक होती. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा ह्या दिवसासंबंधानें तिला जी इतके दिवस भीति वाटत होती, आणि जी भीति क्रमाक्रमानें वृद्धिंगत होत गेली होती, तिचा आज परमावधि झाला होता ! हा आजचा दिवस उजाडल्यापासून तिला फारच तीव्र अस्वस्थता वाटूं लागली होती. तिनें प्रातःकाळचीं सर्व कृत्यें नित्याप्रमाणे केलीं. परंतु तिचें मन स्वस्थ नव्हते. तिच्या मनांत अनेक विचार चाललेले होते. भास्करानें तिला आश्वासन दिले होतें. तुला आणि तुझ्या बापाला मी ग्यानबाच्या कचाटींतून खास्रीनें सोडवीन, असें भास्करानें तिला सांगितलेलें होतें. परंतु तो कोणच्या रीतीनें सोडविणार, याची तिला मुळींच कल्पना नव्हती. तो पन्नास हजार रुपये ग्यानबाला देऊन ही सुटका करणार आहे काय ? भास्कराजवळ इतका पैसा एकदम कोठून आला असेल ? त्याच्या मित्रांनीं ही एव्हढी मोठी रक्कम त्याला दिली असेल काय ? ही रक्कम त्यानीं देणगी म्हणून दिली असेल किंवा उसनी म्हणून दिली असेल ? उसनी म्हणून दिली असल्यास भास्कर त्या रकमेची फेड कशी करूं शकेल ? पन्नासहजार रुपायांची रक्कम न देतां दुसऱ्या काहीं प्रकारानें भास्कर आपणाला सोडविणार आहे काय ? भास्करानें आपल्या सुटकेसंबंधानें जी काही तजवीज योजलेली असेल, ती फसेल किंवा फलद्रूप होईल ?

हे आणि अशाचसारखे इतर प्रश्न पद्मिनीच्या मनात उद्भवून तिचें चित्त अस्वस्थ करीत होते !

नित्याच्या नियमाप्रमाणें पद्मिनी बागेतील झाडांना पाणी द्यावयाला गेली, परंतु तिचें लक्ष्य कामाकडे नव्हतें. तिच्या मनांत वर सांगितल्याप्रमाणें विचार घोळत होते ! ह्या विचारांचा परिणाम तिच्या सुंदर मुखावर

दृग्गोचर होत होता ! तिची मुद्रा मनाची अस्वस्थता दाखविणारी होती ! भास्करानें तिला दिलेल्या आश्वासनाच्या योगानें तिच्या मुखावर मधूनमधून आशेचे किरण झळकत होते ! परंतु एकंदरींत तिची मुद्रा दुःखी आणि खिन्न अशी दिसत होती ! तिचें झाडांना पाणी घालण्याचें काम यंत्राप्रमाणें चाललें होतें !

ह्याच दिवशीं, ह्याच वेळीं, अन्यत्र जो वृत्तांत घडत होता तो वाचकाना येथें सांगितला पाहिजे !

शिवाजीचीं दातेगडावरील सध्यापुरतीं कामे समाप्त झालीं असल्याकारणानें, तो भास्कराच्या कामासाठीं सूर्योदयाबरोबर गडावरून उतरून कारेगावीं भास्कराच्या घरीं येऊन दाखल झाला. त्याच्याबरोबर भास्कर, तानाजी, एसाजी, बाजी, बत्ताशा आणि त्याचे कांहीं दुसरे दोस्त असून, शिवाय भास्कराचा मामा कोंडीबा हाही होता.

शिवाजी हा भास्कराला पित्याप्रमाणें पूज्य आणि मित्राप्रमाणें भरवंशाला पात्र वाटत असे. शिवाय भास्करावर शिवाजीचाही विशेष लोभ असे. या कारणांमुळे भास्कर शिवाजीशीं नेहेमी मोकळ्या मनानें बोलावयाला कचरत नसे.

घरांत आल्यावर संधी साधून भास्करानें शिवाजीला एका बाजूस नेऊन आपल्या मनांतील विचार सांगितले.

सर्जेराव पन्नास हजार रुपायाचें कर्ज ग्यानबा वाळुंज ह्याचें देणें लागतात, इतकी मोठी रक्कम सर्जेरावांपाशीं नाहीं, म्हणून पद्मिनीसारखें स्त्रीरत्न ग्यानबासारख्या नीच, अनीतिमान्, क्रूर, दुष्ट, आणि हीनकुळाच्या म्हाताऱ्याशीं जखडले जाणार, पण हे आपणाला पाहवणार नाहीं, हें भास्करानें शिवाजीला सांगितलें. नंतर पद्मिनीचें शौर्य, धैर्य, पावित्र्य वगैरे गुण शिवाजीला सांगून, तिला ग्यानबाच्या कचाटींतून सोडवावयासाठीं मी माझ्या संपत्तींतून पन्नास हजार रुपये सर्जेरावाना द्यावयाला तयार आहे, असें भास्करानें शिवाजीला सांगितलें. पद्मिनीचें प्रेम मजवर आहे, पद्मिनी मलाही आवडते, तिच्या संगतीनें माझें आयुष्य सुखांत जाईल अशी माझी खात्री आहे, असेंही भास्करानें शिवाजीला सांगितलें ! हें सर्व सांगून झाल्यावर

भास्कर म्हणाला, " आबा, माझा विचार तुला मान्य आहे ना ? हा माझा विचार तुला मान्य असल्यास तूं माझे मामा कोंडीबा ह्यांची ह्या कामीं संमति मिळविशील काय ? माझ्या मामांना माझे विचार मी स्वतः सांगावे म्हणशील, तर मला लाज वाटते. तूं हें काम पथकरशील काय ? "

शिवाजी म्हणाला, " भास्कर, मी तुला पुष्कळ दिवसापासून ओळखतो आहे. तूं जो विचार मनात आणशील तो कधींही वावगा असणार नाहीं अशी माझी खात्री आहे. पद्मिनी तुला आवडते, त्या-अर्थी ती नीतिमान आणि योग्य असलीच पाहिजे. तुला तुझ्या प्रपिता-महाकडून जें द्रव्य मिळाले आहे, त्याचा कांहीं अंश पद्मिनीची सुटका करण्याकडे खर्च करावयाला तूं पूर्णपणे हक्कदार आहेस. आणि तो तूं खर्च करावा, असें माझेंही मत आहे. तुझ्या विचारात मला वावगें असें कांहीं वाटत नाहीं. तुझे वय आतां एकोणीस वीस वर्षांचे आहे, आणि तुला आयुष्यात जोडीदार स्त्री असली पाहिजे असे वाटणें साहजिक आहे! तूं आता लग्नाला योग्य झाला आहेस! तूं जी मुलगी पसंत केली आहेस ती तुझ्या मामानाही पसंत पडेल. मी कोंडीबापाशी ही गोष्ट काढतो! मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा आजच आहे. आजच ग्यानबाला पन्नास हजार रुपये किंवा पद्मिनी सर्जेरावांनी द्यावयाची, असें ठरलेलें आहे ना ? "

भास्कर म्हणाला, " होय. "

शिवाजी म्हणाला, "तर मग आताच त्या उद्योगाला लागले पाहिजे! आता मी सांगतों तसें कर.तुझ्या मामाना मजकडे पाठवून दे. आम्ही दोघे ह्या गोष्टीचा विचार करूं आणि ती कशी शेवटास न्यावयाची तें ठरवू! पन्नास हजार रुपयांचे देणें जें ग्यानबानें सर्जेरावांवर काढले आहे, ते तपासून घेऊन कर्जाचा आंकडा नक्की किती तो ठरविला पाहिजे. यासाठीं तूं कोंडिबांना मजकडे पाठवून दे आणि नंतर लागलाच तूं सर्जेरावाच्या घरीं जाऊन त्यांना इकडे पाठवून दे ! त्यांच्या घरीं गेल्यावर तूं आपल्या पद्मिनीला पुढच्या गोष्टीचें सूतोवाच करून ठेव. जा. "

शिवाजीच्या सांगण्याप्रमाणें भास्करानें आपल्या मामाना शिवाजी-कडे पाठवून दिलें. मग तो शिवाजीचा निरोप सर्जेरावांना सांगण्यासाठीं

त्यांच्या घराकडे गेला. तेथे प्रथम सर्जेरावांना शिवाजीचा निरोप सांगून त्यानें त्यांना रवाना करून दिलें! मग तो पद्मिनीची गांठ घ्यावयासाठीं बागेमध्यें शिरला! ह्या वेळीं ती झाडांना पाणी घालण्याचें काम करीत होती, हें वर सांगितलेंच आहे!

पद्मिनीला पाहातांच भास्कर तिला म्हणाला, "पद्मिनी. मी तुला भेटून गेल्याला चार पाचच दिवस झाले असतील; पण ते दिवस मला तितक्या वर्षांइतके लांबलचक वाटले!"

पद्मिनी म्हणाली, "मलाही तुमच्या भेटीला किती तरी वर्षे झालीं असें वाटत होतें! तुम्ही मला केव्हां भेटतां असें मला होऊन गेलें होतें! तुम्ही सुखरूप येऊन मला भेटत आहां म्हणून मला आनंद होत आहे. तो मला शब्दांनीं व्यक्त करून दाखवितां येत नाहीं! पण भास्करराव, आज मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा! ह्या दिवसाचें महत्त्व काय आहे, हें तुम्हाला ठाऊक आहे ना?"

भास्कर म्हणाला, "आलबत आहे! म्हणूनच मी आज कासेगावाला आलों आहे, आणि तुझ्या बाबांना शिवाजीकडे पाठवून दिलें आहे!"

पद्मिनीनें विचारलें, "कशासाठीं?"

तेव्हां भास्कर म्हणाला, "तुझ्या बाबांनीं ग्यानबाचें देणें खरोखरी किती लागतें हें कसें ठरवावयाचें ह्याचा विचार करण्यासाठीं आणि दुसऱ्या कांहीं गोष्टी ठरविण्यासाठीं शिवाजीला सर्जेरावाच्या भेटीची जरूरी आहे. म्हणून मी सर्जेरावांना माझ्या घराकडे पाठवून दिलें, आणि नंतर मी तुझ्याकडे आलों!"

पद्मिनी म्हणाली, "आतां पुढें काय? सगळ्या गोष्टींचा निकाल लागावयाला वेळ किती लागेल?"

भास्कर म्हणाला, "सगळ्या गोष्टी आजच्या आज पार पडतील. कशा त्या सांगतों, ऐक. शिवाजी आणि माझे मामा सर्जेरावापाशीं सर्व गोष्टींची प्रथम वाटाघाट करतील. मग ते ग्यानबाचे हिशेब केव्हां आणि कोठें आणि कसे तपासून घ्यावयाचे, तें ठरवितील. नंतर कांहीं तडजोडीला ग्यानबा कबूल आहे कीं नाहीं, हें पाहातील. नंतर जितकी रक्कम ग्यानबाला द्यावयाची म्हणून निघेल, तितकी रक्कम माझे

मामा तेथल्या तेथेच ग्यानबाला देऊन टाकून सर्व कागद विध्वंस करावयासाठीं सर्जेरावांच्या हवालीं करतील! ग्यानबाच्या कचाटींतून तुझे बाबा सुटले म्हणजे तूंही बाबांच्या कचाटींतून सुटशील! मग तूं अमक्याची बायको हो अशी ते तुझ्यावर सख्ती करणार नाहींत, आणि मग तूं माझी सहधर्मचारिणी होऊं शकशील! जी रक्कम मामा सर्जेरावाना ग्यानबाची भरपाई करण्यासाठीं देतील! तिला देज असें नाव देण्यांत येईल!"

पद्मिनीला हे भास्कराचे स्पष्टीकरण ऐकून किती आनंद झाला असेल, ह्याची वाचकानींच कल्पना करावी! ती आनंदाश्रु ढाळीत म्हणाली, "भास्करराव, हा आनंदाचा दिवस मला पहावयाला मिळेल असें कांहीं दिवसांमागे माझ्या स्वप्नीही नव्हते! तुमची माझी गाठ पडेल, आपले एकमेकावर प्रेम जडेल, मी ग्यानबाच्या कचाटींतून सुटेन, माझे बाबा सुखी होतील, मीही सुखी होईन, ह्या गोष्टींचे मला स्वप्नही नव्हते! परंतु ह्या सर्व गोष्टी आज शक्यकोटींत येत आहेत, हे माझे भाग्य होय असे मी समजते! पण भास्करराव, मी तुम्हाला खरोखरीच आवडतें ना? माझ्या सहवासांत तुम्हीं सुखी व्हाल ना?"

तेव्हा भास्कर म्हणाला, "पद्मिनी, तूं मला आपल्या अनेक गुणांनीं प्रिय झाली आहेस. तूं अगदीं प्रथम माझ्या दृष्टीस पडलीस तेव्हांच माझे प्रेम तुजवर जडले! नंतर माझ्या सुतकाच्या दिवसांत तूं माझ्याकडे येत होतीस, तेव्हा तुझ्या पवित्र मनाची मला साक्ष पटली आणि तुझा सहवास मला नित्य घडावा असें वाटूं लागलें! तूं माझी पत्नी झालीस तरच असा सहवास घडूं शकेल, असा विचार माझ्या मनात आला. तूं मला पति म्हणून स्वीकार करावयाला कबूल आहेस ना?"

पद्मिनी आनंदानें म्हणाली, "तुम्ही मोठी रकम बाबांला देऊन ग्यानबाच्या तावडींतून त्याना सोडविण्याचें औदार्य दाखवीत आहा ह्याबद्दलच्या कृतज्ञतेनें प्रेरित होऊन, आणि तुम्ही शौर्य, पावित्र्य, सारल्य वगैरे अनेक गुणामुळें मला आवडता, म्हणून मी तुमची पत्नी व्हावयाला कबूल आहें! तुमच्या पायांची सेवा केल्यानेंच माझ्या जन्माचें साफल्य होईल असें मला वाटतें!"

भास्कर म्हणाला, "पद्मिनी, हे तुझे शब्द मला किती गोड वाटत

आहेत, हें मला सांगतां येत नाहीं ! आपल्या दोघांच्या लग्नाला शिवाजीची आणि माझ्या मामांची संमति आहे ! सर्व गोष्टी सुरळीतपणें घडून येतील. बरें, पद्मिनी, मी आता तुझा निरोप घेतों. येऊं ? "

पद्मिनी म्हणाली, " या !"

---

## प्रकरण ५१ वें.

# ग्यानबा आणि सर्जेराव.



मागील प्रकरणात सांगितलेली हकीगत घडली त्यानंतर सुमारें अर्ध्या किंवा पाऊण घटकेनंतर आपण सर्जेराव निंबाळकर यांच्या घरांत माडीवर जाऊं आणि तेथें घडत असलेल्या वृत्तान्तावर नजर टाकूं.

ह्या माडींत आंथरलेल्या सतरंजीवर भिंतीशीं ठेवलेल्या एका लोडाशीं सर्जेराव बसलेले होते, आणि त्यांच्या शेजारीं असलेल्या दुसऱ्या एका लोडाशी दुसरा एक गृहस्थ बसलेला होता. हा गृहस्थ आमच्या वाचकांनीं केवळ ऐकिलेला आहे, पाहिलेला नाहीं, म्हणून त्याचें येथें थोडेंसें वर्णन करणें जरूर आहे.

हा गृहस्थ वयानें सुमारें बावन्न वर्षांचा असून वर्णानें बराच काळा होता. तो अंगानें जाडसर आणि थिलथिलित होता. त्याचें कपाळ उंच असून बुद्धिमत्तेचें व्यंजक होतें. त्याचे डोळे बारीक असून त्यांतील बुबुळें हिरव्या रंगाचीं होतीं. ह्यावरून त्याची मार्जार जातीशीं समगुणता असावी असा प्रेक्षकांचा तर्क होणें साहजिक होतें. त्याच्या तोंडाची जिवणी आकर्ण असून दोन्ही ओठ काळे आणि जाडसर होते.

ज्या समयीं आपण ह्या गृहस्थाला पाहात आहों, त्या समयीं त्याच्या डोक्यावर जरीकांठीं रेशमी मंदील मोठ्या अक्कडबाजरीतीनें बांधलेला होता. त्याच्या अंगांत पांढरा सफेत अंगरखा असून त्याच्या बाह्यांना कोपरापासून मनगटापर्यंत चीण भरलेला होता. त्याच्या पायांत जी विजार होती ती गुडघ्यापर्यंत सईलसर असून खालीं घोट्यापर्यंत चीण भरलेली होती.

ह्या गृहस्थाच्या कानांत बोराएवढ्या मोत्यांची भारी किंमतीची भिकबाळी होती, मनगटांत पोची आणि सलकडीं होतीं, आणि त्याच्या दोन्ही हाताच्या दहा बोटांत सात आठ आंगठ्या होत्या !

हा गृहस्थ जरी श्रीमंती थाटानें आणि अक्कडबाजरीतीनें पोशाखलेला होता, तरी त्याच्यासंबंधानें प्रेक्षकाच्या मनांत फारसा अनुकूल ग्रह उत्पन्न होण्याजोगा नव्हता.

ग्यानबा वाळुंज म्हणून जो गृहस्थ पद्मिनीचें पतित्व आपणाला मिळावें म्हणून इच्छीत होता तो हाच ! त्याच्यापुढें एक भले मोठें दफतर ठेवलेलें होतें. सर्जेराव निंबाळकर यांच्याशीं ग्यानबाचे जे पैशाआडक्याचे आणि गहाणापहाणाचे व्यवहार झालेले होते, त्याच्यासंबंधाचे कागद ह्या दफतरांत काळजीपूर्वक ठेविलेले होते.

ग्यानबा म्हणाला, " सर्जेराव, आज मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेचा दिवस आहे ! ह्या दिवसाचें महत्त्व काय आहे ह्याचें स्मरण तुम्हाला आहेच. आज तुम्हीं मला पन्नास हजार रुपये द्यावें आणि त्या दफतरांतील सर्व कागद मीं तुमच्या हवालीं करावे व तुम्ही त्यांचा विध्वंस करावा हा एक पक्ष. दुसरा पक्ष तुम्ही मला आपला जांवई करून घ्यावें आणि तुम्हीं ह्या कागदांचा विध्वंस करावा हा होय. आज वीस वर्षे तुमच्याशीं सावकार ह्या नात्यानें माझे शेकडो व्यवहार झालेले आहेत, त्यांपैकीं एकाही व्यवहारांत तिरकसपणा झालेला नाहीं. आतां हा आपला शेवटचा व्यवहारसुद्धां शांतपणानें व्हावा, अशी माझी इच्छा आहे. तुमच्याशीं पूर्वीप्रमाणें माझा गोड संबंध राहावा अशी माझी मनापासून इच्छा आहे. तुम्ही मला पन्नास हजार रुपये दिले तर हा आपला संबंध गोड स्वरूपाचा राहील किंवा तुमची मुलगी पद्मिनी मला बायको म्हणून तुम्हीं दिली तरी आपला संबंध गोड स्वरूपाचा राहील ! कोणताही पक्ष तुम्हीं स्वीकारला, तरी ह्या कासेगांवांत तुमचा जो लौकिक आहे तो शाबूत राहील ! "

हें ग्यानबाचें भाषण ऐकून सर्जेराव म्हणाले, "ग्यानबा, तुमचा आणि माझा आजपर्यंत जसा गोड संबंध चालत आला आहे तसाच तो पुढेंही चालत राहावा, ही जशी तुमची इच्छा आहे तशी माझीही आहे. जे

दोन पक्ष तुम्हीं मला सांगितले ते मला मान्य आहेत, परंतु मीं कोणताही एक पक्ष स्वीकारावयाच्या अगोदर तुम्हीं काढलेला पन्नास हजार रुपयांचा आंकडा खरा असल्याबद्दल मी आपली खातरी करून घ्यावयाची म्हटलें, तर त्याला तुमची हरकत नाहींना ? ''

ग्यानबा म्हणाला, " बिलकूल नाहीं, बिलकूल नाहीं ! तुमच्या खात्यावर मीं जो पन्नासहजार रुपयांचा आंकडा काढला आहे, तो मीं हिशेबानेंच काढला आहे, त्यांत कांहीं लबाडी नाहीं. तो आंकडा तुम्ही बेलाशक तपासा, त्याला माझी कांहीं हरकत नाहीं ! हा मीं काढलेला आंकडा खरावून पाहाण्याचा तुम्हाला पूर्ण हक्क आहे ! हा हक्क मी हिरावून घेऊं इच्छीत नाही. खऱ्याला मरण नाहीं. आजपर्यंत मी कधीं खोटें कर्म केलेलें नाहीं किंवा कोणाला फसविलेलें नाहीं. हें दफतर मी सोडतों आणि त्यांतील प्रत्येक कागद तुम्हाला दाखवितों ! कोणच्या प्रसंगीं, कोणच्या कामासाठीं, किती रक्कम मीं तुम्हाला दिली वगैरे सर्व तपशील तुम्हाला त्या कागदांवरून कळून येईल. मी तुमच्यावर जें पन्नासहजार रुपयांचें देणें काढलें आहे, तें अगदीं बरोबर आहे. त्यांत यत्किंचित् लबाडी नाहीं ! ''

असें म्हणून ग्यानबानें पुढें असलेल्या दफतराच्या गांठीला हात घातला, परंतु ती गांठ न सोडतां तो म्हणाला, " सर्जेराव, दफतर सोडूं ? माझी तयारी आहे ! ''

असें म्हणून ग्यानबा सर्जेरावांच्या उत्तराची वाट पहात आणि त्यांच्या मुखावर दृष्टि लावून बसला. त्याच्या हातांचीं बोटें गांठीला होतीं तशींच होती ! गांठ सोडण्याची क्रिया त्या बोटांनीं अद्यापि सुरूं केलेली नव्हती.

सर्जेरावांना जमाखर्च मांडण्याचा, हिशेब करण्याचा, हिशेब तपासण्याचा, व्याजें आकारण्याचा, बेरजा, वजाबाक्या, गुणाकार, भागाकर, वगैरे गाणिती कामें करण्याचा मनस्वी कंटाळा असे, आणि ही गोष्ट ग्यानबाला ठाऊक होती. आपण त्यांच्यावर काढलेला पन्नास हजार रुपयांचा आंकडा खरावून पाहाण्याचा खटाटोप ते कधींच करावयाला

सिद्ध होणार नाहींत, अशी ग्यानबाची खात्री होती ! म्हणून तो धमकदारीच्या आणि प्रामाणिकपणाच्या मुद्रेनें सर्जेरावांस पुन्हां म्हणाला, " सोडूं गांठ सर्जेराव ? खऱ्याला मरण नाहीं ! "

ग्यानबाचीं बोटें दफतराच्या गांठीला पूर्वीप्रमाणेंच लागलेलीं होतीं ! परंतु तीं निष्क्रियच होतीं.

ग्यानबानें विचारलेल्या प्रश्नाला उत्तर न देतां, सर्जेराव कांहीं क्षण स्तब्ध बसून राहिले. नंतर गंभीरपणाच्या मुद्रेनें ते त्या सावकाराच्या मुखावर दृष्टि स्थिरावून म्हणाले, " ग्यानबा, तुमच्यावर माझा पूर्ण भरंवसा आहे ! तुम्ही खोटा हिशेब करणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. आणि मला हिशेबी कामाचा मनस्वी कंटाळा आहे, हें तुम्हांला ठाऊक आहे ! तुम्हीं काढलेला आंकडा मी डोळे मिटून पथकरला असता. परंतु तो आंकडा फार मोठा असल्याकारणानें तो खरावून पाहणें जरूर आहे, असें मला वाटतें ! तो आंकडा खरावून पाहाण्याचें जिकीरीचें काम माझ्यानें व्हावयाजोगें नाहीं, म्हणून मी कांहीं मित्रांची मदत ह्या कामीं घेणार आहें ! याला तुमची कांहीं हरकत नाहीं ना ? "

हें ऐकतांच ग्यानबा चपापला. परंतु प्रामाणिकपणाची मुद्रा धारण करून तो म्हणाला, " सर्जेराव, खऱ्याला मरण नाहीं ! माझे हिशेब तुम्हीं हावे त्याच्याकडून तपासून घ्या ! माझी त्याला कांहीं हरकत नाहीं ! "

ह्यावर सर्जेराव कांहीं उत्तर देणार होते, इतक्यांत त्यांचा गडी मारत्या त्या माडींत येऊन म्हणाला, " धनीसाब, आपल्या भेटीला पांच सहा माणसें आलीं आहेत. त्यांना वर पाठवून देऊं काय ? "

" दे पाठवून त्यांना !" अशी सर्जेरावांनीं मारत्याला आज्ञा करतांच तो माडीवरून खालीं यावयाला वळला !

तेव्हां ग्यानबा हलक्या स्वरानें म्हणाला, "सर्जेराव, तुम्ही आज सतरा आठरा वर्षें ह्या कांसेगाबांत अत्यंत श्रीमंत गृहस्थ म्हणून प्रसिद्ध आहांत, तुमचीं सर्व शेतेंबितें मजकडे गहाण पडलीं आहेत, आणि तीं डुलप्याच्या पंथाला लागलेलीं आहेत; तुम्ही पोकळ श्रीमंत आहां ही गोष्ट लोकांना कळूं नये हें तुमच्या हिताचें आहे, असें मला वाटतें ! म्हणून

हीं येणारीं माणसें येथें असेतोंपर्यंत आपलें बोलणें बंद ठेवावें, हें इष्ट आहे, नव्हे काय? तुम्हाला काय वाटतें?"

सर्जेराव म्हणाले, "तुमचे हिशेबाचे कागद तपासून घेण्याच्या कामीं मला मदत करावयासाठीं मीं त्यांना बोलाविलें आहे! त्यांना आपला व्यवहार कळविल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. तुमची कांहीं हरकत नाहीं ना?"

ग्यानबा मनांत फार घाबरला, परंतु धमकदारीची मुद्रा धारण करून म्हणाला, "माझी कांहीं हरकत नाहीं! खऱ्याला मरण नाहीं. माझे हिशेब चोख आहेत! स्वर्गांतून भास्कराचार्य जरी उतरले आणि त्यांनीं माझे कागद तपासले, तरी त्यांना त्यांत एका पैची चुकी आढळणार नाहीं! सर्जेराव, खऱ्याला मरण नाहीं!"

हें संभाषण या थराला येत आहे, तों तेथें सहा इसम आले! ह्या सहा इसमांपैकीं एकाही इसमाला ग्यानबानें पूर्वीं पाहिलेलें नव्हतें. परंतु त्यांना पाहातांच तो अंतर्यामीं थोडासा भ्याला! परंतु तीं सगळीं पोरें पोरें आहेत असें पाहून, त्याला लवकरच धीर आला! मग त्यांच्याकडे एकवार तुच्छतेची नजर करून तो सर्जेरावांना हलक्या स्वरानें म्हणाला, "सर्जेराव, हीं गुडघ्याएवढीं पोरें माझीं कागदपत्रें तपासणार काय? कांहीं हरकत नाहीं! खऱ्याला मरण नाहीं! पण ह्या पोरांना तुम्ही इतकें महत्त्व देऊं लागला तर तुमचा दर्जा कमी होईल, हें लक्ष्यांत आणा! माझें कांहीं जात नाहीं!"

त्यावर सर्जेराव म्हणाले, "ग्यानबा, तीं पोरें बुद्धिमान् आणि हुशार आहेत! तीं तुमचे कागद तपासतील. सोडा तुमचें दफतर आणि एक एक कागद काढून दाखवा मला!"

ग्यानबानें दफतराची गांठ सोडली, आणि तपासणीसाठीं तो एक एक कागद काढूं लागला. त्याच्या कागदांची तपासणी कशी केली गेली, आणि ती तपासणी करण्यासाठीं आलेलीं पोरें कोण होतीं, हें वाचकांना कळविणें आतां जरूर आहे. तें आम्ही पुढील प्रकरणीं कळवूं.

---

## प्रकरण ५२ वें.

# कागदपत्रांची तपासणी.



सर्जेराव आणि ग्यानबा हे दोघेजण देण्याघेण्यासंबंधानें बोलत असतां तेथें सहा मुलगे आले, असें आम्ही मागील प्रकरणीं वाचकाना सांगितलें आहे. हे सहा मुलगे कोण होते हें सांगून, नंतर आम्ही आपलें कथासूत्र पुन्हा हातीं घेऊं !

ह्या सहा मुलग्यापैकीं पाच मुलगे वाचकांच्या परिचयाचेच आहेत. शिवाजी, तानाजी, एसाजी, बाजी, आणि बत्ताशा, ह्यांच्याबद्दल कांहीं सांगण्याचे कारण नाहीं. सहावा मुलगा गोपाळपंत ह्या नांवाचा होता ! तो शिवाजीच्या ताब्यांतील एका गडाच्या अमलाखालच्या प्रदेशांत तालयपंतोजी होता. तो जातीचा देशस्थ ब्राह्मण असून, वयानें बावीस-तेवीस वर्षांचा होता ! तो तल्लख बुद्धीचा, मेहेनती आणि मनमिळाऊ होता. त्याच्या शाळेंत सुमारें पन्नास मुलें असत ! हा गोपाळपंत कांहीं कामानिमित्त शिवाजीला भेटावयाला आला होता. त्याला शिवाजीनें सर्जेरावांच्या घरीं आपल्याबरोबर मुद्दाम आणिलें होतें, आणि काय करावयाचें ह्याची दिशा त्याला सांगून ठेविली होती.

असो. हे सहा मुलगे सतरंजीवर मुकाट्यानें येऊन बसले ! तेव्हां सर्जेराव ग्यानबाला म्हणाले, “ ग्यानबा, मी तुम्हांला पन्नास हजार रुपये देणें लागतों, असें तुमचें म्हणणें आहे ना ? ”

ग्यानबा म्हणाला, “ होय सर्जेराव ! ”

सर्जेरावांनीं विचारलें, “ तर मग तपशील सांगा पाहूं ? ”

तेव्हां ग्यानबा दफतरांतून एक एक कागद उचलून घेऊन, त्याच्यावर नजर टाकून, कोणच्या वस्तूबद्दल द्यावयाची किती रक्कम होते हें सांगून, नंतर तो कागद आपल्या उजव्या हाताशीं ठेवून देत होता. ग्यानबाचें कथन पुढें दिल्याप्रमाणें चाललें होतें:—

“डाळिंबबागेवर मी तुम्हांला जी रक्कम कर्जाऊ दिली ती व्याजासकट नऊ हजार, पेरूबागेवर सात हजार, सिताफळबागेवर दोन हजार, शंकर-

बागेवर सोळाशें, गणेशबागेवर चवदाशें, वेताळशेतावर चार हजार, जुगाईच्या मळ्यावर एक हजार, आंबाईच्या पट्यावर तेराशें, गोकुळ-वाडीवर सत्तावीसशें, आणि हातावर कर्जाऊ म्हणून दिलेले सतरा हजार, मिळून एकंदर पन्नास हजार ! सर्जेराव, तुम्हीं मला पन्नास हजार रुपये दिल्यास तुम्हीं कर्जांतून मोकळे व्हाल ! हें मी सांगितलेले आंकडे व्याजा-सकट आहेत, बरें कां ? ”

यावर सर्जेराव कांहीं उत्तर देणार त्याच्या अगोदर गोपाळपंत म्हणाला, “ग्यानबा, मी सर्जेरावांच्या वतीनें बोलतों ! तुम्हीं ज्या रकमा सांगितल्या त्यांची बेरीज सत्तेचाळीस हजार होते, पन्नास हजार होत नाहीं ! तुमची बेरीज चुकीची आहे ! ”

हें ऐकतांच ग्यानबा भीतीने अंतर्यामीं फार घाबरला. परंतु बाह्या-त्कारीं आश्चर्याची मुद्रा धारण करून म्हणाला, “ माझी बेरीज चुकली आहे ? आपण पुन्हा बेरीज करूं ! त्याला काय हरकत आहे ? खऱ्याला मरण नाहीं ! ”

गोपाळपंत म्हणाला, “ सांगा पाहूं तुमच्या रकमा ?”

ग्यानबा म्हणाला, “ पुन्हा सांगतों घ्या. डाळिंबबाग नऊ हजार. ”

गोपाळपंत—“ हं. नऊ हजार. ”

ग्यानबा—“ पेरूबाग सात हजार. ”

गोपाळपंत—“ नऊ नी सात सोळा हजार. ”

ग्यानबा—“ सोळा हजार झाले ? पुढें शिताफळबाग दोन हजार ! ”

गोपाळपंत—“ सोळा नी दोन आठरा हजार. पुढें ? ”

ग्यानबा—“ पुढें, पुढें, पुढें, देव तुमचें भलें करो ! हं, पुढें शंकरबाग सोळाशें ! ”

गोपाळपंत—“ आठरा हजार अन् सोळाशें मिळून एकोणीसहजार सहाशें. ”

ग्यानबा—“एकोणीस हजार सहाशें झाले ? पुढें गणेशबाग चवदाशें !”

गोपाळपंत—“ एकंदर एकवीस हजार. पुढें ? ”

ग्यानबा—“ पुढें वेताळाचें शेत चार हजार ! ”

गोपाळपंत—" एकवीस अन् चार पंचवीस हजार! पुढें ? "

ग्यानबा—" पुढें जुगाईचा मळा एक हजार. "

गोपाळपंत—" पंचवीस नी एक सव्वीस हजार. पुढें बोला. "

ग्यानबा—" पुढें आंबाईचा पट्टा तेराशें. "

गोपाळपंत—" सत्ताविस हजार तीनशें. पुढें ? "

ग्यानबा—" पुढें गोकुळवाडी सत्तावीसशें ! "

गोपाळपंत—" तीस हजार झाले ! पुढें ? "

ग्यानबा—" पुढें हातावर कर्जाऊ दिले सतरा हजार ! "

गोपाळपंत—" तीस हजार आणि सतरा हजार मिळून सत्तेचाळीस हजार होतात! तुम्ही म्हणतां पन्नास हजार. हे सर्जेराव तुमच्या हिशेबाप्रमाणें सत्तेचाळीस हजार रुपये लागतात ! तुम्ही पन्नासहजार रुपयांची रक्कम त्यांच्या नांवावर काढली, ती चुकीची आहे ! "

आपली खोटी बेरीज उघडकीस आली, म्हणून ग्यानबा मनांत तर घाबरलाच. परंतु लबाड आणि लफंग्या माणसांचे ठायीं जो बेशरमपणा असतो, त्याचा अवलंब करून आणि रागाची मुद्रा धारण करून तो म्हणाला, " मी मुद्दाम खोटी बेरीज केली, असें तुमचें म्हणणें आहे कीं काय ? सर्जेरावांना फसवून मला काय मिळावयाचें आहे ? खोटीं कर्में करणारा हा ग्यानबा नव्हे, समजला ? पन्नास पन्नास हजारांच्या हिशेबांत दोन तीन हजार रुपायांची चुकी लागली तर त्यांत आश्चर्य काय आहे ? पन्नास हजार सोडून द्या, आणि सत्तेचाळीस हजार रुपये मला द्या ! त्याला तर तुमची कांहीं हरकत नाहीं ना ? "

हें भाषण ऐकून तानाजी म्हणाला, " ग्यानबा, आमच्यावर तुम्ही धर्म करा, असें आमचें म्हणणें नाहीं. तुमची जी उजू रक्कम असेल, ती द्यावयाला सर्जेराव कबूल आहेत. तुम्ही आपली बेरीज पुन्हां तपासून पाहिली असती, तर तुमची चुकी तुम्हाला कळून आली असती ! बरें तें असो. आतां सत्तेचाळीस हजार रुपायांच्या रकमेच्या पोटरकमा सांगा पाहूं ! "

हें ऐकून ग्यानबा मनांत पुन्हां घाबरला; परंतु करारीपणाचा अवलंब

करून म्हणाला, " ऐका ! डाळिंबबाग व्याजासकट नऊ हजार रुपये ! आणे, पै सध्यां आपण सोडून देऊं ! "

गोपाळपंत सर्जेरावांकडे नजर करून म्हणाला, " सर्जेराव, तुम्ही डाळिंबबाग ग्यानबांकडे किती रुपायांना आणि किती वर्षांमागें गहाण टाकली ? "

सर्जेराव म्हणाले, " तेरा वर्षांमागें मी डाळिंबबाग आठशें रुपये रोख घेऊन, रुपया व्याजाच्या दरानें ह्या ग्यानबाकडे गहाण टाकिली. "

गोपाळपंतानें ग्यानबाला विचारलें, " होय का, ग्यानबा ? "

ग्यानबा म्हणाला, " होय. "

तेव्हां गोपाळपंत म्हणाला, " रुपाया हा व्याजाचा दर फार जबर आहे. पण तो दर धरला, तरी आठशें रुपायांचें तेरा वर्षांचें व्याज तेरा आडे चारोदरशें रुपये होतें ! आणि मुद्दल आठशें रुपये, मिळून नऊशे चार रुपये होतात ! तुम्ही ग्यानबा, नऊ हजार रुपये कसे काढलेत ? "

हें ऐकताच ग्यानबा चपापला ! त्यानें डाळिंबबागेचें गाहाणखत पुढें धरून त्याचेवर नजर टाकल्याचा बाहाणा केला ! मग तो म्हणाला, " हां हां ! आठशेंच्याबद्दल मी आठ हजार वाचले. ही माझी चुकी झाली, ती मी कबूल करतों ! जास्तीचा आंकडा तुम्ही बाद करा. त्याला माझी हरकत नाहीं. सत्तेचाळीस हजारांतून आठ हजार सुमारें कापून काढा. एकूणचाळीस हजार रुपये तर मला द्याल कीं नाहीं ? "

त्यावर एसाजी गंभीरपणाच्या व करारी मुद्रेनें म्हणाला, " ग्यानबा, हा कांहीं थट्टेचा विषय नव्हे ! खरा हिशेब करून जी रक्कम होईल ती सर्जेरावांपाशीं मागावयाचा तुम्हाला पूर्ण हक्क आहे ! डाळिंबबागेचा तुमचा हिशेब आठ हजारांनीं खोटा झाला ! इतर गाहाणखतें देखील चांगलीं तपासून घेतलीं पाहिजेत ! आतांच्या आतां तुमचे सर्व कागद तपासा, आणि सर्जेरावांनीं तुमचें किती देणें निघतें तें सांगा ! तुमचें कर्ज फेडावयाला ते तयार आहेत ! "

सर्जेराव म्हणाले, " ग्यानबा, तुम्ही अशी लबाडी कराल अशी माझी कल्पना नव्हती ! लोक मला उधळ्या म्हणतील. म्हणोत. पण

तुम्ही खोटे हिशेब करून मित्राला फसविण्याचा प्रयत्न केला, म्हणून तुमची फार बेअब्रू होईल ! ”

आपलें खोटें कर्म आपल्याच अंगावर उलटलें, म्हणून ग्यानबाला शरम वाटली ! परंतु लबाड माणसें निर्लज्ज असतात, ह्या नियमाला तो अपवाद नव्हता ! तो हंसत म्हणाला, “ सर्जेराव, हिशेबबिशेब जाऊं द्या चुलींत ! तुम्ही मला रोख पांच हजार रुपये द्या, आणि या दफतरांतील सगळे कागद आपल्या हातांनीं फाडून जाळून टाका ! मग तर तुमची कांहीं हरकत नाहीं ना ?”

त्यावर तानाजी म्हणाला, “ग्यानबा, तुमचे उपकार नकोत आमच्या डोक्यावर ! ”

एसाजी म्हणाला, “ असले खोटे हिशेब करून, हरामाचे पैसे घेऊन, श्रीमंत झालेल्या माणसाला धिःक्कार असो !”

बाजी म्हणाला, “ थूः त्याच्या जिंदगानीवर ! ”

बत्ताशा म्हणाला, “ ग्यानबा, तुम्ही लबाडीने आणि विश्वासघातानें मिळविलेले तुमचे सर्व पैसे हिरावून घेतले, तर तुमच्या हातांत करवंटीच येईल ! ”

सर्जेराव म्हणाले, “मी आळशी आहे, मला हिशेब करण्याचा, व्याजाची आकारणी करण्याचा, अतोनात कंटाळा आहे. म्हणून ग्यानबा, मी कधीं तुमच्या रकमा तपासून पाहाण्याचा विचार केला नाहीं. तुम्ही खोटें काम करणार नाहीं, तुम्ही विश्वासघात करणार नाहीं, तुम्ही मला फसविणार नाहीं, असा माझा समज होता ! पण तुम्ही आरंभापासून माझ्याशीं असा खोटेपणा करीत आला आहा, हे पाहून मला आश्चर्यही वाटत आहे आणि किळसही वाटत आहे ! मी तुमच्यावर भरंवसा टाकून बसलों, त्याचा तुम्हीं अशा रीतीनें फायदा करून घ्यावयाला निघाला, ही तुम्हीं मोठी शरमेची गोष्ट केली ! हे माझे सहा मित्र जे येथें बसले आहेत, त्यांनीं मला तुमच्या तावडींतून सोडविलें ! त्यांचे मजवर अनंत उपकार झाले आहेत ! पण ग्यानबा, तुमचा गुन्हा भारी धाडसाचा आणि अतिशय भयंकर स्वरूपाचा आहे, यांत शंका नाहीं ! ”

वर सांगितल्याप्रमाणें तेथें बसलेल्या सर्व माणसांचीं बोलणीं चाललेलीं

असतां ग्यानबा खापरासारखें तोंड करून बसला होता ! सर्जेरावांच्या सर्व स्थावरजंगम जिंदगीचे आपण आज मालक होणार, पद्मिनीसारखी सुंदर तरुणी आपणाला विलासाला मिळणार, म्हणून तो मार्गशीर्ष शुक्ल प्रतिपदेची वाट पाहात बसला होता ! तो दिवस उजाडला. त्याचें मनोराज्य साध्य न होतां, तो पुरा फजिती मात्र पावला ! ह्यामुळें त्याची निराशा तर झालीच, पण उलट चारचौघांत डोकें वर काढून बसण्याउठण्याची शक्यताही त्याला राहिली नाहीं ! त्याला परम दुःख झालें ! त्याक्षणीं जर तो बसला होता तेथील जमीन दुभंगली असती आणि तिनें त्याला आपल्या पोटांत स्थान दिलें असतें, तर त्याला परम आनंद झाला असता !

असो. सर्जेरावांचें बोलणें संपलें. ग्यानबा कांहीं उत्तर देईल असें त्यांना वाटत होतें ! परंतु तो कांहींच उत्तर न देता स्तब्ध बसला आहे, असें पाहून ते शिवाजीला म्हणाले, " राजेसाहेब, तुम्हीं दातेगड जिंकून घेतला आहे. दातेगडावर तुमचा अंमल चालू आहे ! हा कासेगांव दातेगडाच्या हद्दींत मोडतो. ह्या कासेगांवांत घडलेल्या गुन्ह्याची चवकशी करण्याचा अधिकार तुमचा आहे ! येथें जे कांहीं घडलें, तें तुम्हीं पाहिलेलें आहे. आतां तुम्हांला जे योग्य वाटेल तें करा ! "

---

## प्रकरण ५३ वें.

# तपासणीचा शेवट.



मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें, सर्जेरावांनीं ग्यानबाच्या गुन्ह्याबद्दल त्याला शिक्षा करण्याचें काम शिवाजीवर सोंपविलें. तेव्हा शिवाजी गंभीरपणाची मुद्रा करून ग्यानबाला म्हणाला, " ग्यानबा, येथें माझ्या समक्ष जो प्रकार घडला तो मी पाहिला. ह्या सर्जेरावांना फसविण्यासाठीं तुम्ही खोटे हिशेब त्यांच्या डोक्यावर लादण्याचा प्रयत्न करीत होता अशी माझी खातरी झाली आहे. सर्जेराव तुमचे पुष्कळ वर्षांचे मित्र ! त्यांना फसविण्याचा तुमचा प्रयत्न नीचपणाचा असून, त्यांत विश्वासघाताचाही प्रकार होत आहे. माझ्या मतानें तुमचा गुन्हा भयंकर

स्वरूपाचा आहे. आणि त्याला शिक्षाही जबर पाहिजे आहे! तुम्ही कांहीं वर्षांमागें एका रांडेचा खून केला, तुम्ही आपल्या पत्नीला छळून तिला विहिरींत जीव द्यावयाला भाग पाडलें, तुम्ही आपल्या मुलीला पैशा-साठीं एका मुसलमानाला विकलें, तुम्ही विजापुरास एका सरदाराच्या घरांत चोरी केली, हे आणि दुसरे गुन्हे भयंकर होते; परंतु ते माझ्या हद्दींत आणि माझ्या रियासतीच्या काळीं घडलेले नसल्याकारणानें, त्या गुन्ह्यांची चौकशी करण्याचा मला फारसा अधिकार पोंचत नाहीं. तथापि, त्या गुन्ह्यांवरून तुम्ही बदमाष आहां, ही गोष्ट स्पष्ट होते! तुमचे हे जुने गुन्हे जरी विचारांत घेतले नाहींत,तरी हा तुमचा ताजा गुन्हा,—खोटे हिशेब करून सर्जेरावांना फसविणें,—हा गुन्हा तरी तुम्ही माझ्या समक्ष, माझ्या मुलखांत आणि माझ्या अमलांत केला आहे! त्याची चौकशी करण्याचा पूर्ण हक्क मला आहे आणि तो हक्क मी बजावणार! म्हणून ग्यानबा, मी तुम्हाला सध्यां गिरफदार करतो,आणि दातेगडावर रवाना करून देतों! पुढें लवकरच तुमच्या गुन्ह्याची चौकशी करून, तुम्हाला योग्य ती शिक्षा मी देईन!"

नंतर तानाजी वगैरेकडे नजर करून शिवाजी त्याना म्हणाला, " ह्या ग्यानबाना गिरफदार करून दातेगडावर रवाना करून द्या!"

हें शिवाजी बोलत असतां ग्यानबा भीतिनें थरथर कांपत होता! आपली लबाडी उघडकीस आली म्हणून त्याला शरम वाटत होती. आपलीं सर्व मनोराज्यें ढासळलीं, म्हणून त्याची निराशा झाली. आतां देवावर हवाला ठेवून बसण्याशिवाय त्याला गत्यन्तर नव्हतें! त्यानें आपणाला गिरफदार करणाऱ्या माणसांना कांहीं हरकत केली नाहीं.

सर्जेरावांच्या घराच्या अंगणात शिवाजीचे कांहीं शिपायी होते. त्यांच्या रखवालींत ग्यानबाची दातेगडावर रवानगी करून देण्यात आली!

सर्जेरावांच्या घरांतून ग्यानबाची कैदी ह्या नात्यानें रवानगी करून देण्यांत आल्यानंतर, कांहीं वेळ त्या माडींत स्तब्धता होती! नंतर ग्यानबाच्या खोटेपणासंबंधानें कांहीं किरकोळ बोलणीं झालीं. हीं बोलणीं संपल्यानंतर शिवाजीनें सर्जेरावांची ग्यानबाच्या तावडींतून सुटका झाल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें! त्यावर सर्जेराव म्हणाले, " राजेसाहेब, हे मजवर तुमचे

उपकार आहेत! ग्यानबाचे हिशेब तपासण्यासाठीं तुम्ही इतकी मंडळी आपल्याबरोबर आणली, तुमच्या मित्रांनीं त्या सावकाराच्या कागदांतील चुका ताबडतोब हुडकून काढल्या, त्याची हरामखोरी भरपूर मापानें त्याच्या पदरांत घातली, ह्याबद्दल मी तुम्हा सर्वांचा ऋणी आहे! त्यांतल्यात्यांत गोपाळपंतांच्या तल्लखपणाची करावी तितकी तारीफ थोडीच आहे! व्याजाची आकारणी व रकमाच्या बेरजा त्यांना पाटीशिवाय आणि कागदाशिवाय करतां येतात! त्यांची बुद्धि पाहून मी अगदीं थक्क होऊन गेलों!"

नंतर सर्जेरावानीं गोपाळपंतासंबंधानें कांहीं चौकशी केली. नंतर ते शिवाजीला म्हणाले, "राजेसाहेब, तुम्ही हा दातेगड जिंकून घेतला आणि तेथें मराठ्यांचा अंमल सुरू केला, ह्याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों! असेंच विजय तुम्हाला पुढेंही मिळत जावोत, अशी माझी ईश्वरापाशीं प्रार्थना आहे!"

तेव्हा शिवाजी म्हणाला, "सर्जेराव, तुम्ही माझ्या कृत्यासंबंधानें सहानुभूति दाखवीत आहां, हे पाहून मला भारी आनंद होत आहे! तुम्हासारख्या वयोवृद्ध माणसांपासून आम्हाला पैशाची अपेक्षा नाहीं, अंगमेहनतीची अपेक्षा नाहीं, कशाचीही आम्ही अपेक्षा करीत नाहीं. तुम्हा वृद्ध माणसांचे आशीर्वाद आणि सहानुभूति असली म्हणजे आम्ही संतुष्ट आहों! हिंदुस्थानांत हिंदू लोकांच्या साहाय्यानें उभारलेलें स्वराज्य असल्याशिवाय, हिंदू लोकांना सुख मिळणार नाहीं! परधर्मी, परदेशी, जुलमी, अन्यायी, पक्षपाती, विलासी अशा लोकांच्या राज्यांत आपणां हिंदूंना कधींच सुख प्राप्त व्हावयाचें नाहीं, म्हणून मी स्वराज्य स्थापावयाला कास कसली आहे! हें माझें कार्य भारी धाडसाचें, जोखमीचें आणि गुंतागुंतीचें आहे! ह्या कार्यामध्यें कदाचित् मी आणि माझे मदतनीस चिरडलें जाऊं. कदाचित् आमचें कार्य सफल होईल! हे नशिबाचे खेळ आहेत. परंतु उच्च ध्येय डोळ्यांपुढें ठेवून प्रयत्न करणें ह्यातच पुण्य आहे! तें ध्येय सफल न झालें, तरी पुण्य पदरीं पडतेंच पडतें! तुम्हासारख्या वृद्ध माणसांची माझ्या कार्याला सहानुभूति असावी, एवढीच माझी अपेक्षा आहे!"

त्यावर सर्जेराव म्हणाले, "राजेसाहेब, आमची पूर्ण सहानुभूति आहे. तुम्ही आपलें कार्य चालू ठेवा ! परमेश्वर तुम्हाला यश देईल ! "

यानंतर शिवाजी म्हणाला, "सर्जेराव, मी आतां तुम्हाला एक विनंती करतों ! मी कांहीं वेगळ्या विषयासंबंधाने बोलणार आहें. बोलूं काय ?"

त्यावर सर्जेराव म्हणाले, " आलबत ! तुमचे आज माझ्यावर अनंत उपकार झाले आहेत ! जें कांहीं तुम्ही मागाल, तें मी द्यावयाला तयार आहें ! बोला. "

इतक्यांत तेथें कोंडीबा,—भास्कराचे मामा,—येऊन दाखल झाले.ग्यानबाची रवानगी दातेगडाकडे करून दिल्यावर, शिवाजीनें मुद्दाम एक माणूस कोंडीबांना बोलावून आणण्यासाठीं भास्कराच्या घराकडे रवाना केला होता !

कोंडीबा त्या माडींत येतांच, त्यांनीं सर्जेरावाना रामराम केला ! मग सर्जेरावानीं त्यांना बसावयासाठीं स्थानाचा निर्देश केल्यावर, ते बसले. तेव्हां शिवाजी सर्जेरावांना म्हणाला, " सर्जेराव, हे कोंडीबा माझे परम मित्र आहेत ! ते नेहेमीं कैंजळगडावर असतात. ह्या दातेगडाच्या मोहिमींत भाग घ्यावयासाठीं ते येथें आलेले होते ! "

तेव्हां सर्जेराव मंदस्मितपूर्वक कोंडीबाकडे पाहून म्हणाले, " कोंडीबा, तुम्ही नेहेमीं कैंजळगडावर असता काय ? "

कोंडीबा म्हणाला, " होय. मी नेहेमीं कैंजळगडावर असतो. त्या कारणामुळें आपला आजपर्यंत परिचय होऊं शकला नाहीं. परंतु मी तुम्हाला अगदींच तिऱ्हाईत आहे, असें मात्र नव्हे ! कसे तें सांगतो. या तुमच्या कासेगांवीं दिवाकरराव मोरे म्हणून जे गृहस्थ होते, आणि जे नुकतेच निवर्तले, ते तुम्हाला ठाऊक होते ना ? "

सर्जेराव म्हणाले, " होय. ते मला ठाऊक होते. त्यांचा आमचा फार दिवसांचा,—वीस वर्षांचा म्हणानात कां घटकाभर,—चांगला स्नेहसंबंध होता ! ते लाखांत मनुष्य होते !"

कोंडीबा म्हणाला, " होय. त्या दिवाकररावांचा मुलगा भास्कर हाही तुमच्या माहितीचा आहेच ! "

सर्जेराव म्हणाले, "होय. त्या भास्कराचा आणि माझी मुलगी पद्मिनी ह्या दोघांचा अलीकडे फार स्नेह जडला आहे! त्याच भास्करानें माझ्या मुलीला मुसलमानांपासून बचावलें!"

कोंडीबा म्हणाला, "त्या भास्कराचा मी मामा! मी नेहेमीं केंजळ-गडावर असतों."

सर्जेराव म्हणाले, "ठीक! तुमच्या भेटीनें मला आनंद झाला! माझ्या हातून तुमचें कांहीं काम होण्याजोगें असल्यास सांगा, मी तें अवश्य करीन!"

तेव्हा कोंडिबानें उत्तर दिलें, "माझा भाचा भास्करराव ह्याच्यासाठीं तुमची मुलगी पद्मिनी, हिला मी मागणी घालावयासाठीं तुमच्याकडे आलों आहे! तिला मी साडी, चोळी, खाऊ आणि लहानशी देज देणार आहे. तुमची संमति असावी!"

सर्जेरावांना पद्मिनीकडून ह्या गोष्टीची आगाऊ सूचना मिळालेली होती, म्हणून त्यानें उत्तर दिलें, "कोंडीबा, माझ्या मुलीला तुम्ही घालीत आहां ती मागणी मी स्वीकारतों! इतकें दिवस मी एका पेचांत अडक-लेला होतों. परंतु तुमचे मित्र शिवाजीराजे ह्यांनीं त्या पेचांतून मला सोडविलें! आतां तुम्हीं करीत आहां ती मागणी पुरवावयाला मी पूर्णपणें मोकळा आहें. मी तुमची मागणी मोठ्या आनंदानें स्वीकारतों! मीं आतांच पद्मिनीला इकडे बोलावतों. "पद्मिनी,पद्मिनी, ये इकडे! ही मंडळी तुला भास्कररावासाठीं मागणी घालावयाला आली आहे! मीं ती मागणी स्वीकारली आहें. या सर्वांना नमस्कार करून बस इथें!"

पद्मिनीनें तेथें असलेल्या सातही पुरुषांना बायकी चालीचे सात त्रीक एकवीस नमस्कार केले आणि चुकल्यामाकल्यासाठीं आणखी दहा पांच नमस्कार करून पद्मिनी तेथें बसली. कोंडीबानें तिच्या-हातीं साडी, चोळी, खाऊ, कुंकू वगैरे वस्तु दिल्या. मग कोंडी-बानें मोहोरांच्या चार पिशव्या पुढें करून म्हटलें, "पद्मिनी, मी भास्कर-राव मोरे याचा मामा, कोंडीबा, तुला माझ्या भाच्यासाठीं मागणी घाला-वयाला आलों आहे. आमची मागणी तुझ्या वडिलांनीं मान्य केली

आहे. तुला भास्करराव पति आवडतील ना ? तुझी ह्या गोष्टीला मान्यता आहे ना ? ''

पद्मिनीनें मंदस्मितपूर्वक पण स्पष्ट शब्दांनीं उत्तर दिलें, ''होय ! माझी मान्यता आहे !''

तेव्हां सर्जेराव कोंडीबाकडे नजर करून म्हणाले, '' कोंडीबा, माझ्या मतानें हें लग्न उद्याच साजरें करावें असें वाटतें. त्यात तुमची कांहीं गैर-सोय नाहीं ना ? ''

तेव्हां कोंडिबानें उत्तर दिलें, '' उद्या दातेगडावर मोठा दरबार भरावयाचा आहे ! त्या दरबाराचें आमंत्रण मी तुम्हांला आतांच करतों ! अवश्य या ! लग्नाचा दिवस पुढें ढकलला पाहिजे. ''

शिवाजी म्हणाला, '' सर्जेराव, हा दरबार मीच भरविणार आहे ! त्यांत मुख्य काम दातेगडावर गडकऱ्याची स्थापना करणें हें आहे ! मी स्वता तुम्हांला आमंत्रण देतों ! अवश्य या. ''

सर्जेरावांनीं उत्तर दिलें, ''येईन, अवश्य येईन ! लग्नाचा विधि मार्ग-शीर्ष शुद्ध तृतीया ह्या दिवशीं करावा अशी माझी इच्छा आहे. त्या दिवसाला तुमची कांहीं हरकत नाहीं ना ? ''

तेव्हा शिवाजी म्हणाला, '' मार्गशीर्ष शुक्ल [illegible] दातेगडावर प्रायश्चित्ताचा आणि पतितपरावर्तनाचा विधि व्हावयाचा आहे. तो मंग-ळवारचा दिवस सोडून हावा तो मुहूर्त तुम्ही सांगा, त्याला आमची तयारी आहे ! ''

तेव्हां सर्जेराव म्हणाले, '' बुधवारींही एक मुहूर्त आहे. त्या दिवसाला तुमची कांहीं हरकत आहे काय ? ''

कोंडीबा म्हणाला, '' कांहीं नाहीं. बुधवारीं देखील मुहूर्त आहेच ! बरें आतां आम्ही येऊं ? ''

सर्जेराव म्हणाले, '' हो, या ! पण अगोदर पानसुपारीचा स्वीकार करा ! ''

यानंतर पानसुपारी होऊन कोंडीबा, शिवाजी, वगैरे लोक तेथून उठले !

---

# प्रकरण ५४ वें.

# प्रपितामहाच्या पदावर!



मार्गशीर्ष शुक्ल द्वितीया! आठवड्याचा वार सोमवार!

ह्या दिवशीं दातेगडावर मध्यान्हाला एक दरबार भरावयाचा असल्या-कारणानें गडावरील विस्तीर्ण पटांगणांत एक मोठा मांडव उभारलेला होता! आणि त्यात सुमारे चार हजार माणसांना बसावयाची सोय केलेली होती! स्त्रियासाठीं चिकांच्या पडद्यांच्यामागें जागा राखून ठेविलेली होती.

हा समारंभ पहावयासाठीं शिवाजीनें आपल्या ठिकठिकाणच्या दोस्तांना, अधिकाऱ्यांना, अंमलदारांना आणि हितचिंतकांना बोलाविलेलें होते!

ह्या आमंत्रित मंडळींत आमच्या वाचकांच्या परिचयाचे पुष्कळ लोक होते आणि आमच्या वाचकांच्या परिचयाचे नसलेलेही पुष्कळ लोक तेथें हजर होते.

कासेगांवच्या भवानीचा पुजारी बिंदुमाधव भट आपल्या सहा पुत्रांसह आणि दहा नातवंडांसह आलेला होता. सर्जेराव निंबाळकर ऊर्फ नाईक हे आपली कन्या पद्मिनी हिला बरोबर घेऊन आलेले होते. गणवंतगडाचे गडकरी मंदारराव हे आपली पत्नी मंजरीबाई हिला घेऊन आलेले होते. प्रचितगडाचे युवराजगडकरी कमळोपंत आणि त्यांचे साडू आनंदराव, हे आपल्या स्त्रिया हिराबाई आणि ताराबाई यांना घेऊन आलेले होते. आनंदरावांची कन्या माणकूताई आणि जांवई चिंतामणि, हेही आपल्या वडील माणसासह तेथें आलेले होते. तसेंच कैंजळगडाचा युवराजगड-करी पुंडरीक, आपली पत्नी अरुंधती हिला घेऊन तेथें आलेला होता. बोरवडच्या हैबतरावांचे चिरंजीव शामराव आणि जावई राजाराम, हेही तेथें आले होते!

दरबारची वेळ भरताच भालदार आणि चोपदार ह्यांनीं खामोषी पुकारली! जिकडेतिकडे शांतता झाली, तेव्हां शिवाजी उठून उभा राहिला आणि त्यानें पुढें दिल्याप्रमाणे खऱ्या देशभक्तीनें ओथंबलेलें सरळ आणि अस्खलित असें भाषण केलें!:—

"माझ्या प्रिय बंधूनो आणि प्रिय भगिनींनो, आपण सर्व एकाच देशाचे रहिवासी असल्याकारणानें आपणांमध्यें बंधुत्वाचे नाते आहे. आपणापैकीं एकाचे जें सुखदुःख तें बाकीच्या सर्वांचें सुखदुःख, एकाची जी सोय गैरसोय ती बाकीच्या सर्वांची सोय गैरसोय, एकाचा जो मानापमान तो बाकीच्या सर्वांचा मानापमान, एकाचा जो उत्कर्षापकर्ष तो बाकीच्या सर्वांचा उत्कर्षापकर्ष, एकाचें जें हिताहित तें बाकीच्या सर्वांचें हिताहित!

सारांश, आपण सर्व हिंदू लोक एकाच बंधनानें एकमेकाशीं बांधले गेलो आहो! आपणांपैकीं कांहींना सुख प्राप्त झालें म्हणजे आपला हिंदुस्थान देश सुखी झाला, असें म्हणतां यावयाचें नाहीं. एकाची सोय जमल्यानें सर्व देशाच्या सोयी जमल्या असें म्हणतां यावयाचें नाहीं. एका हिंदूला मानाची जागा मिळाल्यानें सर्व हिंदूंना मानाच्या जागा मिळाल्या असें होत नाहीं. एका हिंदूचा उत्कर्ष झाल्यानें सर्व देशाचा उत्कर्ष झाला, असें म्हणतां यावयाचें नाहीं. एका हिंदूचे हित झाल्यानें सर्व देशाचें हित होतें असें नव्हे!

माझ्या म्हणण्याचें तात्पर्य हें कीं. जरी ह्या मुसलमानी राज्यांत आपणापैकीं कांहीं लोक सुखी असले, तरी एकंदरीनें आपला देश सुखी नाहीं! आपणापैकीं काही लोक ऐषआरामांत असले, तरी देशाला ऐषआराम कसा तो ठाऊक नाहीं. आपणांपैकीं कांहीं लोकांना मानाच्या आणि वैभवाच्या जागा मिळालेल्या असल्या, तरी सर्व कर्तबगार लोकाना मानाच्या आणि अधिकाराच्या जागा न मिळतां नादान आणि कर्तृत्वशून्य अशा मुसलमानांना त्या दिल्या जातात! ह्या राज्यांत हिंदूंच्या अंगच्या गुणाचें चीज होत नाहीं. हिंदूंना आपल्या अंगचे गुण दाखवावयाला अवसर मिळत नाहीं. मुसलमान माणूस, केवळ तो मुसलमान म्हणून श्रेष्ठ ठरतो! हिंदू माणूस, केवळ तो हिंदू म्हणून नादान गणला जातो!

ह्या मुसलमानी राज्यांत हिंदूंच्या धर्मावर कर बसविला जातो! हिंदूंच्या देवांचीं देवळें फोडणाऱ्या मुसलमानांना शिक्षा होत नाहीं! राज्यकर्ते मुसलमान म्हणून हावा तो मुसलमान हाव्या त्या ब्राह्मणाचें जानवें गमतीखातर तोडूं शकतो. त्याला कांहीं शिक्षा होत नाहीं! राज्यकर्ते मुसलमान म्हणून हाव्या त्या मुसलमानानें हाव्या त्या हिंदूस्त्रीवर

बलात्कार केला, तरी त्याला शिक्षा केली जात नाहीं ! ह्या मुसलमानी राज्यात हिंदूंना न्याय मिळत नाहीं. हिंदूच्या जीविताला, आबरूला, संपत्तीला, घरादाराला, वतनवाडीला कांहीं सुरक्षितपणा नाहीं. ह्या मुसलमानी राज्यांत गोमातेची विटंबना केली जाते, आणि ती विटंबना हिंदूंनीं मुकाट्यानें पाहावी लागते ! सारांश, आपल्या हिंदुस्तानदेशांत आपणां हिंदूंना सुखानें, समाधानानें, आणि स्वस्थपणें भाकरी खातां येत नाहीं. आणि परदेशी, परधर्मी मुसलमानांच्या चैनी आणि विलास अबाधित चालूं शकतात !

ही आपल्या देशाची शोचनीय स्थिति नाहींशी करून तिच्या जागीं सुस्थिति उत्पन्न करावी, हा माझा उद्देश आहे! परदेशी, परधर्मी लोकांचें राज्य आपल्या देशांतून उडवून द्यावें, असा माझा संकल्प आहे ! हिंदुस्थानांत, हिंदू लोकांच्या सुखासाठी, हिंदू लोकांच्या मदतीनें, मी हिंदूंचें स्वराज्य स्थापावयाला कास कसली आहे ! माझ्या प्रयत्नांत वावगें असें कांहीं नाहीं. परंतु मलाच हे मुसलमान लोक चोर, लुटारू आणि दरोडेखोर म्हणतात. खरोखरी चोर, लुटारू आणि दरोडेखोर हे मुसलमान लोकच होत ! आमच्या देशात घुसणारे, आम्हा हिंदू लोकावर जुलमाचें राज्य चालविणारे, आमच्या देशाची संपत्ति लुटणारे आणि भोगणारे हे मुसलमान. लुटारू आणि दरोडेखोर ह्या नांवाला योग्य होत !

असो. ह्या मुसलमानांचें राज्य उलथून पाडावयाला मी कास कसली आहे ! हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापावे हा माझा उद्देश आहे ! ह्या स्वराज्यस्थापनेची मी पूर्वतयारी चालविली आहे. मी माझ्या मदतनीसांच्या मदतीनें आजपर्यंत अनेक गड जिंकून घेतले आहेत. आणि आज मी हा दातेगड जिंकून घेतला आहे ! ह्या गडाच्या गडकऱ्यानें आणि त्याच्या मुलानें हिंदूंच्या विरुद्ध असंख्य अपकार केले होते! त्यांना ह्या गडावरून हाकलून देण्यांत मी कांहीं वावगें कृत्य केलें, असें मला वाटत नाहीं ! हा दातेगड माझ्या भावी स्वराज्याचा मी आतां एक घटक म्हणून जाहीर करीत आहे !

आतां ह्या दातेगडाचा गडकरी मी एक लायक मनुष्य नेमणार आहे. तो कोण, तो मी तुम्हाला सांगतों. हा दातेगड सुमारें शंभर वर्षांच्या

मागें विभाकरराव बिन आदित्यवार मोरे ह्या नांवाच्या एका मऱ्हाठे जातीच्या वीर पुरुषाच्या मालकीचा होता. तो गड त्याच्या पूर्वजांना शिलाहार राजांनीं बक्षिस दिला होता. तो गड शंभर वर्षांमागें आदिलशहाच्या सैन्यानें विभाकररावांपासून जिंकून घेतला. तेव्हांपासून आजपर्यंत हा गड विजापुरच्या राज्याखालीं मोडत आहे. तो गड आज आपण मऱ्हाठ्यांनीं जिंकून घेतला आहे. ह्या दातेगडाच्या गडकऱ्याच्या पदावर बसावयाला त्याच विभाकररावाचा पणतू योग्य आहे, असें मला वाटतें ! हा पणतू कोण म्हणाल, तर भास्करराव बिन दिवाकरराव मोरे ! ह्या वीर गड्यानें आजपर्यंत माझी धाडसाचीं, शौर्याचीं, जोखमीची अनेक कामें केलेली आहेत ! तो हुशार आहे, बुद्धिमान् आहे, सुशिक्षित आहे, आणि तो कायावाचामनें पवित्र आहे ! त्यालाच आता मी त्याच्या प्रपितामहाच्या पदावर अधिष्ठित करतों ! ”

असें म्हणून शिवाजीनें भास्करला पुढें बोलावून आणविलें. तो पुढें येतांच, तानाजीनें त्याला जरीकांठीं रेशमी मंदील आणि अंगरखा आणि तुमान हीं बक्षीस दिलीं ! एसाजीनें त्याच्या कमरेला एक तरवार लटकाविली ! बाजीनें त्याला एक पुष्पगुच्छ नजर केला !

हा विधि एथपर्यंत आला, तेव्हां भास्करनें उभे राहून शिवाजी, वगैरे मुख्य वीरगड्याना आणि आमंत्रित मंडळींना वंदन केलें, आणि पुढील शब्दांनीं शिवाजीला आपली कृतज्ञता बोलून दाखविली ! या वेळीं त्याचें मुख शालीनतेनें मनोहर दिसत होतें !

भास्कर म्हणाला, “ शिवाजीराजे ऊर्फ आबासाहेब ह्यांचा मजवर लोभ आहे, म्हणून मी स्वताला धन्य समजतों ! मी आबासाहेबांचीं आजपर्यंत अनेक प्रकारचा कामें केलेलीं आहेत. कांहीं धाडसाचीं, काहीं शौर्याचीं, काहीं हेरपणाचीं, कांहीं अन्यप्रकारांचीं मी कामें केलेली आहेत, आणि तीं कामें मी प्रामाणिकपणानें यथाशक्ति केलेलीं आहेत, ही गोष्ट खरी आहे. परंतु मी जीं कामें केली, तीं दुसऱ्या कोणाही करतां येण्याजोगीं होतीं आणि कदाचित् अधिक चांगल्या रीतीनेंही करतां आलीं असती. तथापि, माझ्या कामांचा आबासाहेबांनीं गौरवपर

निर्देश केला आहे! त्यांवरून मी इतकेंच समजतो कीं, मजवर त्याचा लोभ आहे, आणि माझें काम निदान टाकाऊ तरी नाहीं असा त्याचा ग्रह आहे! हा त्यांचा मजविषयींचा ग्रह अगदींच अस्थानीं नाहीं, असें ह्या गडाच्या रियासतीवरून सर्वांच्या निदर्शनास आणून देण्याचा मी प्रामाणिकपणें प्रयत्न करीन!

मला आबासाहेबांनीं ह्याच गडावर गडकरी नेमलें ह्याबद्दल मला दुसऱ्याही एका कारणानें आनंद होत आहे! माझे प्रपितामह विभाकरराव ह्यांची अशी इच्छा होती कीं, त्यांच्या वंशांतील कोणा तरी पुरुषानें त्याच्या पदावर अधिष्टित व्हावें! आबासाहेबांनीं हा गड जिंकून घेऊन मला ह्या पदावर त्यांनीं अधिष्टित केलें, तेणेंकरून माझ्या प्रपितामहाचा आत्मा स्वर्गांत शांति पावेल! मी आज माझ्या प्रपितामहाच्या पदावर अधिष्टित झालों आहें, ह्याबद्दल मला भारी धन्यता वाटत आहे!"

ह्याप्रमाणें भास्कराचें कृतज्ञताव्यंजक आणि धन्यताव्यंजक भाषण झाल्यावर, शिवाजी पुन्हा उभा राहून सर्वांना उद्देशून म्हणाला, "देशबांधवहो, ह्या गडावर उद्यां पतितपरावर्तनाविधि व्हावयाचा आहे! ज्या कोणा हिंदूला मुसलमानांनीं त्याच्या इच्छेविरुद्ध किंवा कांता, कनक, अधिकार, वगैरेचें आमिष दाखवून, किंवा कांहीं तरी पेचांत पकडून, किंवा खोटा गुन्हा शाबीत करून, बाटविलेलें असेल त्या हिंदूला मी शास्त्रोक्तविधीनें परत हिंदूधर्मांत आणि त्याच्या जातींत घेणार आहे! ह्या विधीसाठीं मी ठिकठिकाणचे स्मृतिशास्त्रज्ञ पंडित बोलावून आणविले आहेत! आणि त्याच्या हातूनच हा पतितपरावर्तनाचा विधि व्हावयाचा आहे! ज्या कोणाला हा विधि पहावयाचा असेल, त्यानीं ह्या प्रसंगीं हजर राहावें!"

ह्यानंतर ह्या दरबारासाठीं आलेल्या लोकाना पानसुपारी, अत्तरगुलाब वगैरे देण्यांत येऊन दरबार खलास झाल्याची वर्दी सर्वांस कळविण्यांत आली!

## प्रकरण ५५ वें.

# पतितपरावर्तन.



दातेगडाचा गडकरी नेमण्याचा समारंभ झाला, त्याच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे मार्गशीर्ष शुक्ल तृतीयेच्या दिवशीं, जुलमानें बाटविण्यांत आलेल्या हिंदू लोकांच्या प्रायश्चित्ताचा आणि पतितपरावर्तनाचा विधि व्हावयाचा असे ठरलेलें होते. आधल्या दिवशीं दरबार ज्या मांडवांत भरला होता, त्याच मांडवात हा विधि साजरा करण्यांत आला !

ज्या बाटलेल्या हिंदू लोकांनां परत हिंदूधर्मांत आणि मूळच्या जातींत घेण्यांत आलें त्यांत सय्यद करीम होता, हें आम्ही वाचकांना मुद्दाम सागतों. हा इसम कोण होता हें वाचकांच्या स्मरणांतून अद्यापि गेलेलें नसेल, अशी आमची अटकळ आहे! तथापि विसराळू वाचकांच्या सोयीसाठीं आम्ही त्याना असे सांगतों कीं, विजापुरच्या बादशहाकडून दातेगडाकडे ज्या हत्याराच्या आणि पैशाच्या गाड्या रवाना करून दिल्या होत्या, त्याच्या रक्षणार्थ जे शिपायी दिले होते, त्यांचा नायक सय्यद करीम हा होता ! ह्या सय्यदकरीमला केंजळगडाच्या नबाबानें जुल्माने बाटवून गडावरून हाकलून दिलें होतें, ही हकीगत सय्यद करीमने भरमानाकाला सांगितली होती ! कोंडीबा,—भास्कराचा मामा,—हा केंजळगडचाच राहाणारा होता. त्याने ही सय्यदकरीमनें सांगितलेली हकगित खरी आहे, असें शिवाजीला सांगितलें. त्यावरून सय्यदकरीम ह्याला भोपाळगडावरून ह्या पतितपरावर्तनाच्या विधिसाठीं दातेगडावर बोलावून आणाविण्यांत आलेलें होतें ! हा पतितपरावर्तनाचा संस्कार ज्या इसमावर करण्यांत आला, त्यांची संख्या सुमारें आडीचशे होती. शिवाजीनें दातेगड जिंकून घेतला, त्या प्रसंगीं तुरुंगांतून जे कैदी मुक्त करण्यात आले, ते सर्व मूळचे हिंदू असून, त्यांना जुलमानें बाटविण्यांत आलेलें होतें ! दावूदभाई गडकऱ्याचा असा परिपाठ असे कीं, कोणीही हिंदू खऱ्या किंवा खोट्या गुन्ह्यांत अडकला, म्हणजे त्याला शिक्षा म्हणून मुसलमानी धर्माची दीक्षा द्यावयाची, आणि नंतर त्या गुन्ह्याबद्दल कांहीं विशिष्ट मुदतभर कैदेंत टाकावयाचें ! ह्या अशा दातेगडाच्या तुरुंगांतून सुट-

लेल्या सुमारें पन्नास हिंदूंवर हा पतितपरावर्तनाचा संस्कार ह्या दिवशीं व्हावयाचा होता. ह्या शिवाय दातेगडाच्या मुलखात इतस्ततः पसरलेले सुमारें दोनशें लोकांवर हा संस्कार करण्यांत यावयाचा होता. हे सर्व लोक जुलमाने बाटविण्यांत आलेले होते आणि ते सर्व लोक परत हिंदूधर्मांत यावयाला उत्कंठित होते !

हा पतितपरावर्तनाचा विधि पाहावयाला आधल्या दिवसाची बहुतेक मंडळी हजर होती. विशेष तपशीलांत न शिरता आम्ही वाचकांना इतकेंच सागतों कीं, पुरुषमंडळींत बिंदुमाधव भट. कासेगावच्या भवानीचा पुजारी. हा आपल्या पुत्रांसह हजर होता, व स्त्रियांच्या मंडळींत गणवंतगडाच्या गडकऱ्याची पत्नी मंजरीबाई ही आपल्या नूतनपरिचित शेवंतीसह हा पतितपरावर्तनाचा संस्कार पहावयाला हजर राहिली होती !

बाटलेल्या मुसलमानांनीं आपआपलीं पूर्ववृत्ते बोलून दाखविलीं, आपणाला कसे आणि का बाटविण्यांत आले होते, हें प्रत्येकानें संक्षिप्तरूपाने सर्वांना सांगितलें आणि आपण परत हिंदूधर्मांत यावयाला इच्छीत आहों, असें जाहीर केलें ! सय्यदकरीम यानेंही आपलें पूर्ववृत्त ह्या प्रसंगीं जाहीर केलें. तें ऐकताच चिकाच्या पडद्याच्या आड बसलेली शेवती आपल्या आश्रयदात्रीस म्हणाली, " मंजरीबाई, ते जे बोलत आहेत, ते माझे बाबा ! मी त्यांची मुलगी चंद्री ! मुसलमानाच्या जाचाला भिऊन मी वर्षदीडवर्ष 'शेवती' असें नांव घेऊन, एका गरीब म्हातारीच्या आश्रयाला राहिलें होतें ! ती म्हातारी मेली, तेव्हां मी उघडीं पडलें ! पोटाला कांहीं मिळवावें म्हणून मी त्या म्हातारीच्या घरून निघालें, तीं पुन्हा चंडाळ मुसलमानांच्या तावडींत सांपडलें ! तेव्हा तुमचे शूर बंधू दत्ताजी, यांनीं मला सोडवून तुमच्या आश्रयाला आणून ठेविले ! त्यांचे आणि तुमचे मजवर अनंत उपकार झालेले आहेत !"

मंजरीनें विचारलें, " शेवंती, किंवा खरें पाहिलें असतां चंद्री असेंच म्हटलें पाहिजे,—चंद्रे, तूं केंजळगडाच्या तटावरून उडी टाकलीस ना ? तूं जिवंत कशी राहिलीस ? "

चंद्री म्हणाली, "एका कातकऱ्याने विकावयासाठीं एक गवताचा भारा

बांधून त्या तटाखालीं ठेवला होता ! कर्मधर्मसंयोगानें माझी उडी त्याच भाऱ्यावर पडली आणि मी जिवंत राहिलें! तटावरून उडी टाकावयाला मी प्रवृत्त झालें, तेव्हा मला मरण प्रिय वाटत होतें ! परंतु मी जिवंत राहिले तेव्हां जिवंत राहाण्याची माझी इच्छा बळावली ! मी त्या गवताच्या भाऱ्यावरून खालीं सरकत सरकत उतरलें. तेथून लपत छपत, धावत पळत, मी निघाले ! वाटेत कोठें तरी रात्रीच्या वेळीं निजून, शेवटीं चार पांच दिवसानीं एका गांवाबाहेरील एका झोंपडीपाशीं आले ! तींत एक म्हातारी राहात असे. तिनें माझी हकीगत ऐकून घेऊन मला आश्रय दिला ! ती सदा आजारी असे. तिला जेवावयाला करून घालून आणि तिची सेवाशुश्रुषा करून, मी वर्ष दीडवर्ष काढलें ! त्या म्हातारीचीं कोणी नातलग माणसें नव्हतीं. पुढे ती म्हातारी मेली ! तेव्हां मी पुन्हा उघडी पडलें ! मी त्या झोंपडींतून बाहेर पडलें, आणि पोटाचा कांहीं उद्योग पहावा म्हणून फिरत असतां मुसलमानांच्या तावडींत सापडलें ! त्या संकटातून मला तुमच्या भावांनी वाचविलें, आणि तुमच्या आश्रयाला आणून ठेविलें ! माझ्या अंगाच्या कातडीचे जोडे करून तुमच्या पायांत घातले तरी तुमचें उपकार फिटावयाचे नाहींत ! पण मंजरीबाई, मी जिवंत आहे असें बाबाना कळवावयाला कोणाला तरी पाठवावें, असें मला वाटतें !"

मंजरी म्हणाली, " चंद्रे, थोडासा वेळ धीर धर ! पतितपरावर्तनाच्या विधींतून तुझे बाबा लवकरच मोकळे होतील ! मग तूं त्यांना भेट. त्या विधीमध्यें व्यत्यय आणणें बरोबर नाहीं ! जरा धीर धर ! मला आधीं हे सांग कीं, तूं त्या म्हातारीच्या घरीं दीड वर्ष होतीस, त्या मुदतींत तूं केंजळगडाकडची कांहीं हकीगत आणविण्याची किंवा बापाला निरोप पाठविण्याची कांहीं तजवीज केली नाहींस ? "

चंद्री म्हणाली, " पहिले सहा महिने मला कोणी तिकडे जाणारें मनुष्यच भेटलें नाहीं. मग मी दोन तीन जासूद तिकडे पाठविले, ते कोणीच परत आले नाहींत ! शेवटचा जो जासूद परत आला त्यानें अशी खबर आणली कीं, ' मऱ्हाठ्यांनीं केंजळगड जिंकून घेतला. तेव्हां त्यांच्याशीं लढतां लढतां केंजळगडावरील माणसें मरण पावलीं ! ' माझे

बाबा मेले, असेच मी इतकें दिवस समजत होतें ! पण आता ते जिवंत आहेत असें मी डोळ्यानीं पाहात आहे! मंजरीबाई, आता तो विधि संपला. सर्व माणसें उठूं लागलीं. मी आतां जाते मंजरीबाई !"

असें म्हणून चंद्री तेथून उठून धावत धांवत आपल्या बापाकडे गेली, आणि त्याच्या गळ्याला मिठी मारून "बाबा ! बाबा !" म्हणून ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली ! त्यालाही परमावधीचा आनंद झाला ! त्या पितापुत्रींचा हा आनंद इतका उत्कट होता कीं त्याना आपल्या सभोंवर्ती माणसे आहेत ह्या गोष्टीचें भानही राहिलें नाहीं ! तीं दोघेही पुष्कळ वेळ एकमेकांना मिठ्या मारून आनंदाश्रु ढाळीत होतीं !

---

## प्रकरण ५६ वें.

# दातेगडावर मऱ्हाठ्यांची रियासत.



शिवाजीनें दातेगड कसा जिंकून घेतला, ही गोष्ट वाचकाना सांगावी असा आमचा उद्देश होता. तो उद्देश आमच्या मतानें साध्य झाला. आता ह्या गोष्टीमध्ये जीं पात्रे आम्हीं आमच्या वाचकाना दाखविलीं आहेत, त्यांच्या उत्तरआयुष्यासंबंधानें काही खुलासा केल्यास बरें, ह्यासाठीं आम्हीं तसें करतों ! तसेंच गडाच्या रिमायतीचीं जीं धोरणें शिवाजीनें आपल्या डोळ्यासमोर ठेविलीं होतीं, तींही थोडक्यांत वाचकाना कळविणें इष्ट आहे. म्हणून ह्या शेवटच्या प्रकरणांत आम्ही ते करीत आहों !

दातेगडाच्या पूर्वीच्या गडकऱ्याचा मुलगा हमीदभाई हा गणवंतगडावरील आसारमहालांत कैदी होता, हें वाचकांना स्मरत असेलच! दातेगडावर मऱ्हाठ्याचे विजयशाली निशाण फडकूं लागल्यावर, दोन चार दिवसानीं शिवाजी आपल्या दोस्तांसह त्याच्या भेटीला गेला आणि गंभीरपणानें त्याला म्हणाला, "हमीदभाई, तुम्ही आमच्या अटकेंत आल्यापासून तुम्हाला आम्ही तुमच्या दर्जाप्रमाणें वागविलें आहे. आतां तुम्हाला आम्हीं मुक्त करीत आहों! हे आम्ही तुमच्यावर उपकार करीत आहों. कारण तुम्हीं आजपर्यंत हिंदूवर आणि हिंदूधर्मावर असंख्य अपकार केलेले आहेत!

त्याच्याबद्दल शिक्षा म्हणून तुम्हाला आम्ही जन्मभर अटकेत ठेविलें, तरी आम्हाला कोणी दोष देणार नाहीं ! परंतु आम्ही तुमच्यावर दया करून तुम्हाला सोडून देत आहों. परंतु मी सांगतों तशी कसम तुम्ही खाल्ली पाहिजे ! ''

हमीद म्हणाला, '' सांगा ! मी कसम खावयाला तयार आहे ' ''

शिवाजीनें हमीदला कसम सांगितली, ती त्यानें पुढें दिल्याप्रमाणें उच्चारली:—

'' मी आल्लाची आणि पैगंबराची कसम खातों कीं, मी यापुढें कोणाही हिंदूविरुद्ध . किंवा हिंदूधर्माविरुद्ध कांहींही अपकार करणार नाहीं!''

हमीदनें ही कसम खाल्ल्यावर शिवाजी त्याला म्हणाला, '' दातेगड आम्ही मऱ्हाठ्यांनीं जिंकून घेतला आहे ! जुन्या माणसापैकीं आता त्या गडावर एकही मनुष्य नाहीं ! तुमचे वडील आणि गडावरचे सर्व अधिकारी लढाईत मारले गेले ! आतां तुम्हाला वाटेल तिकडे तुम्ही जा.तुमचा घोडा तुम्हाला आम्ही परत देतों, आणि वाटखर्चाला भरपूर रक्कम देतों ! या माझ्या बरोबर. ''

हमीदची रवानगी करून देण्यांत आली !

विजापुराहून शस्त्रास्त्रें आणि पैसा ह्यांच्या रक्षणार्थ जे शिपायी भरमानाकानें भोपाळगडावर अटकेंत ठेविले होते, ते दातेगडावर मऱ्हाठ्यांचें निशाण उभारलें गेल्यावर, एक दोन दिवसांनीं सोडून देण्यांत आले !

ग्यानबा वाळुंज,—ज्याला विश्वासघाताच्या गुन्ह्याबद्दल शिवाजीनें अटकेंत टेविलें होते-,त्याची चौकशी करावयासाठीं शिवाजीनें एक दिवस मुकरर केला. परंतु त्याच्या आधल्या दिवशींच ग्यानबा वाळुंज मरण पावला ! पैशापरी पैसे गेले, पद्मिनीपरी पद्मिनी हातची निसटली, आणि आपली बेआबरू झाली ! म्हणून निराशा, लज्जा, भीति वगैरे भावनांनीं जर्जर होत्साता तो झपाट्यानें थकत चालला, आणि त्यातच त्याचा आधल्या दिवशीं अंत झाला !

गडावरची सर्वसाधारण व्यवस्था साधारणपणें बरीचशी लागल्यावर शिवाजी, तानाजी, एसाजी, बाजी, बत्ताशा, भरमानाक, वगैरे देशभक्त दातेगडाच्या अमलाखालीं असलेल्या सर्व प्रदेशांतील प्रत्येक घरीं आणि

प्रत्येक झोपडींत गेले. तेथील लोकाना त्यांनीं मराठ्याचा अमल सुरू झाला असे सांगितलें! आतां धर्मावर कर बसविला जाणार नाहीं, प्रत्येक माणसाला आपला धर्म पाळावयाला पूर्ण स्वातंत्र्य दिलें जाईल, कोणी मनुष्य मुसलमान असो किंवा हिंदू असो, तो मनुष्य दुसऱ्या माणसाला उपद्रव करीत नाहीं तोंपर्यंत त्याला त्याच्या धर्माप्रमाणे आणि समजुतीप्रमाणें वर्तन करावयाला पूर्ण मोकळीक आहे, सर्व धर्मांच्या पवित्र आचारांना आणि पवित्र स्थानांना सारखाच आदर दाखविला जाईल, सर्वांना सारखा न्याय दिला जाईल, सर्वांना सारखेंच कायद्याचे संरक्षण मिळेल, वगैरे आपल्या मराठ्यांच्या रियासतीचीं तत्त्वें ह्या देशभक्तांनीं दातेगडाच्या टापूंतील रयतेला समजावून दिलीं ! मुसलमानी अमलाचा अंत झाला आणि मराठ्याच्या अमलाची स्थापना झाली, म्हणून सर्व रयतेला आनंद झाला !

शिवाजीनें पूर्वीं जिंकलेल्या गडावर जे अधिकारी आणि अंमलदार नेमिलेले होते त्यांच्या हातांखालीं त्यांचीं कामें शिकण्यासाठीं जे इसम ठेवण्यांत आलेले होते, त्या इसमातूनच दातेगडाच्या रियासतीसाठीं शिवाजीनें आपली माणसें निवडून काढून नेमलीं ! भास्कराला शिवाजीनें गडकरी म्हणून नेमिलें आणि त्याला कामाची माहिती करून देण्यासाठीं त्याने कमलाकरराव ह्या नांवाच्या इसमाला गणवंतगडावरून आणविलें ! हा इसम गडाची रियासत मंदाररावाला शिकविण्यासाठीं शिवाजीनें नेमिलेला होता !

गडकऱ्याच्या इच्छा आणि हुकूम अमलात आणावयाच्या कामावर शिवाजीनें शरच्चंद्रराव ह्या नांवाचा एक मराठेजातीचा वीर पुरुष दिवाण म्हणून नेमिला ! मुलकी वसूल आणि हिशेब ठेवणें, ह्या कामावर झिलशेट जागुष्टे या नांवाचा एक रत्नागिरीकडचा वाणी नेमण्यांत आला. शिबंदीची व्यवस्था पाहाणें, दाणागोटा, दारूगोळा, हत्यारें, वगैरे सामानाचा पुरवठा करणें, जनावरें विकत घेणें, त्यांच्यासाठीं गोठे, तबेले वगैरे बांधणें किंवा दुरुस्त ठेवणें, वगैरे कामांवर शिवाजीनें लायक आणि अनुभवी माणसें नेमिलीं ! ही सर्व माणसें त्या त्या कामांत तरबेज असून शिवाय त्यांना लढाईच्या कामाची सर्वप्रकारची माहिती होती !

दातेगड हिंदूंच्या अमलाखालीं असतां तेथें एक मारुतीचें देऊळ होतें, तें मुसलमान गडकऱ्यांनीं उलथून, तेथें रखवालदाराची चौकी बांधली होती ! ही चौकी शिवाजीनें उपटून काढविली आणि तेथें पूर्वी-प्रमाणें एक मारुतीचें विस्तीर्ण देवालय बांधविलें ! त्याच्या पुजारीपणाचें काम, बिंदुमाधव भटाचा एक मुलगा हेमकेतू भट, ह्याच्याकडे देण्यांत आलें ! ह्या कामाबद्दल त्याला गडाच्या उत्पन्नातून एक रकम देण्याचें ठरविण्यांत आलें. तसेंच त्या देवळात दररोज पुराण सांगणें, दर एकादशीला एक कथा करणे, ह्या कामांवर शिवाजीनें लायक माणसें आणवून त्यांना भरपूर बिदागी देण्याचें ठरविलें ! तसेंच चैत्रात मारुति-जन्मोत्सवासाठींही त्याने योग्य तरतूद केली !

गडाच्या पायथ्याशीं जीं दोन देवळें,—एक नरसोबाचें आणि दुसरें मारुतीचें,—होतीं, आणि जीं दावूदभाईनें मोडून टाकिलीं होतीं, तीं शिवाजीनें पाहिल्यासारखीं बांधविलीं, आणि त्यांच्या पूजा अर्चा वगैरे-संबंधानें भरपूर रकमा देण्याचें ठराविलें ! चैत्रांत हनुमानजयंतीसाठीं आणि वैशाखात नरसिहजयंतीसाठीं, शिवाजीनें भरपूर रकमा मंजूर केल्या !

बिंदुमाधव भटाचा एक मुलगा काशीस जाऊन धर्मशास्त्र व न्यायशास्त्र शिकून आलेला होता ! त्याला शिवाजीनें दातेगडावर न्यायाधीशाच्या कामावर नेमिलें !

दातेगडावर आणि दातेगडाच्या अमलांतील प्रदेशांत, शिवाजीनें जागोजाग तालमी आणि शाळा स्थापिल्या ! ह्या तालमी सर्व उपकरणानीं सज्ज असून, तालमीचीं कामें शिकविण्याला त्यानें लायक वस्ताद नेमिले ! तसेंच शाळांमध्यें बालबोध, मोडी लेखनवाचन, अंकगणित, तोंडचे हिशेब, जमाखर्च वगैरे शिकविण्यासाठीं योग्य पंतोजी नेमण्यांत आले !

शिवाजीनें दातेगड जिंकून घेतल्यावर आणि साधारणपणें रियासतीचा बराचसा मांड मांडण्याचें कार्य झाल्यानंतर, भास्कर आणि पद्मिनी ह्यांच्या विवाहाचा विधि उत्तम मुहूर्तावर साजरा करण्यांत आला ! भास्कराला जी मुलगी प्रथम दृष्टीस पडल्यापासून दिवसेंदिवस अधिका-

धिक प्रिय होत होती, ती मुलगी त्याची धर्मपत्नी झाली म्हणून त्याला अतोनात आनंद झाला ! तसेंच जो मुलगा उपकारशीलतेमुळें, औदार्या-मुळें, आणि शौर्यामुळें तिला अत्यन्त प्रिय झाला होता, तोच आप-णाला पति लाभला म्हणून तिलाही भारी धन्यता वाटली ! ह्या दोघां मुलांचें प्रेम एकमेकांवर आमरण अखंडित टिकून राहिले, आणि त्यांच्या या प्रेमाला गांठीवर गांठी देणारीं अनेक मुलें त्याच्याभोंवतीं थोडक्याच वर्षांत खेळूं लागलीं ! शिवाजीचा राज्याभिषेक पाहाण्याचें भाग्य ज्या हजारों लोकांना लाभलें, त्यांपैकीं भास्कर आणि त्याची पत्नी हीं होतीं !

सर्जेराव पूर्वीप्रमाणें श्रीमंती थाटात कासेगांवीं राहूं लागले ! कधीं कधीं ते दातेगडावर आपल्या जांवयाला आणि कन्येला भेटावयाला जात, तेव्हां ते तेथें आठ आठ पंधरा पंधरा दिवस देखील राहात असत ! आपला जांवई गडकरी आहे, तो शिवाजीच्या लोभांतील एक माणूस आहे, मऱ्हाठी राज्याच्या एका घटकावयवाचा शास्ता आहे, हें पाहून सर्जेरावांना किती धन्यता वाटत असेल, ह्याची कल्पना करणें आम्ही वाचकावरच सोंपवितो !

सर्जेरावाच्या आयुष्यक्रमणाची दिशा सुधारली, हेंही येथें सांगणें जरूरीचें आहे ! ग्यानबा वाळुंज ह्याच्याशीं त्यांचा संबंध तुटल्याकारणानें म्हणा, किंवा उत्तम उदाहरणें त्याच्या दृष्टीसमोर सदैव दिसल्याकारणानें म्हणा, किंवा गैरवर्तन करण्याचें त्यांचें वय गेल्याकारणानें म्हणा, त्यांचा वर्तनक्रम सुधारला, ही गोष्ट खरी ! ते कासेगांवीं आपल्या मावशी-सह सुखांत राहूं लागले ! त्यांच्या हयातींत त्यांना अनेक सुंदर आणि आणि खेळकर दौहित्रें खेळविण्याचें भाग्य लाधलें !

भास्कराच्या विवाहाबरोबर दुसरा एक विवाह साजरा करण्यांत आला. सय्यदकरीम—म्हणजे शिताराम देशमुख—ह्याची कन्या शेवंती ऊर्फ चंद्री हिचा दत्ताजीशीं विवाह झाला ! हा दत्ताजी गणवंतगडाचा गड-करी मंदारराव ह्याच्या बायकोचा भाऊ होता, हें वाचकांना ठाऊकच आहे ! ह्याही जोडप्याचा विवाह विपुल संततीनें फलद्रूप झाला ! ह्या दत्ताजीला

शिवाजीनें आपल्या एका गडावर कारखानिस केले. ह्या दत्ताजीलाही शिवाजीचा राज्याभिषेक पाहाण्याचे भाग्य लाधलें !

शेवंतीचा बाप शिवाजीच्या सैन्याच्या एका पथकाचा नायक झाला ! तो आपल्या शौर्याने थोडक्याच दिवसात फार प्रसिद्धीस चढला !

भास्कराचें कासेगांवचें घर,—जे मोरे कुटुंबाच्या दारिद्र्यामुळें मोडकळीस आलेलें होतें तें,—त्याने दुरुस्त केले, आणि त्या घराच्या कांहीं भागात त्यानें हिंदू प्रवाशासाठीं अन्नछत्र स्थापिले ! ह्या अन्नछत्रांत दररोज सात आठ पाथस्थ जेवावयाला असत !

मुक्ताबाई आणि भीमाबाई ह्या दोघीजणींनीं आता समाजसेवेच्या कार्याला स्वताला वाहून घेतलें. तथापि, शिवाजीच्या स्वराज्यस्थापनेच्या कार्यातही त्या त्यास मधून मधून साह्य करीत होत्याच !

